# पृथ्वी-वल्लभ.

( ऐतिहासिक कादंबरी )

लेखक,

कन्हैयालाल एम्. मुनशी

बी. ए., एल्एल्. बी., ॲडव्होकेट

अनुवादक,

सौभद्र.

इ. स. १९२२

किंमत रु. १-४-०

# अनुक्रमणिका.

---

सदरहु पुस्तक **धोंडु मुकुंद देशपांडे**, रा सामत याचे घर, उतळसर, ठाणें

किंवा

म्यानेजर **प्रफुल्लता कचेरी, श्री विनय प्रिंटिंग प्रेस**, ७, नवरोजी स्ट्रीट, ठाकुरद्वार मुंबई

**येथें विकत मिळेल**



# प्रस्तावना.

अनेक लेखक मुंजाच्या कीर्तीनें आकर्षित झाल्यामुळें त्याच्या विषयीं लिहण्याला प्रेरित झाले व रसिक भोजाच्या कीर्तीनें मध्यकालीन माळव्याला कवितेत अमरपद प्राप्त झालें आहे, असें आहे तरी पण त्या प्रतापी देशाचा मुंज हा देखिल प्रतिनिधि होता असें मानण्याला कारण आहे.

त्याच्या पदव्या त्याच्या प्रभावाचें कांहीं थोडे प्रतिबिंब पाडतात, व समकालीन कवींची प्रशंसा देखिल त्यावीच साक्ष पटविते त्या वेळच्या समकालीन कवींमध्ये खाली दिग्दर्शित केलेले कवि येतात —

१ धनंजय, यानें दशरूप ग्रंथ लिहिला. त्यात तो मुंजाविषयीं ह्मणतो:—

विष्णो. सुतेनापि धनंजयेन विद्वन्मनोराग निबन्धहेतु ।
आविष्कृतं मुंजमहीशगोष्ठी वैदग्ध्यभाजा दशरूपमेतत् ॥

" हा दशरूप जो विद्वानाला पसंत झालेला आहे व जो विद्वानाना आनंद देतो तो मी विष्णुसुत धनंजयानें रचिला आहे, कारण मुंजराजाच्या चतुर वार्तालापाचा भागीदार होण्याला मी भाग्यशाली झाला होतो. "

२ धनिक, यानें संस्कृत आणि प्राकृत काव्यें लिहिली आहेत, आणि **दशरूपासाचा दशरूपावलोक** नावाची सुंदर टीका लिहिली आहे. याला कित्येक धनंजयच मानतात व कित्येकजण धनंजयाचा भाऊ ह्मणून मानतात.

३ सर्व देवाचा पुत्र धनपाल यानें " **पैया लच्छी** " नावाचा प्राकृत कोष, तदनंतर जैन झाल्यावर **ऋषभपंचाशिका** हे ग्रंथ लिहिले

४ भट्ट हलायुध प्रथमतः कृष्णराजाच्या आश्रयाखाली मान्यखेटात होता, तदनंतर हा मुंजाच्या सभेंत आला त्याच्या काव्यात **अभिधानचिंतामणि**, **कविरहस्य** आणि **पिंगलछंदसूत्रावर**, **मृतसंजीविनी** नावाची टीका लिहिलेली आहे

५. मृगांकगुप्त याचा पुत्र पद्मगुप्त यानें मुंजानंतर गादीवर आलेल्य सिन्धुराजाच्या वेळीं **नवसाहसांकचरित** लिहिलें. तो लिहितो कीं —

सरस्वती कल्पलतेककन्दम् ।
वन्दामहे वाक्यतिराजदेवम् ।
यस्य प्रसादाद्वय मप्यनन्य ।
कवीन्द्रचीर्णे पथि संचराम ॥

" कल्पलतेप्रमाणें सरस्वतीचा लाडका, व ज्याच्या प्रसादानेच आम्ही अप्रतिम महा कवीन्या पथानें चालण्याला शक्तिमान झालो आहों, अशा महाराजवाकपतीस ( मुंजाला ) आम्ही वंदन करीतो " शिवाय

दिव यियासुर्मम वाचिमुद्रा
मदत्त या वाकपति राजदेव ।
तस्यानुजन्मा कवि बान्धवस्य
भिनत्ति ता सप्रति सिन्धुराज ॥

" महाराज मुंज कैलासवासी झात्यामुळे ( माझ्या वाचेवर जी मुद्रा पडली ) माझ्या तोडाला जें कुलुप बसलें तें कविबांधवाच्या तोडावरील कुलूप महाराज मुंज याचा धाकटा भाऊ सिंधुराज याने आता तोडून टाकले आहे "

या लेखकाच्या साक्षीवरून--कविता व लेखावरून---मुंजाची काव्यरसिकता भोजापेक्षा कोणत्याहि प्रकारें कमी होती असे वाटत नाहीं माळव्याच्या परमारात त्याचे स्थान असेतसे नाहीं कारण, त्याच्या दिग्विजयाची कीर्ति अजून पावेतो चालत आलली आहे. त्याने माळव्याच्या चारी दिशा आपल्या पराक्रमाने हलवून सोडल्या होत्या असे मानण्याला जागा आहे. त्याने तैलपाला सोळा वेळा जिंकले ही हकीकत देखिल ऐतिहासिक वाटते

तैलप स्वता महान विजेता होता. त्यानें मान्यखेट ( मालखेड ) मध्यें मोठें साम्राज्य स्थापन केले असावें असे वाटतें तो चालुक्य वशातील होता, कलचुरीच्या लक्ष्मण राजाची कन्या बोन्थादेवीचा तो पुत्र होता व राष्ट्रकूटचा राजा भम्मह याची कन्या जक्कलादेवी इच्याबरोबर त्याचा विवाह झाला होता. याने देखिल चोला, चेदी, पाचाळ, आणि गुजरात देश जिंकून शेवटीं मुंजाचा पराजय करून मळवा देशावर आपली विजयपताका फडकाविली होती मुंजाबरोबर स्पर्धेने म्हणा किंवा इतर अन्य कारणानें म्हणा त्यानें ' महा-

राजाधिराज, ' परमेश्वर ' ' परमभटार्क ' 'समस्तभुवनाश्रय' 'श्रीपृथ्वीवल्लभ ' सत्याश्रयकुलतिलक ' ' चालूक्याभरण ' ' भुजबलचक्रवर्ती ' ' रणरंगभीम ' अशा अनेक पदव्या धारण केल्या होत्या.

त्याच्या एका पुत्राचे नाव ' अकलकचरित अथवा सत्याश्रय ' होतें. स्यूनदेशाचा राजा भील्लम यादव हा त्याचा महासामन्त होता, व त्यानेंच मुजाचा पराजय केला होता असे वाटतें. त्याची स्त्री लक्ष्मीदेवी ठाण्याचा राष्ट्रकूट राजा झंझा याची कन्या होती. मृणालवतीच्या कथेंत देखिल काहीं ऐतिहासिक सत्य आहे असे वाटतें.

मुजाकडे अनेक कादबरीकार आकर्षित झालेले आहेत तसाच मी देखिल आकर्षिलों आहे, व काही वर्षांपूर्वी ही कादंबरी लिहिण्याचा मी विचार केला होता. शेवटी सद्गत भाई हाजी महमद याच्या आग्रहावरून या कादबरीला आरभ केला अत्यत दु खाची गोष्ट ही कीं हे पुस्तक प्रगट होण्यापूर्वीच भाई हाजी महमद यानी परलोकीं प्रयाण केले. त्याच्या खेदजनक मरणामुळे या पुस्तकाचें अतरंग व बाहिरंग सुदर करण्यात त्याची मिळावी ती अमूल्य मदत मिळाली नाही.

बाबुलनाथ रोड, मुबई
ता. १६-२-१९२१

लि ,

**कनैयालाल माणेकलाल मुनशी.**

---

श्री

मुंबई

ता० २५ जुलै १९२२

श्रीयुत धोंडु मुकुंद देशपांडे

उर्फ "सौभद्र" यास

सप्रेम सा० न० वि० वि०

आपण पाठविलेली "पृथ्वीवल्लभ" ही कादंबरी मी वाचली. आनंद, करमणूक आणि बोध झाला. आपण केलेले हें रूपांतर फार सरस झालें आहे. मूळ लेखकाच्या कल्पनांचे स्वारस्य आपण प्रौढ भाषेत बिलकुल रसभंग न होऊं देता मोठ्या कौशल्यानें उतरविलें आहे आपण 'अनुवादक' असें ह्मटलें नसतें तर ही कादंबरी स्वतंत्रच आहे असें वाटलें असतें, अशी ह्या कादंबरीची मांडणी आणि कथानकाचा विकास झाला आहे 'जगाचा संपर्क लागू न देता जगांत व्यवहार करणें आणि विषय पसारा आवरणें किती खडतर आहे' ह्या तत्वाचा प्रस्तुत कादंबरींत चांगला बोध होतो. कथानक चटक-दार असून शोकपर्यवसायी आहे, त्यामुळें वर उल्लेख केलेली तत्वें भडक रंगांत दृष्टीपुढें राहून परिणामकारक वाटतात आपण ही कादंबरी वाचण्या-करितां पाठविली, त्याबद्दल मी आपला आभारी आहे कळावें

आपला,

**नाथ माधव.**

---

ॐ

गिरगांव मुंबई

श्रीराम

५-८-१९२२

मी 'पृथ्वीवल्लभ' ही कादंबरी वाचली मूळ गुजराथी कादंबरीचें हें मराठी भाषांतर आहे. भाषांतर चांगलें साधलें आहे भाषा अनुरूप व चटकदार आहे. मूळ ग्रंथकर्त्यांचें कादंबरीकार या नात्यानें चांगलेंच कौशल्य प्रगट होतें, परंतु मुंज-पृथ्वीवल्लभ-याचें चारित्र्य पुष्कळच मतभेदाचें कारण होईल तरी पण कादंबरीकार या नात्यानें मूळ लेखक मोठा चतुर दिसतो भाषांतरहि एकंदरीत चांगलें वठलें आहे, व तें वाचीत असतां आपण एखादी मूळ कथाच वाचीत आहोंत असें वाटतें

**ना. दा सावरकर**

**मुकुंदाश्रम.**

शनिवार कार्तिक शु० १ स. १९७९

# दोन शब्द.

परभाषेतील उत्तम लेखकाच्या कृतीचा मातृभाषेंत अनुवाद करणें हा देवी सरस्वतीच्या सेवेचा एक प्रकार जाणून गुर्जर भाषेतील प्रख्यात लेखक श्री. **कन्हैयालाल माणेकलाल मुनशी**, ~~बी. ए. एलएल. बी., अॅडव्होकेट~~ यांच्या "**पृथ्वीवल्लभ**" कादंबरीचा अनुवाद प्रथमत "**प्रफुल्लता**" साप्ताहिकांत प्रसिद्ध करून आतां सदरहु कादंबरी पुस्तकरूपानें वाचकवृंदा-समोर येत आहे.

कादंबरीला मूळ लेखकाच्या प्रस्तावनेचा अनुवाद जोडल्यामुळे या ठिकाणीं महाराष्ट्र बंधुभगिनींना मूळ ग्रंथकर्त्याचा थोडासा परिचय करून दिल्यास तें अनाठायीं होणार नाहीं श्री मुनशी यांची लेखनशैली अत्यंत ओजस्वी असून त्यांची मार्मिक लेखक म्हणून गणना आहे. आजपावेतों त्यांनीं गुर्जर भाषेंत खालील ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले आहेत —

गुजरातनो नाथ

वेरनी वसुलात. या ग्रंथाचें इंग्रजींतूनहि भाषांतर क्रमश येत आहे.

पाटणनी प्रभुता.

म्हारी कम्ला अने बीजी वातो.

कोन्हो वांक

राजाधिराज

शिवाय रा मुनशी हे **'गुजरात'** मासिकाचे तंत्री आहेत. मराठींतील चित्रमयजगत, नवयुग, मासिक मनोरंजन व विविधज्ञानविस्तार यांचे उत्तम संमिश्रण म्हणजे "गुजरात" होय. हें मासिक **साहित्यसंसद्**मार्फत काढलें जात असून श्री मुनशी हे त्या संसदेचे अध्यक्ष आहेत.

आपल्या धंद्यांत देखिल त्यांचा उत्तम लौकिक असून प्रेसीडेन्सी असोसिएशन संस्थेंतील ते एक कार्यकर्ते पुरुष आहेत. आपला धंदा व इतर व्यवसाय संभाळून त्यांच्याइतकी अत्युत्साहानें साहित्यसेवा करणारे खरोखरच फार

थोडे सांपडतील प्रस्तुत कादबरीतील मुज व मृणालवती पात्रासबधी तसेच कादबरीतील ऐतिहासिक घटनेसबधी मतभेदाला पुष्कळ जागा आहे. तरी देखिल उत्तम गुर्जर लेखकाची भाषा शैली, विचारसरणी, वर्णनाची हातोटी याचा परिचय व्हावा म्हणून हा अल्पसा प्रयत्न महाराष्ट्र वाचकासमोर रुजू केला आहे, तो कसा साधला आहे तें सूज्ञ वाचक ठरवितीलच

**श्री मुनशी** यांनी सदरहु ग्रथाचा मराठीत अनुवाद करण्यास परवानगी दिली त्याबद्दल तसेंच प्रकाशनाच्या कामीं सर्व प्रकारें जी मदत केली त्याबद्दल त्याचे आभार मानावे तितके थोडेच आहेत

श्री **नाथमाधव** व दे. भ **डॉ सावरकर** यानी या पुस्तकावर आपला अभिप्राय दिला याबद्दल मी त्याचा ऋणी आहे. तसेच प्रफुल्लतेचे मालक रा रा. **पांडुरंग नारायण जव्हेरी** व सपादक रा रा **विठ्ठल नारायण वेद्क** बी. ए , एल्एल् बी , यानीं सदरहु कादबरीचे प्रकाशनाचे व दुरुस्तीचे बाबतींत जें साहाय्य केलें त्याबद्दल मी त्याचा अत्यत आभारी आहे

श्री. मुनशी याचीं वरील पुस्तके मराठीत आणण्याचा आमचा मानस आहे व श्रीशारदा देवी आमची मनीषा पूर्ण करो अशी बलिप्रतिपदेच्या सुमगल मुहुर्तावर त्या जगज्जननीच्या पवित्र चरणकमली आमची नम्र प्रार्थना आहे

सामतचें घर, उतळसर- ठाणें.  
ता २१ आक्टोबर १९२२

सर्वाचा नम्र सेवक,  
" सौभद्र "



# पृथ्वी-वल्लभ.



## प्रास्ताविक

विक्रम संवताचे अकरावे शतक चालू होतें हिंदु राजे आपआपसांत लढत होते राज्यस्थापना आणि राज्यविनाश हीं दोन्हीहि चालू होतीं. कित्येक महाप्रतापी नरेश साम्राज्यें निर्माण करण्याचा प्रयत्न करीत होते

लोक सुखी आणि संस्कृत होते. त्यांचे जीवन साधें पण सचेतन होते व त्यांची आदर्शे साधी पण रसभरित होती

हिन्दभूमींतून प्रतापाचे निर्मूलन झालें नव्हते. तिच्या संस्कृतीच्या रक्षणासाठीं निश्चलतेचा स्वीकार करण्याचें प्रयोजन नव्हते. समृद्ध आणि संस्कृत आर्यावर्त स्वातंत्र्य आणि स्वास्थ्य यांचा आनंद अनुभवित होते

महमद गिझनवीनें ह्या देशाचे दरवाजे फोडण्याचा प्रयत्न केला नव्हता. इराण आणि तुर्कस्थान ह्यामध्ये उत्पन्न झालेल्या इस्लामी झंझावाताचा भयंकर आवाज इकडे ऐकूं येत नव्हता. पराधीनता होती पण ती स्वकीयांची परतंत्रता दृग्गोचर होत होती पण ती फक्त आपल्या पुरातन संस्कृतीचीच.

या शतकांत होऊन गेलेल्या प्रतापी राजामध्ये तेलगणांतील चालुक्य वंशातील राजा तैलप[1] हा एक होता. तो संवत १०२९ मध्यें गादीवर आला आणि राष्ट्रकूट राजांना वश करून घेऊन सर्व सत्ता त्यानें आपल्या हातीं घेऊन तो राज्य करूं लागला. इतकेंच नव्हे तर त्यानें चोला, चेदी, पांचाल आणि गुजरात ह्या देशामध्ये आपला अधिकार गाजवून भरतखंडांत चक्रवर्ति होण्याच्या महत्त्वाकांक्षेची इच्छा धारण केली, व 'परमेश्वर' 'परमभट्ट' 'समस्त भुवनाश्रय' 'सत्याश्रय कुलतिलक,' 'चालुक्याभरण,' 'भूजबल चक्रवर्ति' 'रणरंगभीम,' 'आहवमल्ल,' वगैरे नामसूचक पदव्या धारण करणारा तो भाग्यवान झाला

१ तईल—तईपयय.

या चालुक्य राजाच्या कीर्तीला कलंक लावणारी एक मोठी गोष्ट घडली. ती म्हणजे अशी की, माळव्याच्या मुंज राजानें त्याला अनेक वेळा जिंकिलें होते, बंदिवान केले होतें आणि त्याला अवन्ती नगरीला नेऊन त्याच्याकडून सामान्य सामन्ताप्रमाणें सेवा करवून घेतली होती. हा कलंक धुवून टाकण्यासाठी संवत १०५२ मध्ये तेलप एक मोठे सैन्य घेऊन तैलंगणावर चालून आलेल्या अवन्तीनाथासमोर रणसंग्रामास उभा राहिला.

ज्या वेळीं तैलप दक्षिणेंत साम्राज्य स्थापनेचा प्रयत्न करीत होता, त्या वेळी आर्य संस्कृतीचें केंद्रस्थान अवन्ती असून अवन्तीनाथ मुंजराजानें उत्तर हिंदुस्थानात साम्राज्य स्थापन केलें होतें अनेक वर्षांपूर्वीपासून अखिल भरतखंडात त्यानें आपला दरारा बसविला होता व आपल्या कीर्तीची कवींकरवी प्रशंसा करवून कवींच्या कविताशक्तीची तो परीक्षा घेत असे स्वरूपानें तो कामदेवाची बरोबरी करी, इतका तो सुंदर होता. त्याची सुरस वाङ्मुक्ताफलें ऐकून कविजनांना सरस काव्ये लिहिण्याची प्रेरणा होत असे. त्याच्या साहाय्यानें गणितशास्त्री आपले शास्त्र संपूर्ण करीत.

तो विद्याविलासी होता,—खुनी आणि जुलमी म्हणून देखिल तो मानला जात असे. त्याच्याविषयीं अनेक दंतकथा प्रचलित होत्या आणि तैलंगणांत त्या सर्वत्र ऐकल्या जात. मुंजराजाचें नांव ऐकतांच सर्व देशांतील लोकांची त्रेधा उडून जाई.



# प्रकरण १ लें.

## विलासवती.

संवत् १०५२ च्या वैशाख मासाच्या दशमीच्या सायंकाळीं तैलंगणची राजधानी मान्यखेट[1] येथें राजमहालातील शिवालयांत एक बाला पद्मासन घालून बसली होती.

नगरांत अशांति होती. कारण रणसंग्रामातील राजासंबंधानें अनेक अफवा उठत होत्या. कोणी असें ह्मणत कीं, मुंज गोदावरी ओलांडून मान्यखेटावर चालून येत आहे, कोणी ह्मणत कीं, तैलपराजानें मुंजाला पराजित केलें आहे. कोणी असेंहि सांगत की, मुंज आणि तैलप हे दोघेहि द्वंद्वयुद्धांत एकमेकांचा वार लागून कामास आले. यांत खरें कोणतें व खोटें कोणतें, तें कोणीहि सांगू शकत नव्हतें, परंतु प्रत्येक अफवेच्या योगानें लोकांच्या चिंतेंत भर पडत होती.

अशा अशांतीच्या स्थितींत देखिल ती बाला शांतीनें बसली होती. आपण ध्यानमग्न आहों असा डौल ती दाखवीत होती, तरी पण हरणासारखे चंचल नेत्र, हळूंच, चोरून चोहींकडेस फिरत होते. थोडथोड्या अवधीनें ती कानोसा घेई व जागृत निश्वास टाकी. तिजकडे पाहणारास असेंच वाटावें कीं, समाधींतून महेश्वर शंकर होण्यासाठीं वाट पाहत बसलेली भगवती पार्वती, नवयौवन भिल्लिणीचा वेष धारण करून, पुनः पतीची परीक्षा घेण्यासाठींच या भूतलावर अवतरली आहे.

या बालेचें लालित्य मोहक होतें. तिनें परिधान केलेल्या वल्कलांतून निघालेली श्वेत आणि सरळ मान तपस्वीजनांचे तपाचा भंग करणारी होती, तें मधुर पण नाजुक मुखकमल, पोपटाच्या चोंचीसारखें अणकुचीदार लहानसें नाक, मध्यम प्रकाराचेंच परंतु तेजस्वी काळेभोर नेत्र ही सर्व सामग्री पाहिल्यावर तपस्वी काय करतील व काय नाहीं, हें सांगता येणें शक्य नव्हतें. ते योगिराज

१ हल्लींचें मालखेड

शंकराचें मंदीर, तिनें परिधान केलेली वल्कले आणि घातलेले पद्मासन, इतकी तयारी होती तरी सुद्धा तिच्या भोवतालच्या वातावरणात रसतरंग पसरलेले होते. तिच्या कपाळावर एक आठी पडली होती व तिच्या मुखमंडळावर ग्लानि दिसत होती शिकाऱ्याच्या बाणापासून आपला बचाव व्हावा म्हणून पळणाऱ्या व लपून बसणाऱ्या सशाच्या नेत्रातील घाबरेपणा तिच्या नेत्रकमलात दिसत होता

थोडा वेळ तिनें चोहीकडे पाहिलें.पद्मासन मोडून आपल्या दोन्ही हाताची लहान व नाजुक बोटें जरा जोराने एकमेकात अडकवून तिनें अंगाला आळेपिळे दिले.

आवारात पडलेल्या सुकलेल्या पानाचा आवाज झाला. कोणी तरी येणाऱ्या-च्या पायाची चाहूल आली. बालेनें लागलीच आपले पद्मासन सारखे करून व डोळे अधिक घट्ट मिटून ध्यान करण्याचा पुन डौल आणिला

तीन स्त्रिया शिवालयाच्या पायऱ्या चढत होत्या जिनें वल्कलें परिधान केलेलीं होती ती तर स्त्री सर्वांत पुढें होती ती उंच, विप्पाड आणि सशक्त दिसत होती. तिच्या अंगाची ठेवण रेखीव व गोंडस होती, पण तिच्या मस्तकावरील केस मात्र पांढरे होऊं लागले होते व भरलेलें ठसकेदार तोंड, देवीच्या वणानें टोचे मारल्यामारखे असल्यामुळे विद्रूप दिसत होते. तरी पण तिच्या डोळ्यात तर वारीच्या धारेसारखें तीक्ष्ण तेज होतें, घट्ट मिटलेल्या ओष्ठामध्यें प्रभाव झळकत होता, वय झाले असूनहि तिच्या शरीरावर तारुण्याचा जोम-यौवनप्रभा-दृग्गोचर होत होती मागून येणाऱ्या दोन्ही स्त्रिया सुंदर होत्या आणि त्याची किमती वस्त्रे व आभूषणें त्याची उच्च स्थिति दाखवीत होती

पहिल्या स्त्रीच्या मुखावर दृढता होती. तिच्या डोळ्यात स्थिर दुराग्रहाची झाक होती. ती रजोगुणी महत्त्वाकांक्षी असावी, असा भास होत होता. दुसऱ्या दोन स्त्रियाच्या मुखावर भय आणि चिंता ही दिसत होतीच त्याचे डोळे अश्रूनें भरले होते असें दिसत होतें

पुढे चालणारी वल्कलधारिणी ही तैलपराजाची विधवा भगिनी मृणालवती होती. दुसरा-दोघींतील मोठी-तैलपाची राणी जक्कलादेवी असून तिसरी जक्कलादेवीची चुलत बहीण व स्यूनदेशाचा यादव राजा महासामंत भिल्लम याची स्त्री लक्ष्मीदेवी होती

---

१ जाकव्वी २ लच्छीयव्वा.

मृणालवती सर्वांच्या अगोदर मंदिरांत दाखल झाली आणि लक्ष्मीदेवीकडे वळून ह्मणाली —" लक्ष्मी ! मी काय ह्मटलें होते ? तुझी कन्या ध्यान करीत आहे. "

लक्ष्मीदेवीनें ऐकूं जाणार नाही, अशा तऱ्हेने–हळूच–' होय ' ह्मटले.

शांत, कठोर व अधिकारयुक्त आवाजानें मृणालवतीनें हाक मारिली, " विलास ! विलास ! "

जणूं काय आपण ध्यानातून जागृत होत आहो, अशाच तऱ्हेनें त्या बालेने आपले नेत्र उघडले आणि एकदम चमकल्यासारखें दाखविलें

" विलास ! " कठोर आवाजात मृणालवती ह्मणाली " जा, जरा बाहेर बैस, व कोणी येत आहे अशी चाहूल लागली की लागलीच मला कळीव. "

तोंडातून अवाक्षर देखिल न काढतां, विलास मृणालवतीस वंदन करून बाहेर गेली मृणालवतीच्या आज्ञा पालन करण्याची आणि तिच्याच इच्छे-प्रमाणें वर्तन करण्याची सर्वांना सवयच असावी असें स्पष्ट दिसत होते.

विलासवती बाहेर मंदिराच्या ओसरीवर गेली आणि आत काय बोलणें चालणे होईल ते समजावे अशा तऱ्हेनें उभी राहिली.

आतील काळोत्री दगडाच्या नंदीजवळ मृणालवती गेली आणि म्हणाली, " जक्कला ! "

" माईसाहेब—" तैलपच्या राणीनें म्हटलें.

" हे पहा मी तुला सांगितली होती ती ही जागा. मान्यखेटातून पळून जावयाचें असेल तर हा एक रस्ता आहे "

" माईसाहेब, " भीत भीत लक्ष्मीदेवीनें विचारलें, " पण मुंज येणार अशी कांहीं बातमी—"

मृणालवतीच्या भुंवया सकुंचित झाल्या तीक्ष्ण दृष्टीनें लक्ष्मीकडे पाहून तिनें तिचे वाक्य पूर्ण होऊं दिलें नाही.

"त्या बातमीला कांहीं वेळ असता तर मी सांगितलेंच नसतें?" तिनें जरा कडक-पणात सांगितलें; लक्ष्मी आपले ओंठ दाबून गुपचिप राहिली, मृणालवतीनें आपलें बोलणें पुढें चालविलें–"हें पहा हा नंदी आहे व याच्या खालीं भुयार आहे."

" कोठें निघतें ते ? " हळूंच पण विनयानें जक्कलादेवीने विचारिले.

' बाहेर, भुवनेश्वराचें मंदिर आहे त्यात "

" ते तर थेट जंगलात आहे ? "

मृणालवती उत्तर देण्याचे अगोदर मागे वळली व गर्भद्वारात विलासला उभी राहिलेली पाहून तिनें तिला कठोरतेने विचारले –" का आलीस ? "

" बाहेर बाबा आले आहेत. "

" महासामन्तना ? " ओरडून मृणालवतीनें विचारिलें

" ऑ ! " लक्ष्मीदेवीच्या मुखातून शब्द बाहेर पडला

काही अशुभ झाले असेल असे समजून, घाबरलेल्या जक्कलादेवीने निराधार स्थितीत आश्रय मिळावा म्हणून भिंतीवर आपले हात टेंकले. "

" जा, त्यांस आत बोलाव "

आज्ञेप्रमाणे विलास बाहेर गेली आणि आपल्या पित्याला घेऊन आत आली

महासामन्त भिल्लम उंच, धिप्पाड आणि भव्य असा योद्धा होता. त्याचे अंगात चिलखत होतें, त्याच्या हातावर व कपाळावर अशा दोन ठिकाणीं पट्ट्या बांधलेल्या होत्या.

" माईसाहेब ! आहवमल्ल महाराज विजयी झाले आहेत. '

" ऑ ! " जक्कला उद्गारली.

शांतपणें त्याच्याकडे वळून मृणालनें आपले नेत्र त्याच्याकडे लावून विचारलें.—" कव्हा ? '

" परवाच्या दिवशी ! मुंज गोदावरी ओलांडून इकडे येत होता व महाराजानें त्याला पेचात आणलें. "

जक्कला, लक्ष्मी आणि विलास या तिघींच्या मुखमंडळावर आनंद चमकूं लागला, पण मृणालनें मात्र भयकर दृढतेनें आपलें ओंठ दाबून ठेविले.

" त्याच्या लष्करांचें काय झालें ? "

" बहुतेक पकडले गेलें—व काहीं पळून गेले "

" महाराज आनंदात आहेतना ? " जक्कलादेवीनें हळूंच विचारण्याची हिंमत केली.

" इतक्यातच अधीर झालीस वाटतें ?" मृणालवती जरा रागाने म्हणाली, व तिनें स्वत च भिल्लमाला प्रश्न केला " त्या नरपिशाचाचें काय झाले; ? "

" कोणाचे ? मुंजाचे ? " महासामन्ताने प्रश्न केला. मृणालनें मानेनेच ' होय' म्हटले.

" त्याला तर मी पकडलें " गर्वाने हंसत हंसत भिल्लम म्हणाला.

त्याच्याकडे मृणालवतीनें तिरस्काराच्या दृष्टीनें पाहिले

" उदईक महाराजाची स्वारी येथे येणार आहे, हें सर्वांस अगाऊ कळावे म्हणून मला पाठविले आहे. " भिल्लम पुढें म्हणाला

"तर मग आता तयारी करण्याचा हुकूम दिला पाहिजे. चला महासामन्त!"

तेथून निघण्याचा महासामन्ताचा विचार दिसला नाहीं

" मी आता आलोच—"

" भिल्लमराज ! तुह्मी अजून देखिल जसेच्या तसेच आहां. " मृणाल तिरस्काराने म्हणाली. " तुमचें अंत करण अजून सात्त्विक झालेच नाहीं. " भिल्लम न बोलता विनयाने हंसला मात्र. " बरें, ठीक आहे. जक्कला, विलास, चला ." " माईसाहेब ! " भिल्लम म्हणालाः " विलासला मी इतक्यातच पाठवितों "

" तुह्मी दोघे-आईबाप--या मुलीचे संस्कार बिघडविता. तेव्हां ही बिचारी निष्कलंक कशी होईल ? ठीक विलास लौकर ये बरें " असें म्हणून स्वस्थतेनें मृणालवती तेथून निघाली व तिच्यामागोमाग जक्कलादेवीहि गेली



# प्रकरण २ रें.

## पराधीनता.

भिल्लमराजाची निराधार मृणालवती मंदिरातून गेली तेव्हां तिघांनीहि निश्वास टाकले

"महाराज!" थोडा वेळ मनःशांति धारण करून लक्ष्मीदेवी ह्मणाली —
"आपली प्रकृति ठीक आहे ना?"

भिल्लम हसला त्याचे डोळे प्रेमानें भरून आले "उत्तम आहे दोन चार जखमा झाल्या आहेत पण मी शौर्य गाजविलें आहे." महासामंत सहर्ष ह्मणाला, "मी नसतो तर मुंज पकडला गेला नसता आणि महाराजसाहेबांचा सर्वच ग्रंथ आटोपला असता"

"असें का?"

"होय मुंज आणि महाराज यांच्यामध्ये तुंबळ युद्ध झालें"

"द्वंद्वयुद्ध?"

"होय." त्यांना महान् कामागत आल्यामुळे त्यांनीं खालीं उतरून द्वंद्वयुद्धाला सुरुवात केली"

"बरें मग?"

"मग काय? कोठें मुंज आणि कोठें महाराज? दोघांत जमीन अस्मानचें अंतर. महाराजांच्या शरीरावर मार पडूं लागला महाराज पडण्याच्या बेतांत आहेत, असें बघताच मी त्यांच्या मदतीला धावून गेलो, व मुंजाच्या समोर झालो. देवी! आमचें युद्ध ह्मणजे काय? विचारूंच नये चार घटका कोणीच कोणाला हार गेला नाही त्रैलोक्यांतील देवसुद्धां तें बघत होते" भिल्लमानें थोडा विसावा घेतला त्याची स्त्री आणि कन्या आतुरतेनें त्याजकडे पाहूं लागल्या. "माझीदेखिल ती खराखरच कसोटीचीच वेळा होती. शेवटीं मी जेता ठरलो मुंजराजा ढचाळला व मी त्याला पकडलें."

" शाबास ! " लक्ष्मीदेवी नयनांगति आनंदाने म्हणाली.

" बाबा ! " विलासवतीने हळूच विचारले " मुज कसा आहे ? "

" उद्या पहा की, तो देखिल खरोखरच मोठा जबरदस्त योद्धा आहे. मी त्याला पकडल्याबरोबर तो हसला व लागलीच त्याने माझी पाठ थोपटली व हसत हसत म्हणाला —" भिल्मराज ! धन्य आहे तुझी ! या पृथ्वीवर तूंच हे काम करू शकलास "

" अरे वा ! " लक्ष्मीदेवी म्हणाली.

" बाबा ! उद्या मी मुजाला कशी पाहू शकेन ? " विलासवतीने विचारिलें

" का बरे ? "

" नाथ ! " लक्ष्मीदेवी जवळ येऊन हळूच म्हणाली. ती आपले ओठ करकरा चावीत होती व तिच्या नेत्रातून विषाचे फवारे निघत होते " येथे तर जुलूम आहे ! जुलूम ! ! "

" कसा बरें ? "

" आपण तर रणांगणावरच आपले दिवस घालविता तेव्हा आमच्या दुःखाची आपणाला जाणीव तरी कशी होणार ? आम्ही केवळ ओशाळवाणे झालो आहो ? जकलादेवी देखिल काही करूं शकत नाहीं, तेव्हा मी काय करूं शकणार ? " बोलता बोलता लक्ष्मीदेवीचा दबलेला राग बाहेर पडला. तिने आपले नयनाश्रु पुसले " माझे काय ? जे व्हावयाचे असेल ते होईल. पण या बिचाऱ्या कोवळ्या केळीसारख्या विलासचे देखिल दुर्दैव उभे राहिलें आहे. तिनें असे काय बरे केले आहे ? "

" देवी ! " जरा खिन्न स्वराने भिल्लम म्हणाला " तुला तर माहीतच आहे कीं हा पराभांगना आपण कशासाठी सहन करीत आहो "

" मला आहे—माहीत ! " लक्ष्मीदेवी कष्टाने म्हणाली " पण मला तर आता या स्थितीचा अगदीं वीट आला आहे या स्थितीला आता मी खरोखरीच कंटाळले आहे आपल्यासारख्या अप्रतिम योद्धयाला यापेक्षा सरस नोकरी वाटेल तेव्हा सहज आणि खात्रीने मिळेल "

निश्वास टाकीत महासामन्ताने लक्ष्मीला शान्त करण्याचा प्रयत्न केला " देवी ! तूं फारच अधीर आहेस तुला ही ओशाळवाणी भाकरी सलते आणि

मला ती आवडते असे मुळीच नाही. माझी दीन आणि दुबळी प्रजा निराधार आहे, याची मला जाणीव आहे. तू—महाराजाची तनया—"

"नाथ!" राष्ट्रकूट नरपतीच्या कुळात जन्मलेली लक्ष्मीदेवी थोडया दूषण देण्याच्या उद्देशाने म्हणाली—'हे सर्व माझ्यासाठीच आहे, असे मला वाटते.'"

"नाही! देवी! असे मुळीच नाही. मला पण जाणीव आहे की, मी स्वतः या ठिकाणी एक निराधार गुलाम म्हणून आहे—तैलपाची कीर्ति वृद्धिंगत करण्यासाठी नेमलेला एक नोकर आहे." तिरस्कारयुक्त कटुतेने महासामन्त म्हणाला.

"पण करायचे तरी काय? आठ वर्षे लढाया दिल्या. पण निदान त्यात काहीच बळ दिलें जात शेवटी या एकुलत्या एका मुलीसाठी ही अवमना—"

विलासवती दूर उभ्या उभ्या डोळ्यातील अश्रू दाबण्याचा प्रयत्न करीत होती. लक्ष्मीदेवीच्या नेत्रातून अश्रूंचा टपटप वर्षाव झाला—महासामन्ताने तरल्या विक्रमाने एकदम विषय बदलला.

"बाळ! तू तर सुखात आहेस ना?"

"होय!" विलासने हळूच म्हटले.

लक्ष्मीदेवीने नेत्रांनी प्रत्युत्तर दिले—"इला सुख म्हणे नी दुःख काय? इला देखिल आताशा माईसाहेबांना हातांशी धरले आहे, व जसे सत्याश्रय कुमारसाहेब अकलंकित आहेत त्याप्रमाणेच या बिचारीला करण्याला त्यांनी सुरुवात केली आहे. या बिचाऱ्या कोवळ्या केळीसारख्या माझ्या निर्दोष बालिकेलादेखिल माईसाहेबांनी छिन्नविछिन्न करण्याची सुरुवात केलेली आहे."

महासामन्त रसविहीन हसला. "विलास! तुला कसे काय वाटते?"

"आईच्या ठिकाणी जरा असंतोषप्रवृत्ति बळावली आहे आणि माझ्यामध्ये शान्तता येऊ लागली आहे." विलास मधुरतेने म्हणाली.

"बाळ! तू सत्याश्रय कुमारसाहेबांना योग्य अशी होऊन, त्यांच्याबरोबर तुझे लग्न झाले म्हणजे गंगेत घोडे न्हाले."

"बाबा! त्यांच्या योग्यतेची होण्याचा मी प्रयत्न करिते तर खरी!"

"होय!" लक्ष्मी म्हणाली. "तुझी यातनांच्या जाळून राख होईल, तेव्हा तू लायक होशील."

"बाळ!" भिष्म विलासला म्हणाला "तुझ्या आईचे पित्त भडकल्या-मुळे तिचे डोके ठिकाणावर नाही, म्हणून ती काही तरी बोलत आहे. तिच्या बोलण्याकडे लक्ष देऊ नको. चला, आपण आता जाऊ या. हे पहा, मी एक विचार केला आहे."

"कसला तो?" लक्ष्मीदेवीने विचारिलें.

"महाराजाजवळ काही वर मागून घेईन. माझ्या सेवेकडे पाहून ते दिल्याशिवाय राहणार नाहीत."

"रत्नराजाचा काय हा शोचनीय स्थिति? निराधाराला पराधीनता?" लक्ष्मीदेवीने टीका केली. त्या टीकेकडे मुद्दाम दुर्लक्ष करून भिष्माने आपलें म्हणणे पुढे चालविलें —"एक तर विलासच्या लग्नाचे नक्की करून घेईन, व तिचा विवाह झाल्यानंतर मग आपण आपल्या देशी परत जाऊ."

"असा भाग्याचा दिवस केव्हा उगवेल?" शंकाशील लक्ष्मीने पृच्छा केली.
"उगवेल. आज नाही उद्या खचित उगवेल. तू अधीर होऊ नकोस. चला आता." असें म्हणून तिघेहि मंदिरातून निघाली.

"बाबा! मला भुज पहावयाचा आहे."

"उद्या सकाळी पहा बर."

"ती बिचारी कशी पाहणार?" लक्ष्मी कदुतेने पण हळूच म्हणाली —
"माईसाहेब म्हणतील की, अगा जिज्ञासेने तर इच्या वैराग्यव्रताचा भंग होईल. सोळा वर्षाची विधवा आणि सोळा वर्षाची अविवाहित कन्या दोघीहि सारख्याच."

"हे तू काय म्हणतेस?" जरा रागाने भिष्म म्हणाला. "कोणी ऐकेल याचे तुला कांही भान आहे की नाही?"

"बाबा!" विलास म्हणाली --"तुम्ही माईना सांगाल तर त्या तुमचे ऐकतील सांगाल ना?"

"होय, जरूर जरूर सांगेन." असे म्हणून भिष्म स्तब्ध राहिला.



## प्रकरण ३ रें.

## मृणालवती

मृणालवती जकलादेवीबरोबर महालात गेली आणि दुसऱ्या दिवसाच्या स्वारी साठी तयारी करण्याविषयीं एकामागून एक हुकूम सोडूं लागली

मध्या मृणालवतीचें वय सेचाळीस वर्षाचं होतें, तीस वर्षांपूर्वी तिला वैधव्य-दशा प्राप्त झाली असल्यामुळें तिचा संसार आटोपला होता. तैलप तिच्याहून पाच सात वर्षांनी लहान होता व आईच्या निधनामुळें मोठ्या बहिणीची साह-जिकच भावाच्या ठिकाणीं प्रीति जडली तैलपाचें पालनपोषण करणें, त्याला शिक्षण देणें, शस्त्रविद्येत आणि राजनीतीत त्याला निष्णात करणे व त्याच्या ठिकाणीं योग्य तो जोम उत्पन्न करून त्याला शूरवीर बनविणे, या कार्मात मृणा-लनें आपल्याला गुतवून घेतल होतें

थोड्या वर्षांनी तैलप गादीवर आला, तेव्हा मृणालनें राज्यकारभारात देखिल आपल्या बुद्धीचा उपयोग करण्याला सुरुवात केली तैलप राज्यकारभारात तिच्या इतका हुशार नव्हता म्हणून थोडक्याच काळात तैलंगणच्या राज्यसत्तेची सर्व सूत्रें तिनें आपल्या हातात घेतली—तीच तैलंगणची राजसत्ता चालवूं लागली. तैलप राज्य चालवी, लढाया मारी, देशोपरदेशीं स्वतःचा प्रभाव दाखवी पण मृणालसमोर तर तो तिचा धाकटा भाऊच म्हणून असे आपल्या बहिणीचा शब्द केव्हाहि अवमानीत नसे तिच्या बुद्धीनेंच तो राज्य चालवी व तिच्या उत्साहानेंच तो लढाया मारी.

मृणालचा स्वभाव, लहानपणी प्रेमळ आणि रसिक होता. जसजशी यौवन-प्रभा खुलूं लागली तसतशा तिच्या हृदयांत न कळणाऱ्या अशा उर्मी येऊं लागल्या. त्यापैकीं कित्येक ती विधवा असल्यामुळें संतुष्ट करणें अशक्य होतें, कित्येकीस सर्वतोपरी राज्यसत्ता तिच्या हातीं असल्यामुळें, थारा देणें बरें नव्हतें; कित्येकींना तैलपचें चरित्र्य शुद्ध आणि सरळ व्हावें, म्हणून दाबून

ठेवावें लागें. शेवटी या सर्वांचा असा परिणाम झाला की, मृणालला वैराग्य-जीवनच प्यारे होऊं लागले.

सुख किंवा दु:ख अनुभविण्याची आपल्या ठिकाणीं असलेली कोमलता तिनें हळुहळूं मुरडून टाकिली, आर्द्रता आणि करुणा याची पाळें मुळें खणून काढली. हे सर्व करण्यासाठी तिला भयंकर तप आचरावे लागलें. त्या तपामुळे तिच्या हृदयाच्या ठिकाणी शुष्कता प्राप्त झाली व तिची निश्चयात्मक बुद्धि निश्चल बनली

तिच्या वृत्तीत बदल झाल्याने, ससाराचे बाबतींतील देखिल तिचा दृष्टि-बिन्दु बदलला सुखदु:खाच्या कर्दमांत ससार रुतलेला आहे, असें तिने पाहिले, व कडकडीत वैराग्यावाचून ससारातून उद्धार नाहीं अशी तिची खात्री होऊं लागली राज्यामध्ये तिची सत्ता सर्वमान्य होती व या सत्तेचा प्रजेच्या उद्धारासाठी उपयोग न करणें म्हणजे एक भयंकर पाप आहे असें तिला वाटल्यामुळे, ज्या मार्गानें तिनें स्वत:च्या उर्मींना वश केलें होते, ज्याच्या अवलंबनानें स्वत:चे अशान्त हृदय तिनें शान्त आणि कठिण बनविलें होते, त्याच मार्गाने तिने प्रजेच्या जीवनातील उच्छृंखल उर्मींना, आनंदाळा, व कोमलतेला वश करण्याच्या प्रयत्नाला आरंभ केला

या नीतीला अनुसरून नवीन नवीन शासनें (कायदे) काढण्यात आलीं. तिने कवि, गायक, आणि नट याना देशपार केले, आनदोत्सव बंद केले; जाहीर कल्पांतावर अंकुश ठेवला. गावात व राजमहालात कडकपणा आणि स्वस्थपणा दिसून येत होता. दरक प्रकारचा सबध शुष्क, नियमित आणि निष्कलंक होत गेला प्रेम, उत्साह, आनंद हे जणूं काय भयंकर गुन्हेच आहेत, अशा तऱ्हेनें वातावरण पसरावयाला लागलें.

जाहीर—ठिकाणी, प्रमीजन सहधर्मचारीच बनले, आनंदमग्न कुटुंबें एका यन्त्राची चक्रें झालीं; उत्सवप्रसंग शुष्क नियमामुळें निरस झाले, तत्त्वज्ञानीं आणि तपस्वी यांनीं कवीचे स्थान घेतलें नीतिनियमाच्या तापात प्रजाजीव-नांत राहिलेली आर्द्रता शोषली गेली. स्नेह, आनद, उत्साह यांचा उपभोग राज्यसत्तेला भिऊन, कान्या कोपऱ्यात कोणाला कळणार नाहीं, अशा तऱ्हेनें जनता घेऊं लागली.

तैलपाचा पुत्र सत्याश्रय यानें बालवयात संचार केला तेव्हा त्याचेंदेखिल शिक्षण मृणालवतीनें आपल्या हाती घेतले. व हळूहळू सत्याश्रयदेखिल आपल्या आत्याबाईच्या आदर्शाप्रमाणे आपले चारित्र्य खुलवूं लागला.

या कडकडीत आणि शिस्तीच्या जीवनाचा एक सुपरिणाम असा झाला की तैलंगणचे योद्धे कडक, दृट निश्चयी आणि भयंकर होत गेले, व यामुळे तैलपराजाचे सहजा सहजीं विशेष कष्ट न पडता दिग्विजय होत गेले या दिग्विजयाच्या होमकुंडात प्रथम स्यूनदेशाची आहुती पडली भिल्लमराजाची स्वाभिमानता त्याने हिराऊन घेतली. आपला स्वाभिमान, आपली इज्जत कायम राहावी ह्मणून भिल्लमाने रणांगणात कामास येण्याचा आटोकाट प्रयत्न केला, पण त्याच्या आयुष्याची दोरी वळकट होती. त्याला बंदिवान करून मान्यखेटला आणले, पण त्याला मारून टाकण्याचा तैलपाचा हेतू सफल झाला नाहीं. मृणालनें भिल्लमाचा पक्ष घेतला त्याला मृत्युमुखातून वाचविले. त्याचे राज्य त्याला परत दवविले त्याच्या एकुलत्या एक कन्येबरोबर सत्याश्रयाचें वाग्दान केले पण मृणालची ही मेहरबानी फारच महाग पडली. त्याला या मेहरबानीची भयंकर किंमत द्यावी लागली त्याला सहकुटुंब मान्यखेटात रहावें लागलें, तैलपाचा महासामन्त व्हावे लागून तैलपाची कीर्ति त्याला वृद्धिंगत करावी लागली, इतकेच नव्हे तर विलासवतीला निष्कलंक जीवनाचे धडे शिकण्यासाठी, मृणालवतीच्या हवाली करावी लागली.

वैराग्याची आदर्श सिद्ध करणारी, आणि विमल, सक्त आणि निश्चल नियमाना स्वतःच्या व दुसऱ्याच्या जीवनात प्रेरणारी मृणालवती हा तैलंगणची अधिष्ठात्री देवी होती. अशा निर्द्वंद्व बनलल्या हृदयातदेखिल एका भावनेला हेतूला— स्थान होते व तो भाव—हेतू—ह्मणजे आपल्या भावाची कीर्ति. तिने तैलपाला बालपणापासून पाणीदार बनविण्याचे प्रयत्न केले होते. व त्या प्रयत्नाच्या योगानेच तैलपानें एवढी कीर्ति मिळविली होती. ही सर्व कीर्ति ती स्वतःचीच आहे असे मानी व या कीर्तीच्या आड येणाऱ्याला चिरडून टाकण्यामध्येच ती आपल्या प्रभावशाली निश्चयात्मक बुद्धीचा उपयोग करी.

मुंजराज हा तैलपाच्या कीर्तीला राहु होता. त्याने पंधरा सोळा वेळां तैलगणाधिपतीला धूळ चाटावयास लाविले होते. मुंजराजाला गोंडणी देऊन आपण

शांततेने आपल्या राज्याचा उपभोग घ्यावा अशी तैलपाला बरेच वेळा इच्छा होई, पण मृणालच्या अचल निश्चयासमोर तैलपाचे इच्छांकुर लागलीच कोमेजून जात. खरें पाहिले तर मुंज आणि तैलप या दोघांच्या विग्रहांत मुंज आणि मृणाल या दोघांच्या प्रबल इच्छाशक्तीचें दारुण द्वंद्वयुद्धच होत होतें.

शेवटी मृणालचा जय झाला—मुंज हरला. विजयाच्या विचारांत मृणालच्या शुष्क व वैराग्यविलासी हृदयांत ज्याप्रमाणे निर्जन वनांत शीतल पवन वाहतो त्याप्रमाणे संतोष आणि गर्व याचा संचार झाला. मुंज भरतखंडात पृथ्वीवल्लभ या नावाने ओळखला जात असे. त्या पृथ्वीवल्लभाला देखिल मृणालानें दासानुदास बनविलें या पेक्षा संतोषाला अधिक कोणचें कारण असणे शक्य आहे ?

जक्कलादेवी बरोबर मृणाल महालांत परत गेली तेव्हां अशा तऱ्हेचे विचार तिच्या अंतःकरणांत अस्पष्ट रूपानें आले. महालांत जाऊन विजयस्वारी काढण्याची योग्य रीतीनें ताकिद दिली आणि सामान्य नियमांचा भंग करून शहरांत कशा तऱ्हेनें थाटमाट, भपका आणि आनंद करावयाचा याची योजना करण्यासाठी तिनें गावांतील प्रतिष्ठित नागरीकांना व पुढारी मंडळीला आमंत्रण पाठविलें.

या अवधींत भिल्लम, लक्ष्मीदेवी आणि विलास ही तिघेंहि वाड्यांत येऊन पोहोंचली. भिल्लमाच्या मुखावर खिन्नता दिसत होती. लक्ष्मीदेवीच्या मुद्रेवर अदृष्ट तिरस्कार वावरत होता. विलास मात्र जशीच्या तशीच शान्त आणि गाढ अशी होती.

" गाईगमहव ! " भिल्लमानें पृच्छा केली. " सर्व तयारी करण्याविषयी हुकूम दिला ना ? "

" का नव्हे ! " जरा कडकपणानें मृणाल म्हणाली.

" आपण पृथ्वीवल्लभाला घेऊन आलो आहों. तेव्हां त्याला साजेशीच तयारी केली पाहिजे. "

क्षणांत मृणालच्या तेजस्वी नेत्रांत तीक्ष्णता आली. " महासामन्त ! " शान्तीनें ती म्हणाली—" आतां पृथ्वीवल्लभ बदलला. "

" तर मग त्याबद्दलचा देखिल आपणाला उत्सव केला पाहिजे. " भिल्लम हंसत म्हणाला.

"तुम्हा लोकाना जेव्हां तव्हा आनंद आणि मौज पाहिजे तुमच्या ठिकाणी मद्‌बुद्धीचा केव्हा वास होईल ?"

"माईसाहेब ! आजचा प्रसग काही अशातसा नाही." भिल्लमाने धैर्याने म्हटले.

भिल्लमाच्या अशातऱ्हेच्या बोलण्याच्या रीतीचा मृणालला अचंबा वाटला. तिने वर पाहिले, एवढा मोठा आपण विजय मिळविला, या विचाराने तिने भिल्लमाकडे तिरस्कारपूर्वक पाहून त्याच्या अपराधाची माफी केली व विचारले —"का बरे ?"

मुंजासारखा नरेश लाखात विरळा. असा सर्व पृथ्वीतलावर कित्येक शतकात एखाददुसराच जन्माला यावयाचा, व हजारो वर्षानी लोकाच्या नजरेला पडावयाचा पण असा असाधारण नरवीर अशातऱ्हेने पकडल्याचे दहा हजार वर्षात देखिल आपल्याला पाहावयाला मिळणार नाहीं."

तिरस्काराने पण शात आणि स्थिर नयनानें मृणाल ही प्रशंसा ऐकत होती

"तुम्ही आज फारच अस्वस्थ झाला आहा." मृणाल अधिकारयुक्ततेने म्हणाली.

इतर वेळेला भिल्लम स्वस्थ बसला असता, पण स्वत मिळविलेल्या विजयानें तसेच लक्ष्मीदेवीच्या कठिण वचनानी त्याच्या ठिकाणीं बरीच हिंमत आली होती. तो म्हणाला —

"का बरे होणार नाही ?" अशा शूर नरवीराला द्वन्द्वयुद्धात कोणाच्याहि मदतीशिवाय पराजित करून पकडण्याचे सुदैव चौऱ्यांशी लक्ष योनीत क्वचितच प्राप्त होतें "

"महासामन्त !" तिरस्काराने हंसत हसत मृणाल म्हणाली. "अहंकार हा सर्व पापाचें मूळ आहे " तिचा आवाज एखाद्या सिंहीणीसारखा विकाळ झाला, व त्यामुळे भिल्लमबहादुराच्या अंतःकरणांत पण भीति उत्पन्न झाली.

"माईसाहेब ! आपणाला एक गोष्ट तर जरूर जरूर करावी लागेल."

"कोणती ?"

"उद्ईक स्वारी पाहण्याला यावें लागेल "

" मला ? " जणूं काय स्वतः सामान्य मनुष्यजातींतून उंच भूमिकेवर आपण आहांत, अशा आढ्यतेनें तिनें पृच्छा केली.

" होय उद्यांच्यासारखा प्रसंग जन्मोजन्मीं मिळावयाचा नाहीं. मुंज पकडला गेला, याचें सर्व श्रेय आपणाकडे आहे, तेव्हां आपण तर स्वारी पाहण्याला आलेंच पाहिजे "

" नयनाला तृप्त करण्याचें प्रायश्चित्त मला किती करावें लागणार ? " जरा हसून मृणाल ह्मणाली.

" आपली जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं आपण थोडक्याच येणार आहां ! आपण आल्यानें लोकांना खरोखर संतोष होईल "

" भिल्लमराज ! पाप करणें अथवा करविणें यामध्यें कांहीं अंतर आहे, असें मला तरी वाटत नाहीं. तरी पण तुह्मी ह्मणतां त्या बाबतींत मी विचार करीन."

" या विलासला देखिल स्वारी पाहण्याची इच्छा आहे. "

मृणालच्या भुवया संकुचित झाल्या. " महासामन्त ! तुह्मी या मुलीला खचित बिघडविणार. " विलासकडे तिनें रागानें दृष्टि वळविली व पुढें ती ह्मणाली — " त्वा स्वारी नाहीं पाहिली ? लष्कर नाहीं पाहिलें ? तैलपराजाला नाहीं पाहिलें ? हे सर्व पाहण्याची इतकी हौस ! "

" पण ही बिचारी मुंज केव्हां पाहणार ? " भिल्लम ह्मणाला.

" मुंजाच्या ठिकाणीं असें पाहण्यासारखें काय आहे ? हाच हाडकाचा पिंजरा, हीच चामडी आणि हीच मलमूत्रानी बनलेली काया " ऐकून अंगावर शहारे उठतील, अशा तिरस्कारानें मृणाल ह्मणाली.

भिल्लम हंसला. "माईसाहेब ! पण हा हडकाचा पिंजरा कांहीं निराळाच आहे "

" कसा बरें ?"

" याच्यासारखें रूप, मीं दुसरें पाहिलें नाही. "

" रूप ! रूप ! काय घेऊन बसलांत ? सरळ अथवा चपटया नाकांत काय फरक आहे ? लहान अथवा मोठे डोळे असले तर त्यांत काय फरक ? शवटीं तर सर्वांचेंच जळून भस्म होणार ना ? मुंज स्वरूपवान् असला ह्मणून त्याला जळून जाण्याला कांहीं जास्त वेळ थोडकाच लागणार आहे ? "

" माईसाहेब ! आपण एक वेळ त्याला पहा, मग पुढची गोष्ट. मी काहीं कवि—"

" कवि नाहीं ह्मणून ठीक आहे, नाहो तर हद्दपारीची शिक्षा करावी लागली असती. " मृणाल हंसत ह्मणाली.

" पण जो कवि नसेल त्याला देखिल—"

" महासामन्त ! आता पुरे करा. कारण—"

" आपली आज्ञा मला शिरसा मान्य आहे पण विलास—"

" विलास ! ! मी स्वारी पाहण्याला आलें तर तिला देखिल घेईन. मग तर झालें ना ? " असे ह्मणून जरा तुच्छतेनें मृणाल तेथून निघून गेली तदनंतर भिल्लम आपल्या पत्नीकडे वळला

" देवी ! उदईक माईसाहेब स्वारी पाहण्याला विलासला येऊं देतील "

" आपणाला हे कसे कळले "

" कारण माईसाहेब उदईक आल्याशिवाय राहणार नाहीत. "

" बाबा ! " विलासनें विचारलें. " मुंज कवि आहे ? "

" तो कवींचा कवि आहे, तो कविवर आहे—असा लोकवार्ता आहे त्याच्या लष्कराबरोबर देखिल कवि आहेत "

" आई ! कवींना लोक काय ह्मणून धिक्कारतात ? " विलासने लक्ष्मीदेवीला विचारलें. लक्ष्मीदेवीचा राग अजून उतरला नव्हता.

" तुझ्या बाबानाच विचार. राजे असताना ते आपल्या पदरीं पुष्कळ कवि ठेवीत. "

भिल्लमानें निश्वास टाकला. " मी तुला दाखवीन. उद्या पुष्कळ कवि येतील. बाळ ! आता जा. माईसाहेब रागावतील "

विलासनें देखिल निश्वास टाकला आणि मग ती तेथून निघून गेली.

भिल्लम लक्ष्मीदेवीकडे वळला. "देवी ! दुःखावर डागण्या काय ह्मणून देतां ?"

लक्ष्मीदेवी भिल्लमाजवळ आली त्याच्या खांद्यावर तिनें आपला हात ठेविला आणि ती प्रेमाने ह्मणाली.--" महाराज, एवढयाच साठीं कां या वेळीं आपण पृथ्वीवल्लभाचे पृथ्वीवल्लभ असून सुद्धा आपण पराधीन ते पराधीनच. "

" दोन दोन वेळा जोर देऊन सांगितल्यानें माझी पराधीनता काहीं कमी होणार होती वाटते ? "

" नाहीं पण त्यामुळें आपण महाराजाच्या ऐवजीं महासामन्त होऊन राहू नका. माझ्या बाळेचें लग्न झालें, कीं लागलींच आपण ही पराधीनता सोडली पाहिजे " फारच हळू लक्ष्मीदेवी ह्मणाली तदनंतर उभयता तेथून गुपचिप निघून गेलीं

+ + + +

मृणालवतीचें स्नान वगैरे आटोपलें व ती शुचिर्भूत होऊन ध्यान करण्याला बसली; तरी देखिल चित्त स्थिर होण्याला तिला वेळ लागला तिला स्वतः-विषयी तिरस्कार उत्पन्न झाला. दुसऱ्या निर्माल्य प्राण्याप्रमाणेंच स्वतः देखिल या विजयानें ती अस्वस्थ झाली. शेवटीं महाप्रयासाने ती ध्यानमग्न झाली

ध्यान आटोपल्यावर तिचा विचार सुरू झाला उदईक स्वारी पाहण्याला जावें किंवा नये ? सामान्य नरनारीप्रमाणे अशा प्रसंगीं आनंदित होऊन तिनें स्वत स्वारी पाहण्याला निघावें काय ? तिला स्वारी बघण्याचा शोक होता ? थोडया वेळानें तिची खात्री झाली कीं, केवळ स्वारी बघण्यासाठीं जावे इतकेंच काही तिचें मन सांगत नव्हतें.

तर काय ? मुंजाला पाहण्यासाठीं तिच्या मनाने घेतले होते ? तिच्या भावाच्या कीर्तीचा शत्रू व आर्यावर्तांतील अप्रतिम नरेश, याला पाहण्याची सर्वांना मनातून जिज्ञासा होईल; पण सर्वांच्या मनासारखें मृणालला काय म्हणून व्हावें ? तिच्या विरागी अंतःकरणाला अशी जिज्ञासा थोडीच होणार ? ती हसली, अशातऱ्हेच्या क्षुद्र भावनांचा तिनें तर केव्हांच त्याग केला होता.

तर मग ती कशासाटीं मुंजास पहावयाला जाणार ? लागलीच प्रेरणा झाली—कारण समजले. ती स्वतः या देशाच्या राज्यकारभाराची विधात्री होती. अशा प्रसंगीं जर ती गैरहजर राहिली तर त्या स्वधर्मापासून भ्रष्ट होईल. हें कारण सत्य कीं असत्य या बाबतींत तिनें पुष्कळ दूरवर विचार केला, व शेवटीं हे शुद्ध कारण आहे, अशा निर्णयावर ती आली. स्वारी पहाण्याला जाण्याचें तिनें नक्की केलें.



# प्रकरण ४ थें.

## पृथ्वी-वल्लभ.

मृणालवती स्वारी पाहण्याला येणार व उत्सवाचे बाबतीत ठेवलेला अंकुश काढून घेण्यात येणार, ही गोष्ट गावात पसरली, तेव्हा लोकांना अत्यानंद झाला बरींच वर्षे दाबलेल्या भावना उसळून वर आल्या व आज पावेतों अदृष्ट असा उत्साह व आनंद लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आला. दुसरे दिवशीं सकाळी घराच्या अगाशींत, खिडक्यातून, ओटीवर बालबालिका व नरनारीजनही आनंद अनुभविताना दिसूं लागली

राजमहालातील सज्जातून रंगीबेरंगी वस्त्रें परिधान केलेल्या स्त्रिया दिसत होत्या. त्यामुळें त्यास विशेष शोभा आलेली होती. या सर्व नारीजनाच्या मुख-मंडलावर अकल्पित आनंद दृग्गोचर होत होता. बऱ्याच दिवसानंतर निर्माण झालेल्या थाटामाटामुळें त्याचीं मनें प्रफुल्ल झालीं होतीं. इतक्यात स्वारी राज-महालाच्या रस्त्यावर आली, असें दिसल्यावरून एक दासी ती बातमी सांगण्यास आत गेली, लगेच सर्व स्त्रिया आपआपलीं वस्त्रें व भूषणें सावरीत आतील दर-वाजाकडे किंचित् सभय नयनानीं पाहूं लागल्या

मृणालवती बाहेर सज्जात आली. तिने वल्कलाऐवजी साधें शुभ्र वस्त्र परि-धान केलें होतें, तिचे धनुष्यासारखें लांब डोळे स्थिर आणि करडे होते, दृढ-तेनें तिचे ओठ मिटलले होते. तिचे आधींच विद्रूप असलेलें तोंड तिच्या या काठिण्यामुळें ज्यास्त कुरूप झालें होतें, ते पाहतांच तेथे उभ्या असलेल्या स्त्रि-यांच्या अंगावर शहारे उभे राहिले.

तिच्यामागून जक्कला, लक्ष्मी आणि विलास आल्या. विलासनें देखिल स्वच्छ, शुभ्र वस्त्र परिधान केलें होतें. तिचें सडपातळ, नाजुक व सुकुमार शरीर या वस्त्राने देखिल चंद्रकलेप्रमाणे मोहक दिसत होतें तिच्या मुखमंडळावर उत्साह स्मित होता. अशा तऱ्हेचा आनंद ती बऱ्याच वर्षांनंतर अनुभवीत आहे, हें

स्पष्ट दिसत होते या डंक्याच्या आवाजानें चारी दिशा दुमदुमल्या. सनई व तुतारी याच्या सुरानें वातावरण नादमय झालें इतक्यात स्वारी आली. पहिल्यादा सांडणी आली या सांडणीवर नौबती होत्या. मागे विजयध्वनि करणारें पायदळ होतें पायदळामागून घोडेस्वार आले घोडे उत्तमतऱ्हेनें शृंगारलेले असून त्यांच्या पायात पैंजण घातले होते. घोडेस्वार घोड्याना नाचवीत आनंदानें हंसत हंसत आपल्या हातातील भाल्याना वरचेवर फेकून झेलीत होते

स्वाराचे मागून खिन्न वदनानें मोलवाय योद्धे चालत होते त्याचे हात पाठीशीं बाधलेले असून त्यांची वस्त्रें चिलखतें वगैरे रक्तानें माखलेलीं होतीं त्यांचीं शिरस्त्राणे आणि हातातील शस्त्रें काढून घेण्यात आलेलीं होतीं. थोड्या दिवसापूर्वी ज्या वीरानी मान्यखेट सर केलें होतें, तेच योद्धे या वेळा बंदिवासी झाल्यामुळें निस्तेज होऊन आयुधधारी तेलगी योद्धयानीं केलेली मस्करी व मानहानि सहन करीत तैलपराजाची विजयसेना भूषवीत होते.

ही योद्धयांची राग संपल्यानंतर त्यांच्या मागे बख्तरें घातलेले घोडेस्वार, तेलगी भट्टराज, व हत्तीवर असलेले तैलपाचे सामन्त असे एका—मागून एक येऊ लागले सामन्ताचा हत्ती गेल्यावर मागे सर्वजण लक्ष देऊन पाहूं लागले, शंभरांडशे शस्त्रधारी बंदिवान पायीं चालत होते मृणालवतीच्या नीरसतेने कवींची देशामधून उचलबांगडी झालेली होती, ते नामशेष झाले होते, पण राज्यकारभारातून भाट आणि चारण याना काढिले नव्हते हे शूरवीर या वेळीं विजयानें हर्षित होत्साते स्वारीतून चालत होते.

त्यांच्या मागून साध्या वस्त्रात सुमारें पन्नास एक कैदी आले त्यांच्या मुखावरून ते योद्धे होते, असें दिसत नव्हते. दिसण्यात ते सुकुमार असून त्याची चालण्याची गति मंद होती

"पहा" ! हे लोक येताच लक्ष्मीदेवीने विलासाच्या निदर्शनास आणले. "हेच ते कविजन !"

"काय म्हटलें ?" रागानें मृणालवतीने विचारलें. तिनें लक्ष्मीदेवीचे शब्द ऐकले होते.

"माईसाहेब ! हे मुंजराजाचे कवि"

"तुला कोणी सांगितलें ?"

" महासामन्तांनीं. "

" पृथ्वीवल्लभाला लढाईत देखिल कवीवाचून चालले नाही. ही माणसाची किंमत ? " तिरस्काराने मृणाल म्हणाली

विलास आपला श्वास कोंडून या नवीनप्रकारच्या मनुष्याकडे न्याहाळून पाहूं लागली तिने कवींच्याविषयीं चोरूनमारून पुष्कळ ऐकलें होतें, व मृणाल कवींचा धिक्कार करीत असे, त्यामुळे कवींविषयीं तिची जिज्ञासा वाढत होती. अशा पुरुषाना प्रत्यक्ष पाहताच तिच्या मनात एकप्रकारचा आनंद झाला, पण तिचा हा आनंद आतल्याआतच राहिला आनंदाला बाहेर पडूं न देण्याची तिला सवय झाली होती.

स्वारी पुढे चालली. कविवृंदाच्या मागाहून डंका आणि निशाण, व त्याचे मागें नंग्या तरवारी व भाले धारण केलेले दोनशे सैनिक चालत होते हा सैनिकसमूह आल्यानंतर त्याच्या मागून तैलप राजाचा हत्ती डोलत येताना दृष्टीस पडला; त्या हत्तीवर तैलप आणि भिल्लम असे दोघे बसलेले होते यांना पाहताच प्रत्येक प्रजाजनाच्या मुखातून आनंदाचा विजयध्वनि—जयजयकार—निघाला, मात्र राजमहालाच्या सज्जातील सर्व व्यक्ति गुपचुप होत्या.

" तैलप महाराजकी जय " रस्त्यातून केलेली गर्जना अगदी जवळ ऐकूं येऊं लागली. सर्व जण लक्षपूर्वक बघूं लागले

तैलपाच्या हत्तीमागें पायदळ सैनिकांचा कोट—किल्ला—बनविला असून त्यात मध्यंतरीं थोडी खुली जागा ठेविली होती. या खुल्या जागेत फक्त एकच बंदिवान चालत होता त्याजकडे नरनारीजन एकसारखे टक लावून बघत होते हाच माळव्याचा मुंज का ?

" हाच तो मुंज. " रस्त्याच्या एका दूरच्या टोकावर हे सैनिक येताच मृणाल ह्मणाली. तिच्या स्थिर अंतःकरणात एक गर्वाची ऊर्मि आली तिच्या मुखावर संतोष दिसत होता मृणालचा आनंदित चेहरा बघून सर्वांना हिंमत आली. जक्कला देवी म्हणाली —" हे परमेश्वरा ! आतां मात्र शांति झाली. काळजी करण्याचे मुळीं कारणच राहिलें नाहीं या पाप्यानें इतकीं वर्षे झालीं, सुखानें बसूं सुद्धा दिलें नव्हतें "

" तैलपानें सुद्धा याला तरी, कोठें सुखानें बसूं दिलें होतें ? " मृणाल ओठ चावून म्हणाली. " आज या मुंजाची संपूर्ण कीर्ति धुळीला मिळाली. "

" आई ! या बिचाऱ्या मुंजराजाला अशातऱ्हेनें काय म्हणून चालवीत आहेत ? " विलासनें विचारलें

" तो जित झाला ! हेंच त्याचें दुर्दैव " लक्ष्मीदेवी म्हणाली.

" बिचारे किती तरी शूरवीर मृत्युमुखी पडले—त्याचा सूड उगवला गेला म्हणावयाचा. " जक्कलादेवी म्हणाली.

" जक्कल ! यात सूड घेण्याची मुळींच जरूरी नाही. " मृणाल रागाच्या आवेशात म्हणाली " सत्याचा विजय हा ठरलेलाच ! हा मूर्तिमंत असत्याचा अवतार म्हणूनच याचा पराजय झाला "

" मग माईसाहेब ! हा फारच पापी होता तर? " लक्ष्मीदेवीनें विचारिलें. तिच्या आवाजात ( खोच ) होती किंवा कसें, हे पाहण्यासाठीं मृणालनें वर पाहिलें पण तिनं निर्दोषपणानें प्रश्न विचारिला आहे, असें तिला दिसल्यामुळें मृणाल उत्तरली.–"पापी! याच्यासारखा पापी या भूतलावर दुसरा मिळणें कठीण. याच्या स्पर्शानें सात पिढीच पूर्वज नरकात जातील, एवढा हा पापी आहे. "

" असें का ? पण पहा तर खरा. कसा आहे तो ! "

" माणमामारम्या-—" मृणालवती रागानें म्हणाली. पाहण्यासाठी तिनें आपलें तोंड फिरविलें. बाकीचे शब्द तोंडातल्या तोंडातच राहिले. तिने निश्चलतेनें रागानें पण निग्रही नयनाचे मुंजाकडे पाहण्यास आरंभ केला.

सैनिकांच्या ओळीनें मर्यादित केलेल्या मैदानात तो एकटाच उभा होता. त्याच्या शरीरावर त्यानें धारण केलेल्या वस्त्राशिवाय दुसरा कोणताहि कपडा नव्हता किंवा पाठीमागें बांधून ठेवलेल्या हातातील बेड्याशिवाय त्याच्या जवळ दुसरें कोणतंहि आभूषण असें नव्हतें, तरी त्याला पाहताच सर्व जण त्याच्याकडेच बघत राहत !

त्याच्या चारी बाजूला असलेले सैनिक त्याच्या समोर जणूं काय मुलेंच आहेत, असे दिसत होतें, व यामुळेच ती विजयसेना जणूं काय त्याच्याच कीर्तीत भर घालीत होती, असा भास होत होता.

त्याची आगकाटी विशाल व मजबूत होती, त्याच्या शरीराची ठेवण अपूर्व होती; त्याचे मुखकमल मोहक होते शंकराच्या विशाल स्कंध-प्रदेशावर पसरलेल्या सुरसरितेच्या —देवगंगेच्या—जलाप्रमाणे त्याचे लांब काळे केस त्याच्या खांद्यावर लोळत होते व त्यामुळे त्याचे मुखमंडळ अधिकच शोभायमान दिसावयाला लागून त्यावर विलक्षण तेज चमकू लागले होते दंश करण्यासाठी फणावरून मागे वळलेले डोके गर्व आणि बेपर्वाई यांच्या जोरावर जगताचा तिरस्कार करीत आहेत, असे दिसत होते पाठीमागे हात बांधल्यामुळे पुढे आलेल्या विशाळ छातीचा संगमरवरी दगडासारखा स्पष्ट चौरसासारखा विस्तीर्ण स्नायूंचा भाग वक्षस्त्राणाची गरज दूर करून आपली दुर्धर्षता आणि प्रताप दाखवून जणू काय अलम दुनियेला भीति दाखवीत आहे, असा दिसत होता, व धरणीला दराहून मोडणाऱ्या मजबूत टांचांच्या त्याच्या पायांनी कमरेवरील शरीराला आपल्या शिरावर धारण केले होते

शरीरावरून तो इतका बलवान आहे, असे दिसत होते तरी देखिल केवळ स्नायूंच्या समृद्धीमध्येंच त्याच्या अपूर्वतेचा लोप झाला नव्हता. ते शरीर जिवंत मनुष्याचे नव्हे—शारीरिक अपूर्वतेचें स्वप्न आहे—असा भास होत होता, आणि त्याच्या अंगातील प्रत्येक स्थानातून दिव्यतेचा स्राव होत होता

एखाद्या मत्त गजेंद्राप्रमाणे तो हळुहळु पावलें टाकीत होता. त्याच्या ठिकाणीं नव्हता क्षोभ किंवा नव्हती खिन्नता. मृणालनें दारुण निग्रहानें व करड्या नजरेनें हे सर्व पाहिले—या दृश्याची परीक्षा केली तिच्या रागाला यामुळेंच सीमा उरली नाही, तिचा क्रोध अनावर झाला. मुंजाच्या व्यक्तित्वा-तून झिरपणाऱ्या प्रतापामुळे जणू काय आपण स्वतः अधम आहो, आपल्या भावाची राजसत्ता क्षुद्र आहे व हा विजय खरोखर मुंजाचाच आहे, असें तिला थोडेंसें वाटावयाला लागलें. निखाऱ्याप्रमाणें आपले लालभडक डोळे तिनें स्थिर केले, ओंठ घट्ट दाबून धरिले व आपल्या मनात आलेल्या मुंजविजयाच्या कल्पनेला हंसण्यावारी नेऊन ती स्वारी पाहात राहिली

राजमहालाच्या सज्जाजवळ स्वारी थोडा वेळ थांबली. ज्या ठिकाणी मृणाल उभी राहिली होती त्याच ठिकाणी खालच्या बाजूला, सर्व सैन्याला केवळ दृष्टिपातानेंच अधमतेचा अनुभव आणविणारा मुंज एक पाय पुढे टाकून स्वारी-पुढें चालण्याची वाट पाहात उभा होता.

"माई !" विलासन्याने राहवले नाही. ती ह्मणाली —"कसा गे हा अद्भुत पुरुष आहे !"

विलासने हळूच उच्चारलेले शब्द देखिल खालपावेतो एकूं गेले, व डोळ्यावर आलेले केश मस्तकावर करून पाठीमागें टाकून मुंजानें वर पाहिलें; त्यानें सज्जात असलेल्या रमणींकडे नजर फेकली ! एकूण एक स्त्री स्तब्ध झाली !! कित्येकींनीं तर घाबरून सज्जाचा कठडा धरलाच, कित्येकींनीं भिंतीवर हात टेंकून भिंतीचा आधार घेतला

मुंजानें विलासवरून आपली सर्वग्राही नजर फिरविली, व नंतर प्रत्येक सुंदरीकडे पाहिले. शेवटी त्यानें मृणालकडे दृष्टि वळविली–तो हसला ! निर्मळ आकाशांत एकाएकीं रवीचा उदय व्हावा त्याप्रमाणें मुंजाचे मुख—कमल पाहताच मृणाल सर्व विसरली—व ती फक्त एकसारखी त्याच्याकडे टकमक पाहात राहिली तिला इतकेच भान राहिलें कीं, त्या सुंदर मुखकमलावर एक देखिल अपूर्ण रेषा नव्हती व त्याच्या ठिकाणी कोणत्याहि भावाचा अभाव नव्हता, म्हणजे एकंदरीत ते मुखकमल सर्वप्रकारें संपूर्ण होते. विशाळ भालावर स्फटिकाप्रमाणें निर्मलता असून त्याच्या मोठ्या तेजस्वी नेत्रातून मधुरतेचा स्राव होत होता सुन्दर मनुष्यामध्यें देखिल प्रेम उत्पन्न होईल, अशा मधुर ओष्ठांनी हास्य करून त्यातून त्याने शराप्रमाणें स्नेहमय मोहकता लोटली होती. हसताना देखिल त्याच्या मुखकमलावर, विजय स्पष्ट दिसत होता. इतकेंच— मृणालनें पाहिले. त्या दिव्य मुखमंडळावर काव्याची मधुरता वास करीत असून त्या हास्यात पुष्पधन्व्याचें शरसंधान होतें. सर्व स्त्रिया वेड्या झाल्या ! मृणाल देखिल पळभर—एकच पळभर—स्तब्ध झाली !!

स्वारी पुढे चालली. मुंजानें पुन वर पाहिलें, एक हास्यबाण सोडला, तो पुढे चालूं लागला. तैलपराजाकडे कोणी देखिल पाहिले नाही. किंवा महासामान्तकडे देखिल कोणींहि आपली नजर टाकली नाहीं. सर्वजण वाकून वांकून दूर दूर जाणाऱ्या पृथ्वीवल्लभाच्या पृष्ठभागाकडे पाहत होते

सर्वांच्या अगोदर मृणाल स्वस्थ होऊन उभी राहिली. सर्वांच्या जिवात जीव आला. सर्व स्त्रिया मृणालचा धाक विसरल्या व मुंजाची स्तुति करूं लागल्या. काय कारण असेल ते असो, पण मृणालच्या मुखावर भयंकर कठोरतेने आपलें ठाणें दिले !

" माईसाहेब ! " लक्ष्मीदेवी ह्मणाली —" महासामन्त ह्मणत होते ती गोष्ट शेवटीं खरी ठरली. खरोखर पृथ्वीवल्लभ पृथ्वी-वल्लभ आहे " मृणालने तिच्याकडे पळभर स्थिर नजरेने पाहिलें

" लक्ष्मी ! खरा पृथ्वीवल्लभ तर तैलपराज आहे " ती दरडावून ह्मणाली

" पण रूप तरी किती सुंदर आहे ? " विलास मध्येंच उद्गारली.

रागारागाने एकदम विलासजवळ येऊन मृणालने विलासचा कान पिळला. " इतक्या थोडक्या अवधींत सर्व विसरलीस वाटतें ? मीं नव्हते ह्मटलें कीं, अशा ठिकाणीं बायकाना आणू नये ह्मणून ? जरा कोठे रूप पाहिलें व अशा तऱ्हेने वेडया झाला ह्मणजे तुमचे मग होणार तरी कसे ? मला ह्मणून काहीं होत नाही ? आता चला इथून व तुह्मापैकी ज्याना आनदाच्या उकळ्या आल्या असतील त्यानी आताच्या आताच प्रायश्चित्ताला सुरुवात करावी. सिंहणीची गर्जना पूर्ण झाली, व घाबरलेल्या हरिणी एकदम तेथून निघून गेल्या !



# प्रकरण ५ वें.

## वरदान.

मृणाल तेथून दृढतेनें निघाली. तिला या वेळीं आपल्या वैराग्यबुद्धीच्या पूर्णतेचा विचार आला मुजाच्या ठायीं रूप तर होतेच. व तें पाहून साधारण इसम वेडा देखिल झाला असता, पण स्वत. ती स्वस्थ आणि सात्विक जशीच्या तशीच राहिली होती

"तू कशाला स्तब्ध होऊन पाहत राहिलीस ?" आतून अकल्पित प्रश्न उद्भवला.

"मी !' " तिनें विस्मित होऊन आपल्या मनाला मनातल्या मनात उत्तर दिलं "मी तर फक्त माझ्या भावाच्या शत्रूला पाहात होते मला त्यात काय ? माझ्या अंत करणात विकार थोडाच उद्भवला ! मी तर फक्त इतकेच पाहात होतं, मनुष्य एकदा अधःपतनाच्या कडयाला जाऊन पोहोचला म्हणजे कसा दिसतो. स्तब्ध ! मी स्तब्ध ' ' हा तर खरा एकाग्रता विवेकबुद्धि भ्रष्ट झाली म्हणजे मनुष्य स्तब्ध होतो." असं म्हणून स्वतःच्या पूर्णतेच्या गर्वात ती आनंदली.

डंक्याच्या भीषण नादानें तिला कळलें की, स्वारी उतरली, म्हणून ती हळुहळू राजमहालाच्या दरवाजाकडे गेली. अशा त-हेच्या अप्रतिम विजयानें तिच्या मनात उद्भवलेली हौस आता मावळली होती, व आपल्या मनाला काहींसे स्वस्थ वाटतें असें तिला वाटलें. तिला संतोष झाला. हीच का तिच्या वैराग्याची निश्चलता ! काय ? तिच्या अंत.करणात अस्पष्ट खिन्नता किंवा तळमळ उत्पन्न झाली होती ? तिनें हा विचार हसण्यावारी नेला. तीस वर्षांच्या अभ्यासानें निर्विकार झालेल्या तिच्या अंतःकरणात खिन्नता किंवा तळमळ ! '

ती दरवाज्या जवळ जाऊन पोहोचतांच तेथे जमलेल्या राजद्वारी पुरुषांच्या जमावांत शांति पसरली. सर्वजण स्तब्धतेनें तैलंगणच्या भाग्यविधात्रीच्या स्वस्थ, कडक आणि साध्या पण भयंकर मूर्तीकडे पाहू लागले. तिच्या डोळ्यातील चमक, तिच्या मुखावरील भाव हे त्यांच्या मनानें जणू काय ईश्वरेच्छा काय आहे, याची परीक्षा करण्याचीच साधने होतीं.

ती आली. स्वारी उतरण्याचा विधि उरकून आलेल्या तैलप राजानें तिला साष्टांग प्रणाम केला, व तिची चरणधूलिका आपल्या मस्तकावर धारण केली.

तैलपाचें स्वरूप व त्याचा बांधा मृणालच्या सारखाच होता मात्र त्याच्या तोंडावर विद्रूप करणारे देवीचे व्रण नव्हते मर्द मनुष्याच्या शरीरावरील रेषाप्रमाणें त्याच्या रेषा स्पष्ट होत्या, पण त्याच्यात मृदुता नव्हती. डोळे जरा लहान असून खोल होते. मृणालच्या मुखावर कडकपणा होता, तैलपाच्या तोंडावर क्रूरता होती

तैलप कठोर हृदयाचा, हिशोबी आणि धूर्त होता मृणालने दिलेल्या शिक्षणाच्या प्रतापानें त्याच्या ठिकाणी आर्द्रतेचा अंश देखिल उरला नव्हता मात्र जिने त्याची मातृवत् जोपासना केली, जिने पितृप्रेमाने त्याला शिक्षण दिलें आणि अधिष्ठात्री देवी होऊन जिनें त्याला चक्रवर्ती केले, त्या आपल्या ज्येष्ठभगिनीबद्दल त्याच्या ठिकाणीं अथांग प्रेम आणि तिच्याविषयी अमर्यादित आदरभाव होता, व आपल्या भगिनीच्या बुद्धीविषयीं तसेच तिच्या पवित्रपणाचे बाबतीत त्याची अढळ श्रद्धा होती.

प्रणाम करणाऱ्या तैलपाला उठवताना मृणाल ह्मणाली:—"रणरंगभीम! शंभर शरद ऋतुपर्यंत राज्य कर दीर्घायु हो व पृथ्वीवल्लभ—खराखुरा पृथ्वीवल्लभ हो."

"वडिलांच्या आशीर्वादानें सर्व काहीं होईल. आपला मंगल आशीर्वाद असला ह्मणजे झालें" असे ह्मणून तैलप उभा राहिला आणि मागें उभ्या राहिलेल्या भिल्लम राजाकडे वळला व म्हणाला "माई! महासामन्तानांहि आशीर्वाद द्यावा. त्याच्याच प्रतापानें मी आज विजयी झालो, इतकेंच नाहीं तर जिवंत राहिलो व मुंज पकडला गेला"

मृणाल जरा हंसली "भिल्लमराजानें ही गोष्ट तर मला केव्हांच कळविली होती त्याना तर माझा नेहमीच आशीर्वाद आहे कीं, त्यानीं दीर्घायुषी व्हावें, व तैलपराजाच्या सामन्तामध्ये प्रथमस्थानीं राहावें"

भिल्लमानें आठ चावला. तो खाली वाकून पाया पडला.

"चल! आता! बखतर काढून स्वस्थ हो." असें म्हणून मृणालने तैलपाला आपल्या बरोबर घेतले. तैलप मागें वळून म्हणाला:—"भिल्लमराज तुम्ही पण या. जरा काम आहे"

ती भावंडे पुढें व सामन्त मागे, अशातऱ्हेने काहीं देखिल न बोलता तिघेजण अंतःपुरात गेलीं व इतर जन देखिल हळहळ चालले

आंतील खोलींत खाली मान घालून फक्त नेत्रांनीच आनंद आणि उत्साह दर्शविणारी जक्कलादेवी, अर्धे अधिक वय झालें होते तरी नणंदेच्या मर्यादेने एखाद्या नववधूप्रमाणें पतीची मार्गप्रतिक्षा करीत होती. तैलपानें, आल्याबरोबर आपल्या अंगावरील बख्तराचे भाग आणि इतर आयुधें एकामागून एक काढून टाकिलीं; व राणीनें तीं घेऊन जाऊन मूकवृत्तीनेंच आपल्या पतीचा सत्कार केला

तैलप निवृत्त झाला व मृणाल तक्क्यापाशीं बसली होती, तिच्या जवळ जाऊन बसला त्याच्या समोर भिल्लम मांडी घालून बसला. आपल्या नणंदेपाशीं नेत्र संकेतानेंच जक्कलेने तेथे राहण्याची परवानगी मागितली, पण ती न मिळाल्या-मुळे ती तेथून निघून गेली.

" माई ! आता मुंजाचें काय करावयाचं ? "

उत्तर देण्यापूर्वी थोडा वेळ पावतों जरा दिमाखाने मृणालनें भावाकडे पाहिले, त्या क्षणीं तिला मुंजाचें प्रतापी हंसतें मुखकमल तिच्या डोळ्यासमोर आलें

" याला ! या मुंजाला ! ! " दात ओंठ चावून मृणाल म्हणाली —"याला या पापाचाऱ्याला शक्य असेल तेवढी सक्त शिक्षा दिली पाहिजे "

"उद्या याची गर्दन उडवूं तर !" दृढतेनें तैलप म्हणाला त्याच्या खोल क्रूर डोळ्यांत जणूं विष भरलें होतें.

" हा कांही तुझा साधारण शत्रु नाही. यानें तुझ्या बाबतींत काय शिल्लक ठेविलें होतें ? तुझ्या देशांतील स्त्रियाना पुत्र असून देखिल यान वाझ केल्या अवन्तीनगरींत तुझ्याकडून त्याने अनेकवार आपले पाय धुतविले—तुझी आणि माझी कीर्ति कलंकित करण्यासाठीं त्याने अनेक काव्यें केलीं व करविलीं. याला तर हालहाल करूनच मारलें पाहिजे, तरच तुला तुझ्या अपमानाचा पूर्ण सूड उगविता येईल."

" माई ! मग कशातऱ्हेनें आपण आपला सूड उगवावा ? " तैलप विचार करून म्हणाला

"भिल्लमराज ! या बाबतींत आपला काय विचार आहे ?" मृणालनें विचारलें.

" माईसाहेब ! कैद केलेल्या राजाचा वध करण्यात कांहीं मोठेसें भूषण अथवा मोठेपणा आहे, असे मला वाटत नाही. याने शक्य तेवढे हाल

केले पाहिजेत; पण याचा जीव घेता उपयोगीं नाहीं. याला जिवंत ठेवून याचे हाल करण्यातच सुडाची खरी परिसमाप्ति होईल."

" महासामन्त ! वध म्हणजे वधच. मग तो युद्धांत होवो अथवा सुळावर होवो. त्यात मला कांहीं मोठासा फरक दिसत नाहीं. " तैलप राजा जरा तिरस्कारानें म्हणाला.

" नाहीं, तैलपराज, असें नाहीं. महासामन्ताचें म्हणणें मला योग्य आहे, असें वाटते. याचा वध करून आपणाला लाभ तरी काय होणार ? याचें धिप्पाड डोंगरासारखें शरीर क्षीण होऊन जाईल, याचे नेत्र निस्तेज होतील, व तुझ्या मेहरबानीची याचना करता करता याच्या जिभेला श्रम होऊन ती पातळ होईल—याच्या गर्वाचा परिहार होईल—तेव्हांच सोळा वळ तुला जी हार खावी लागली त्याचे योग्य उट्टे घेतलें असें होईल. " जणूं काय एखादी साधीच गोष्ट सांगत आहे, अशा तऱ्हेच्या शांतीनें मृणालनें वरील भयंकर वाक्यें उच्चारली.

तैलपाच्या मुखमंडळावर संतोष पसरला " माई ! अगदीं खरी गोष्ट आहे. पण याचा गर्व उतरणें हीं साधी व सोपी गोष्ट नाही, असें लोक म्हणतात. "

" त्यात काहीं तथ्य नाहीं त्या वायफळ लोकवार्ता आहेत. " तिरस्कारानें मृणाल म्हणाली. " मी पाहीन कीं याचा गर्व किती टिकतो तें "

" तुम्हीं ? " चकित होऊन तैलपानें विचारले

" होय मी स्वत., अवन्तीला बसत्या बसल्या माझ्या छावनीत यानें काही तरी बाकी ठेविले होतें काय ? काय काय कंड्या पिकविल्या आणि काय काय विलक्षण कविता करविल्या व गावविल्या. आता मी पाहीन कीं माझ्या तोंडावर काय म्हणण्याची याच्यात हिंमत आहे ती. याला कोठें अटकेंत ठेविलें आहे !"

" राजमहालाच्या भुयारात. " तैलप म्हणाला.

" बरें तर—मी सायंकाळीं त्याच्याकडे जाईन. दुसऱ्याच्या बाबतींत कसें काय आहे ? "

"कार्तवीर्याबरोबर सामन्ताला मी निरोप पाठवून विचारिले आहे कीं, ते माझी ताबेदारी करण्याला तयार आहेत कीं नाहींत. जे माझी ताबेदारी स्वीकारणार नाहींत, त्याचा उद्ईक वध करण्यात येईल. बाकीच्या लोकांविषयी देखिल उद्ईकच पूर्ण विचार करून निकाल करूं "

" बरें आहे ! "

" भिल्लमराज !" तैलप म्हणाला. "माई आहेत हेंहि एक प्रकारें उत्तमच झालें. आतां बोला मुळींच सकोच करू नका. तुम्हाला जें कांहीं मागावयाचें असेल तें वरदान मागून घ्या. या वेळीं तुम्हीं जी सेवा केली त्या सेवेचा मोबदला मला देता येईल तितका थोडाच आहे. तुम्ही खरोखर अमोल सेवा केली. "

" महाराज ! यांत आपला थोरपणा आहे. " भिल्लम जरा हळूंच म्हणाला. " मी जे काहीं केलें आहे, तें मोबदल्याच्या आशेनें केलेलें नाहीं. "

" महासामन्त " मृणाल म्हणाली. " वर मागण्याचा तुम्हाला पूर्ण अधिकार आहे. "

" माईसाहेब ! मी काहीं मागितलें व तें आपणाला पुरात पडल नाहीं म्हणजे त्यांत माझा व आपला दोघाचाहि बोज जाईल. " महासामन्त मृणालकडे पाहून म्हणाला.

" तुमच्या विवेकबुद्धीविषयीं व महाराजाच्या उदारतेच्या बाबतींत माझा पूर्ण विश्वास आहे तुम्ही म्हणता असे होणे शक्यच नाहीं. "

" बोला ? " तैलप जरा मधुर हसला व म्हणाला. " बोला ! संकोच ठेवूं नका. तुमच्या मैत्रीपेक्षा मला दुसरी कोणतीहि वस्तु अधिक प्रिय नाहीं. "

महासामन्त या बहीणभावाच्या भयकर जोडीकडे थोडा वेळ पाहात राहिला. व मग हळहळ त्यानें बोलण्याला सुरुवात केली.

" महाराज ! माझ्या हृदयांत एकच उर्मि आहे व ती आपण जाणतच आहां !"

" कोणती ? "

" सत्याश्रय कुमारसाहेबांनी विलासचे पाणिग्रहण करावे हीच. "

मृणालची हसतांना मुरकुंडी वळली. " अहो महासामन्त ! हा वर मागण्याला एवढा वेळ व इतके आढेवेढे. खूप केलांत. अहो हा वर तुम्हाला या पूर्वी कधींच मिळालेला आहे यांत नवीन तें काहींच नाहीं. "

" पण माझी एवढीच इच्छा आहे कीं, कुमारसाहेबाच्या लग्नाचा मांगलिक प्रसंग जितक्या लौकर उरकेल तितकें चांगलें. "

" ते तर मी यापूर्वीच नक्की देखिल करून ठेविले आहे " मृणाल म्हणाली.

" केव्हा नक्की केलेंत ? "

" पुढील मासात. मी केव्हाच पुरोहितास मुहूर्त देखिल विचारून ठेविला आहे व आता तर या विजयसमारंभाबरोबरच लग्नसमारंभ उरकून घेऊ. "

" भिल्लमराज ! " हंसून तैलप म्हणाला " कांहीं दुसरे मागा. तुम्ही मला असे ओशाळवाणें का करितां. काय ? माझ्या जवळ असें कांहींच नाही, कीं जे मी तुम्हाला देऊं शकणार नाहीं व त्यामुळे तुमच्या मनाला आनंद होणार नाहीं ?"

भिल्लम विचारात पडला. तैलपाला तो चांगल्यातऱ्हेने ओळखीत होता. त्याला थोरपणा पाहिजे होता. वरदानापासून मिळणाऱ्या मोठेपणाची त्याला चाड होती, व ज्याना आपले म्हणून तो म्हणत असे त्यांच्या ठिकाणचा असंतोष त्याला दूर करावयाचा होता. पण त्याबरोबरच त्याला हहि माहीत होते की, त्याला आवडणार नाही असा वर मागितल्यास तो केव्हांहि देणार नाहीं, व यदाकदाचित् दिला तर दुसऱ्याच घटकेला दिलेले तो परत हिसकावून घेईल. त्याला व लक्ष्मीदेवीला आपल्या देशी परत जावे, असें मनापासून वाटत होते. पण देशी जाण्याची इच्छा दर्शविणें हे बरें नव्हतें, व तशी इच्छा प्रदर्शित करणें शक्य नव्हते. अशा परिस्थितींत वर मागावा व तो न मिळाला आणि अशातऱ्हेने आपणाला अपमान सहन करण्याचा प्रसंग यावा, यापेक्षां पराधीनतेचे दुःख सहन करणें जास्त शहाणपणाचें आहे, असें त्याला वाटलें. एकाएकी त्याला एका गोष्टीची आठवण झाली. ज्या घटकेला मुंजाला चित करून तो त्याच्या छातीवर चढून बसला व बळजबरीनें त्याने त्याची शस्त्रे हिरावून घेतली, त्या घटकेला मुंजानें त्याच्या कानात कांहीं शब्द सांगितले, त्याचें त्याला स्मरण झाले.

" भिल्लम ! " मुंज म्हणाला होता–"माझें वाटेल ते होवो पण माझ्या कवींचें रक्षण कर " या शब्दांची विजयाच्या उत्सवात त्याला विस्मृति पडली होती. या वेळीं त्याला तिची स्मृति झाली.

अंतःकरणांत मुंजाबद्दल आदर प्रगटला. आपला पराजय झाल्याने आपल्याला यमराजाच्या दरबारातील आमंत्रण आलें आहे, अशा संकटसमयींदेखिल हा पुरुष आपल्या मित्राना विसरला नाहीं. तो पृथ्वीवल्लभ कोणीकडे व हा त्याचा विजेता कोणीकडे ! ! दोघात जमीन-अस्मानचें अंतर ! ! भिल्लमाच्या मनांत वरील विचार येताच तो थिराईने आणि दृढतेने म्हणाला --

" महाराज आपल्या राज्यात मला कशाची ददात आहे? पण आपली परवानगी असली तर आपल्यापाशी मी एक याचना करीन "

"काय आहे? खुशाल बोला " मृणालनें थोडें उपेक्षणतेनें भिल्लमकडे पाहिलें.

" माळव्याच्या कवींना जिवत सोडून द्यावें " जलदीनें भिल्लमानें आपली याचना कळविली

तैलप हसला. मृणालच्या भुवया संकुचित झाल्या " मागून मागून हे मागितलें? " तिरस्कारानें मृणाल म्हणाली

" माईसाहेब! पूर्वजाची कावजनपाळक अशी ख्याति होती. माझ्या पूर्वजांप्रमाणे मी तर काहींच करूं शकलो नाहीं. एवढाच एक योग आला आहे. "

" अशा पाप्यांच्या जिवत राहण्यानें उलट पृथ्वीला भार होईल. त्यांत तुम्हांला काय मिळणार? " मृणाल म्हणाली

" भिल्लमराज! राजा म्हणाला " अशा जतूंचे जीव वाचविण्यापेक्षा पुष्कळशा चांगल्या गोष्टी मागण्यासारख्या आहेत. "

भिल्लमाने दृढतेनें आपले ओठ दाबले. व तो म्हणाला:– " महाराज आपणाला माझी विनती मान्य करावयाची नसली तरी आपण मालकच आहा. आपण आज्ञा केली म्हणून मी मांडलिक एरवीं मी काहीं मागण्यासाठीं आलों नव्हतो."

" बरें! याना सोडून मग पुढे काय करणार? " तैलपानें प्रश्न विचारला.

" आपण सागाल ते. मला यांच्याशी काहीच कर्तव्य नाहीं. "

" बरें आहे कांहीं हरकत नाहीं या सर्वांकडून मुंजाची अपकीर्ति गाववूं. "

" आपल्या मर्जीला येईल तसें आपण करावें. त्याना वांचवा म्हणजे मला पुरें आहे "

" बरें, यावें आतां. " तैलपानें थोडीशी माईकडे दृष्टि वळवून म्हटलें. "यांना जिवंत जाऊं दिले आहे. झालेंना? पण यांना मोकळे फिरूं देऊं नका. "

" आपली आज्ञा मला शिरसावंद्य आहे. यांना मी माझ्या महालातील भुयारांत ठेवीन. " भिल्लमानें विचार केला कीं आतां जास्त वेळ येथें बसण्यांत अर्थ नाहीं. " महाराज! मग आतां मला परवानगी—"

" होय! तुम्हांला जाण्याची परवानगी आहे. सभेच्या वेळी या म्हणजे झालें."

" आपले आज्ञेप्रमाणें मी हजर होईन. " असें म्हणून भिल्लम तेथून निघाला.

" तैलपराज ! " मृणाल म्हणाली " या माणसावर माझा विश्वास बसत नाहीं."

" मनुष्य तर निखालस सालस आहे; पण याची स्त्री याला स्वस्थ बसूं देत नाहीं. म्हणून तर मी याला वर मागण्याला सांगितलें. "

" हा अकलंकितचरित आला वाटतें ? " कोणाच्या पावलाची चाहूल ऐकून मृणालनें विचारलें तैलप मात्र दरवाजाकडे पाहत राहिला.

एक युवक आला. त्याचें वय सुमारें वीस बावीस वर्षांचें असावें, असें दिसत होते. त्याचा तोंडवळा तैलपासारखाच होता. त्याच्या सरळ आणि सशक्त शरीरावर अमूल्य असें बखतर विराजत होतें व मस्तकावरील लहानसा मुकुट त्याच्या सुस्वरूप मुखकमलाच्या गौरवाची अभिवृद्धि करीत होता. आत येताक्षणींच त्यानें मृणाल व तैलप यांना साष्टांग प्रणाम केला व हात जोडून तो जवळच बसला

" बाळ सत्याश्रय ! तूं काय काय केलेस ? "

" बाबा ! " गंभीरतेनें कुमार म्हणाला. " सध्या महालाच्या भुयारात मुंजाला ठेविलें आहे व भीमरस सामन्ताला तेथें पाहऱ्यावर ठेविलें आहे. "

" बरें केलेंस. "

" शिवाय एक लोकडाचा पिंजरा तयार करण्याविषयीं हुकूम दिला आहे "

" शाबास ! " तैलप म्हणाला. " सत्याश्रय तुझें लग्न नक्की झालें ! "

सत्याश्रयानें विनयानें मान वाकविली.

" या विजयोत्सवांत तो देखील उत्सव झाल्यानें विशेष शोभा येईल. " मृणाल म्हणाली. " जा. आतां तू जा व निवृत्त हो. "

नमस्कार करून तो उठला.

" पण मग विलासवतीला भेट हो. "

" बरें तर. " असें म्हणून सत्याश्रय कुमारानें आपल्या आतेची व पित्याची परवानगी घेतली व तो तेथून निघाला.



# प्रकरण ६ वें.

## रसनिधि.

राजाने आपणाला वरदान दिलें तर खरें, पण कदाचित् तें कांहीं कारणाने परत घेण्याचा त्याना विचार झाल्यास मोठीच पंचाईत, घटकेंत काय होईल आणि काय नाहीं —अशी भीति भिल्लमाच्या मनांत उत्पन्न झाल्यामुळें राजमहालातून तो परभारें जेथें मालवीय— कवींना कैद करून टेविलें होते, तेथे गेला.

कवींवर पाहरा करणाऱ्या भट्टराजाला राजाचे वरदान ऐकून अचंबा वाटला; त्याने महासामन्ताला कारागृहाचें द्वार खुलें करून दिलें.

भिल्लमराजाला कारागृहात पाहतांच त्याठिकाणीं असलेल्या मंडळीमध्यें खळबळ सुरू झाली.

" कविराज ! मला क्षमा करा. " भिल्लमराज नम्रतेने म्हणाला. " माझ्या आदरातिथ्याचा आपण स्वीकार करावा, अशी प्रार्थना करण्याला मी आलों आहे"

एक सुकुमार, ठेंगणा आणि स्वरूपवान् युवक उठून पुढें झाला; व त्यानें हंसत हंसत विचारलें:—" आपण कोण ? महाराज वाटतें ? "

भिल्लम त्याची कांति पाहून म्हणाला:—" मी ? तो नव्हे कां बरें ? "

" रसहीन मृणालवतीच्या गावांत यमराजाशिवाय आमचा आदरसत्कार तरी कोण करणार ?" एक दुसराच इसम पुढें होऊन म्हणाला.

" धनंजय ! " पहिला युवक म्हणाला. "हा स्वतः यमराज नाहीं; पण हा यमराजाच्या दूतांपैकीं श्रेष्ठ असा स्यून देशचा नराधिप आहे. "

भिल्लम हसला. " नाहीं मी फक्त महासामन्त आहे. मी यमदूत तर नाहीं, पण या जिवंत नर्कपुरींतून तुम्हाला वांचविणारा आहें.

*धनंजय म्हणाला —" पृथ्वीवल्लभहीन पृथ्वीवर आतां काय राहिलें आहे, कीं जेणेंकरून जगण्यांत आनंद वाटावा ? "

---

* दशरूपकाचा कर्ता.

" नाहीं ! महाराजानें आपणाला जीवदान दिलें आहे; आपण सर्वजणांनीं माझ्या घरीं चलावें "

हे ऐकून सर्व जण चकित झाले, शुद्धीवर येऊन महासामन्ताच्या सभोवार हर्षित होत्साते उभे राहिले

" तुमचें नांव तर धनंजय—"

" होय "

" व तुमचें ? " त्या स्वरूपवान युवकाकडे वळून महासामन्ताने विचारलं-

" माझें ? " जरा कांकू करीत पहिला युवक म्हणाला

" याचें नाव रसनिधि " धनंजयानें पुस्ती जोडली, व " हा परमगुप्त. "

" होय, माझें नाव रसनिधि " असें म्हणून तो भिल्लमबरोबर चालूं लागला; व सर्वजण त्याच्या मागून चालले.

रस्त्याने चालता चालता भिल्लमानें लक्षपूर्वक पाहिलें रसनिधीच्या सुकुमारतेच्या प्रमाणानुसार त्याचें शरीर बरेंच मजबूत होतें, शूरवीराच्या शरीरसामर्थ्याची परीक्षा करण्याची सवय असल्यामुळे महासामन्ताला वाटले, हा पुरुष बखतर घालून जास्त चांगला दिसेल, इतकेंच नाहीं, तर त्याच्या अंगावर बखतर घातल्यास तो एका उच्च प्रकारच्या योद्धयासारखा दिसेल, पण हा विचार मनांत येतांच तो हंसला. या बिचाऱ्याला बखतर घातलें ह्मणून काय झालें. याच्या ठिकाणीं युद्धकौशल्य थोडेंच येणार ?

कांहीं देखिल न बोलता महासामन्त राजमहाजवळील स्वतःच्या महाला जवळ आला, व आपल्या परिचरांना त्यानें आपणांबरोबर आणिलेल्या कविराजांचें आदरातिथ्य करण्याचा हुकूम दिला

" कविराज ! " धनजयाकडे वळून भिल्लम ह्मणाला. " आपल्याला एक तसदी द्यावयाची आहे. "

" मला ? कोणती बरें ? " धनंजयानें पृच्छा केली.

" माझ्या स्त्रीला व कन्येला बरेंच वर्षांत कविदर्शन झालें नाहीं, तेव्हां आपण कृपा करून माझ्याबरोबर याल ? "

' ज्या देशात कवि दुर्लभ असतील, तेथें स्वरूपातील सौंदर्य नष्ट झालें, राजे स्वाभिमानशून्य बनले, अर्थात् स्त्रियांच्या ठिकाणीं असलेली मृदुता व आर्द्रता नामशेष झाली, तर त्यांत नवल नरी कसलें ? " रसनिधि तिरस्कारानें ह्मणाला

' कविराज ! आपण याल काय ? '

" मी ? " पुन जरा त्रासिक मुद्रेनें व आढेवेढे घेऊन रसनिधि उत्तरला

" होय काय हरकत आहे बरें ? " धनंजयानें लक्षपूर्वक रसनिधीकडे पाहिलें

" रसनिधि ! तू देखिल चल. चला स्यूनराज ! " असें ह्मणून तो आणि रसनिधि भिल्लमाबरोबर अंत:परांत गेले

कविकुलपालक ' ह्मणून आपल्या पूर्वजांचें नामाभिधान भिल्लमराजानें आज कायम ठेविलें होते, त्याला बऱ्याच वर्षांनंतर अशा संस्कृत पुरुषांच्या सहवासाचा सुयोग प्राप्त झाला होता, व यामुळे आनंद आणि गर्व यानीं त्याचें अंत:करण उचंबळत होतें

लक्ष्मीदेवी अजून राजमहालातून परतली नव्हती विलास शिवमंदिरांत होता भिल्लमानें एका इसमाला विलासला बोलावू पाठविलं; व स्वत:, धनंजय आणि रसनिधि यांना बरोबर घेऊन महालामागील उद्यानांत एका विशाळ पिंपळाच्या चौथऱ्यावर गोष्टी करीत बसला

" बाबा " थोड्या वेळानें विलासचा आवाज ऐकू आला

" कोण विलास ! बाळ ! - "

विलास जवळ आली, तेव्हां महासामन्त ह्मणाला - " इकडे ये, तुला कवि पहावयाचे होते ना ? पहा तर '

विलासानें दोघां कवींकडे पाहिलें, व जरा बावरून ती स्तब्ध राहिली

" हा कवि धनंजय यांची ख्याति तर माझ्या स्यूनदेशापावेतों येऊन पोहाचली होती "

विलासानें नमून नमस्कार केला

" मुली ! रामचंद्रासारख्या नरेशाची अर्धांगना होऊन सूर्यासारख्या तेजस्वी पुत्राची माता हो " धनंजयानें आशीर्वाद देतांना स्वत:च्या वाणीचें अवडंबर माजविलें.

"हे, कविवर रसनिधि."

लज्जेनें अर्धवट खालीं पाहात व जिज्ञासेनें अर्धवट वर पहात विलासनें रसनिधीवर आपली दृष्टी रोखिली. विलासला त्याचें मुखकमल काहींसे विचित्र भासलें. ती विचित्रता कोणती होती, व तिचा तिच्यावर काय परिणाम झाला, हें तिला समजलें देखिल नाहीं.

"भगवति! आशीर्वाद देऊं?" रसनिधीनें हंसून विचारलें.

"सुधानाथावरून सुधेचा आस्वाद व अकल्पित अनंतानंदाचा अनुभव घे."

विलासवतीला या आशीर्वादाचा स्पष्ट अर्थ समजला नाही, पण महासामन्त खदखदा हसला.

"कविराज! हा अवन्ती नाहीं."

"असें का? नाहीं तर मी या स्थितींत असतों वाटतें."

"आमच्या येथें सुधानाथ तर सुकून गेला आहे, व आनंद अनुभवणें ही पापाची परिसीमा आहे."

"हं!"

"मृणालवती माईसाहेबांचें वैराग्य तुम्हीं पाहिलें नाहीं. हा विलास देखिल कशी आहे? तिनें तर आतापासूनच तपश्चर्या सुरू केली आहे."

"कशासाठीं?" धनंजयानें विचारलें.

"कविराज! तैलंगणाची खुशी काहीं औरच आहे."

"पण एवढयाशा कुमारिकेला हें खडतर वैराग्य आणि असली शिक्षा! सर्व कशासाठीं?"

"विलासचें लग्न सत्याश्रय कुमारसाहेबांबरोबर व्हावयाचें आहे, तेव्हां मान्यखेटाच्या तख्ताधिपतीच्या पट्टराणीला साजेसें शिक्षण पाहिजे ना?" जरा अस्पष्ट कटाक्षमयतेनें भिल्लम उत्तरला. "काय? खरें की नाहीं विलास?"

विलास हसली. दोघेहि कवि दयार्द्रतेनें तिजकडे पाहूं लागले.

"म्हणजे हृदयांतील प्रेमाचे झरे सुकले कीं, पट्टराणीची पदवी मिळेल?" धनंजयानें प्रश्न केला.

" आमच्या माईसाहेबांची अशी समजूत आहे विलास, बैस. इकडे ये या सर्व कवींना सोडवून आणिलें आहे. आता हे आपल्या येथें राहातील "
विलास येऊन भिल्लमाजवळ उभी राहिली; व मुकाट्यानें तिघाकडे पाहूं लागली

तिला एक अपरिचित अनुभव होत होता त्या लोकाचा पेहेराव विचित्र होता त्यांची रीतभात स्वच्छंदी असून तिच्यांत थंडपणा नव्हता. ज्या गुणाचा तिला भक्त म्हणून वनविलें होतें, त्या गांभीर्याचा आणि संयमाचा त्यांच्या वागण्यात पूर्ण अभाव होता त्यांच्या तोंडावर कडकपणा किंवा शहाणपणा यांचा अंश देखिल दिसत नव्हता या सर्व गोष्टीमुळें तिला हें वातावरण कांहींसे अस्वाभाविक वाटलें व त्यामुळे आपल्या अंत:करणाच्या ठिकाणीं कांहीं आघात होत आहे, दुःख होत आहे, असे तिला वाटलें पण हे आघात व हे दुःख तिला इतकें आकर्षक वाटलें कीं, तेथून हलण्याला तिचें मन होईना

" तेव्हा आपल्या राज्यांतून कवींना हद्दपारीची शिक्षा देण्यांत आली आहे, ही गोष्ट खरी आहे तर ? " रसानंदानें विचारलें " मला तर ही गोष्ट खरी आहे असे वाटले होते या गोष्टीवर माझा मुळीच विश्वास बसेना "

" आमच्या येथें जें होणार नाहीं तें सोड. " भिल्लम म्हणाला.

" तुमच्या येथें कविता नाहीं, रस नाहीं, आनंद नाहीं, मग राहिलें तरी काय ?

" बाळ ! विलास ! उत्तर दे. "

हळूच वर मान करून तिनें रसनिधीकडे पाहिलें व उत्तरली—"त्याग व शान्ति. "

" कितीजणांनीं त्यागाचा आणि शान्तीचा खरोखर अनुभव घेतला आहे ?"

" आम्ही सर्वजण तर देव आहों. " भिल्लमानें हंसतां हंसतां सांगितलें.

" देव देखिल आनंदाच्या मूर्ती आहेत. पण तुम्ही तर पाषाण होण्याच्या तयारीत आहात "

" या वेळीं दवा हजर असती तर तिला या तुमच्या संवादापासून अत्यानंद झाला असता. "

" दुसरें सर्व कांहीं चंचल आहे—निश्चल फक्त एकच. शान्ति " पोपटाप्रमाणें विलासनें सूत्र म्हटलें.

" नाहीं ! ती देखिल चळणारी आहे. निश्चल फक्त आनंद "

विलास थोडी तिरस्कारानें हसली.

" शान्तीशिवाय आनंद कसा मिळणार ? "

" सुखाच्या अनुभवानें "

" ते तर क्षणिक "

" कोणी सांगितलें ? रसिकता असली तर शाश्वत सुख मिळतें "

देवी अजून का वरें आली नाहीं ! मी आताच माणूस पाठवितो, असें ह्मणून चाललेल्या गोष्टींत जास्त रस वाटत नसल्यामुळें महासामन्त उठला " तुमचें चालूं द्या. मीं हा आलोंच " असें पुढें सांगत भिल्लम धनंजयाला घेऊन दूर गेला.

भिल्लम उठला, तेव्हां धनंजयानें जवळ येणाऱ्या पावसाच्या सरीकडे दृष्टि टाकली व तोहि उठला

# प्रकरण ७ वें.

## रसिकता

"रसिकता म्हणजे ? " विलासने प्रश्न केला

रसनिधीनें डोळे वटारले-" तुम्हाला माहित नाहीं ? "

" नाही. "

" तुम्ही काव्यं ऐकली आहेत ? "

विलास हंसली ! " तुमच्या भर्तृहरीचें वैराग्यशतक ऐकलें आहे "

" शृंगारशतक ऐकलें आहे ? "

विलासने करड्या नजरेने वर पाहिलें " तें तर पापाचाऱ्यासाठी आहे "

रसनिधि हसला. " एखादें नाटक तरी पाहिलें आहे ? "

" मी अगदींच लहान होत्ये, तेव्हा स्पेन देशात एक नाटक पाहिलें होतें, पण आता आठवत नाहीं ? "

" चंद्रज्योत्स्नेत बसल्या बसल्या कधी गाइलें आहे ? "

" नाहीं. चंद्रप्रकाशात फिरणें मला त्याज्य आहे "

रसनिधि गंभीरतेने तिच्याकडे पाहूं लागला

" तेव्हा तुम्हाला रसिकतेचें कोठून ज्ञान होणार ? हे सर्व तुमच्याकडून कोण करवितो ? "

" मी स्वतःच आपल्या खुशीनें करिते गाईसाहेब फक्त मला सूचना करितात. "

" पण हें सर्व करण्याचें प्रयोजन तरी काय ? "

" त्यागवृत्तीसाठीं. "

" अशानें का त्यागवृत्तीचें शिक्षण मिळणार ? तुम्ही कोणता त्याग करता याचें तुम्हा स्वतःला देखिल भान नाहीं ? "

विलास विचारात पडली. " नाहीं मला भान आहे. मला माई सांगतात "

" फक्त तोंडच्या गोष्टी अनुभवाच्या नाहींत "

" कलंकित करणाऱ्या वस्तूचा अनुभव—"

" कोणती वस्तू कलंकित करील ?" रसनिधीनें रागानें विचारलें " जर काव्य कलंकित करील, रस कलंकित करील ? जोत्स्नेचें अमृत कलंकित करील व उद्या म्हणाल की प्रेम पण कलंकित करील, तर असलें कलंकित जीवन काय वाईट ?"

" मला निर्मळ व्हावयाचं आहे " हा कडकपणानें विलास म्हणाली व उठली

रसनिधि स्तब्ध झाला. थोडा वेळ त्यानें मौन धारण केलें, व मग तो म्हणाला. " तर मग तुम्हाला माझ्यासारखे पुरुष कलंकित वाटत असतील ! "

" भोलानाथ तुम्हाला सुबुद्धि देईल "

रसनिधि घोटाळला व उभा राहिला.

" रसिकतेचा अनुभव घेण्याचें तुम्हाला कधी मनच झालें नाहीं ! "

" मला ?" विचारांत गर्क होऊन विलास म्हणाली " या बाबतीत पुरी माहिती नाही, किंवा त्याचा विचार देखिल मला शिवला नाहीं "

" विचार करण्याचे पण मन होत नाही ?"

" पाप करण्याचें मनानें घेतलें नाही तर त्यांत वाईट ते काय ? "

" विलासवती ! " रसनिधि ममतेनें तिच्याकडे पाहून म्हणाला –" रसिक होणें, रसिकतेचा अनुभव घेणें यालाच मी मोक्ष मानतो "

" नाहीं, नाहीं नाहीं, " कानावर हात ठेवून, हसून विलास म्हणाली. तिच्या हंसण्यांत काहीं निराळाच भाव दिसत होता. " ही पहा आई आली"

असें म्हणून ती दुरून येण्याऱ्या भिल्लम आणि लक्ष्मीदेवी यांचेकडे वळली तीं उभयतां मुक्यानें पुढे चालली व रसनिधीनें लक्ष्मीदेवीला प्रणाम केला

" कविराज ! आमचें आंगण आज फार दिवसांनी पुनीत झालें. " लक्ष्मीदेवीनें आपल्या पतीकडे अमळ तिरस्कारानें पाहून म्हटलें.

" आईसाहेब! मला नव्हते वाटले की, या शुष्क देशांत आमचा एवढा सन्मान होईल. धनंजय! देवी आल्या आहेत. " रसनिधीनें हाक मारली. कमलपत्रे निहाळित असलेला धनंजय इकडे आला

" कविराज! हें घर आपलेंच आहे, असे माना " राजकूट राजांच्या अंगवळणी पिढयानपिढया पडलेले संस्कार दाखवीत गौरवानें लक्ष्मीदेवी म्हणाली तिची बोलण्याची रीति राजनंगाला अनुरूप अशीच होती

" मात्र माझी एकच प्रार्थना आहे "

" कोणती ? " आलेला धनंजय म्हणाला

" आमच्यावर मेहेरबानी करून आपल्या विनोदवार्ता बाहेर पडणार नाहींत, यावर विशेष लक्ष असूं द्या नाही तर आपला समागम फारच लौकर संपेल. "

" देवी! " भिल्लम म्हणाला, " हे काय म्हणता ? "

" खर खर, असले पाहुणे जितके जास्त राहतील तितकें चागलं. कारण मग थोडका तरी याचा समागम लाभणार आहे! " लक्ष्मीदेवीच्या आवाजात कटुता होती

भिल्लम मुका राहिला. रसनिधि लक्ष देऊन ऐकूं लागला " विलासा हे कवि पाहिलेस ? "

" होय ' " खालीं मान घालून हसत हसत विलास म्हणाली

" कविराज ' चलात चला आता माध्यान्हाची वेळ होत आली "

" जशी आज्ञा "

" विलासा! तू कोठ जाणार ? " लक्ष्मीदेवीने विचारलें

" मला अजून जप करावयाचा आहे. "

" बरें! पण कविराज! आपणा सर्वांत शिरोमणी कोण ? " भिल्लमाने विचारलें धनजयाने थोडा विचार केला व डोळे मिचकावित म्हणाला —

" महाराज! स्यूनदेशाधिपति भिल्लम —"

सर्व हसल

" मी — "

—" ज्याचा शब्द ऐकताच समस्त कविमंडळाच्या जिव्हाग्री सरस्वती नृत्य करिते, अशा रमेश्वर म्हणून ख्याति असलेल्या मुजराजाला आपण चित केले."

भिल्लम गर्वानें हंसला. ही स्तुति असत्य होती, तरी पण त्याचें अंतःकरण आनंदित झालें, परंतु या आनंदाला त्याची पत्नी जास्त वेळ टिकूं देणारी नव्हती. ती लागलीच म्हणाली.—

" कविराज ! असेंच कां म्हणाना कीं गर्वांत, मोठा कवि म्हणजे मृणालवती माईसाहेब ! "

" कसें बरें ? "

" तुमच्या स्यूनराजाच्या मनाला पूज्य म्हणजे तैलपराज, व तैलपराजाच्या गर्वाचा परिहार करणाऱ्या मृणालवती माईसाहेब ! "

भिल्लमाच्या तोंडावर थोडी लाली चढली जरा रागानें त्याचे डोळे लक्ष्मीदेवीकडे वळले. लक्ष्मीदेवीनें आपल्या पतीला राग आला आहे, असें पाहताच गोष्ट फिरविली.

"कविराज ! विदर्भ देशातील भवभूतींचीं काव्यें आपणाला अवगत आहेत?"

" आपण भवभूतीचें नाव कोणाकडून ऐकलें ? ",

" मी लहान असताच माझ्या पित्याकडे तिकडील कवि येत व ते त्याचे गुण गात. ते म्हणत असत कीं, या कलियुगांत भवभूतीसारखा कवि झाला नाही, व पुढें होणारहि नाहीं.

" आमचा हा रसनिधि भवभूतीचा कट्टा भक्त आहे. "

" हं ! "

" होय—याला त्याचीं सर्व नाटकें मुखोद्गत आहेत. "

" पण आई ! या कवीचें तूं तर मजजवळ कधीं नांव देखिल काढलें नाही." विलासनें आश्चर्यानें विचारिलें.

" बाळ ! "निश्वास देत लक्ष्मी म्हणाली. " या कवीचें नाव अथवा त्याच्या गोष्टी तुला सांगून मग मी कोठे जाऊं ? "

विलासला कांहींच समजलें नाहीं तिला सांगण्यात हरकत कोणती होती ? त्या वेळी ती जास्त बोलली नाहीं, पण सर्वांना नमस्कार करून ती तेथून राजमहालांतील मंदिराकडे गेली

# प्रकरण ८ वें.

## सत्याश्रयाचे मंवनन ( वशीकरण )

विलास मंदिरात परत गेली, तेव्हा आपल्यात काही बदल झाला आहे, अथवा आपली स्वतःची वृत्ति काहीं पालटली आहे, असें तिला वाटू लागलें. इतकेंच नाही पण सूर्याच्या ठिकाणी काही निराळेंच तेज आहे, वृक्षलतांच्या ठिकाणी काहीं औरच खुबी आहे, याचे तिला भान होऊं लागलें, व जप करावयाला बसली असतांच तिची नेहमींची शांति तिला मिळेना. तिचेठायीं जप करतांना अननुभवित निरनिराळे विचार येऊं लागले

तिला धनंजय व रसनिधि हे काही निराळ्याच प्रकारची मनुष्यें आहेत, असें वाटलें त्यांच्या हसण्यात संयम नव्हता. त्यांच्या वाणींत गांभीर्य नव्हते, व त्यांच्या शब्दांत चोखपणा आणि स्थिरता नव्हती ते पापी इसमाप्रमाणे स्वच्छंदी भासले असें होतें तरी देखिल त्यांच्या रीतीभातीवरून तिच्या मनाला पटेल अथवा आवडेल, अशाप्रकारचो विचित्रता त्यांचेविषयी तिला वाटू लागली तिचें शिक्षण, तिच्या चारित्र्याच्या भावना आणि तिचे विचार यामुळे तिच्या संस्कृत झालेल्या मनाच्या दृष्टीला दोघेहि तुच्छ संयमविहीन, आणि स्वच्छंदी वाटू लागले, तरी पण तिच्या ठिकाणी असें काही होऊं लागलें की, त्यांच्या गोष्टी पुन ऐकाव्या व त्यांना पुन पहावं.

कधी कधी लक्ष्मीदेवीविषयी तिच्या मनांत सादर प्रेमभावना स्फुरत व व बाहेरून जरी ती शांत असे, तरी पण बरेच वेळा तिला भेटतांना, तिच्या गोष्टी ऐकतांना व तिच्याकडून शाबासकी मिळवितांना तिला न समजणारें व न कळणारें, असें काही होई. तसेंच या लोकांना बघून तिला झालें

तिला रसनिधीची दया आली. बिचारा रसिकतेलाच मोक्ष मानीत होता कसला हा मोह ! काय हे अज्ञान ? कसा चांगला माणूस अशाप्रकारच्या भ्रमाच्या चिखलांत रुतून सडत पडला होता ? तरी पण तो दुःखी दिसत नव्हता

त्याच्या नेत्रात आनंद होता, अशी शांति जीवन्मुक्त मृणालवती माईसाहेबांच्या ठिकाणी देखिल नव्हती, असे का बरें असेल ?

ही रसिकता कशी असेल ? या रसिकतेच्या ठिकाणी काय असेल ? रससृष्टीला ती अज्ञात होती. रससृष्टीचे विविधरंग तिने पाहिले नव्हते, व त्यांची पारख ह तिने केलेली नव्हती तिच्यापासून मोक्ष मिळेल ? शान्ति मिळेल ?

तिला मुंजाची आठवण झाली. मृणालवती माईसाहेब त्याला पापाचारी म्हणत होत्या, पण तिला मुंज हा आनंद व शान्तीची मूर्ति आहे, असे वाटलं पापी इसमाचे ठिकाणी अशी शान्ति असणे संभवते ?

ती जप करावयाला बसलं, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तिचं विचार रसनिधि व जनंजय याकडे वळले

तिच्या मनात विचार आला की, आईने देखिल कविता ऐकल्या होत्या तेव्हा मला काय म्हणून कविता तिने ऐकविल्या नाहींत ? कवीच्या कवितेचं श्रवण केलें असून देखिल लक्ष्मीदेवी कांहीं कलंकित नाही तेव्हा कवीच्या ठिकाणी असं काय होते कीं, मृणालवती माईसाहेबानी त्याना हद्दपार केले होते.

शेवटच्या प्रश्नाचे उत्तर तिला सोपे वाटले. अशा स्वच्छंदी लोकाची देशात वसति असली, म्हणजे लोकाचे शुद्ध आणि नियमित जीवन भ्रष्ट होऊन जाईल

असे विचार करता करता असें वाटू लागलं की, ती स्वत. दंभित होत आहे. संयमाच्या शुद्ध वातावरणामधून सामान्य अधम जीवाप्रयाणें गोते खात खालीं उकिरड्यावर ती उतरत आहे. तैलंगणाची साम्राज्ञी होण्याचे, किंवी शुद्ध आणि प्रभावशाली वीराची अर्धांगना होण्याचे, स्वतःच्या चारित्र्याच्या बळावर सर्व संसार शुद्ध करण्याचे जिच्या भाळी लिहले होते; तिला अशाप्रकारचा मूर्खपणा शोभतो ? हा विचार येताच तिचे मन जप करण्याकडे लागलं, व कवींच्या समागमापासून उद्भवलेल्या उर्मी शमल्या.

ती जप करण्यासाठीं डोळे मिटण्याच्या बेतात होती, इतक्यांत तिच्या नजरेला सत्याश्रयकुमार पडला

शांत व मंद पण दृढतेच्या गतीने चालत, मुखमंडळावर कडकपणा व निश्चलता दाखवीत तैलंगणाचा भावी नरपति, आपल्या पित्याच्या वचनाला शिरसावंदन करून आपल्या भावी धैर्याला शिकविण्याला येत होता. त्याच्या मुख

मंडळावर उत्कट प्रेमभावना नव्हती, त्याच्या चालण्यांत उत्साह नव्हता; पण त्याच्या मुखमुद्रेवर कर्तव्यपरायणता होती

त्याला पाहताच विलास शरमली; व बुचकळ्यांत पडली त्याची प्रत्येक कृति पवित्र आहे, असेंच मानण्याचें तिला शिक्षण देण्यांत आलेलें होतें. त्याचा प्रत्येक शब्द म्हणजे निर्वाणीचा मंत्र आहे, असें तिला शिकविलें होतें. ज्याच्या ठिकाणीं तिचा ईश्वरासमान आदर होता, त्या आपल्या ईश्वराला सदेह आपल्याकडे येतांना पाहून तिला हर्ष झाला, तरी देखील कळत नकळत रसनिधि तिच्या दृष्टीसमोर उभा राहिला- तिच्या अंतःकरणांत अस्पष्ट असंतोष उद्भवला

सत्याश्रय आणि रसनिधि हे दोन्ही असे पुरुष होते कीं, दोघांना एकमेकां-मागून पाहिल्या नंतर त्यांच्या स्वरूपाच्या भिन्नतेचा विचार आल्याशिवाय राहणें शक्य नव्हतं

सत्याश्रय जास्त सुदृढ–मजबूत–होता. त्याच्या तोंडावर जास्त भारदस्त-पणा होता. व त्यामुळें त्याच्याविषयीं पाहणाऱ्याच्या मनांत आदर उत्पन्न होई, पण रसनिधीच्या ठिकाणीं असलेली छटा त्याच्या शरीरावर नव्हती. त्याच्या चालींत रसनिधीचा उत्साह नव्हता, व त्याच्या मुखावर रसनिधीचा आनंद व उत्कट प्रेमभाव याचा लेश देखिल नव्हता कवीला पाहताच आल्हादाचा प्रसार होई पण राजकुमाराला पाहणाऱ्याच्या मनांत त्रास उत्पन्न होई. एक समो-रील माणसाचें मन हरण करी तर दुसरा त्याचें मन आपल्या ताब्यांत ठेवी.

विलासला आपलें मन अशा तऱ्हेची तुलना करून असंतोष अनुभवित आहे, याचें भान देखिल नव्हतें पण तिला अपरिचित विचित्रता मात्र वाटत होती.

सत्याश्रय कुमार श्रीशंकराचें दर्शन करून विलासजवळ आला; व त्यानें एखाद्या देवीला जसा कोणी नमस्कार करितो, त्या स्वस्थतेनें, विलासला नम-स्कार केला " विलासवती ! नमस्कार."

" नमस्कार. कुमारसाहेब ! आपण विजयी होऊन आलां ? " लाजत लाजत विलास म्हणाली.

" होय भगवान पिनाकपाणी यांच्या कृपेनें बाबाचा विजय झाला "

" आणि मालवराजाचा पराभव झाला "

" होय सत्याचा जय ! "

‘ आपली प्रकृति बरी आहे ना ? ’ विलासने नम्रतेने विचारले, पण लागलीच रसनिधीबरोबर ती कशी मोकळ्या मनाने गोष्टी करीत होती याची तिला स्मृति झाली.

‘ होय प्रकृति चांगली आहे मी तुला आनंदाची बातमी सांगण्याला आलो आहे

‘ कोणती ? ”

परमेश्वराची कृपा झाल्यास आता लौकरच आपला लग्नसमारंभ होईल ’

“ हं ! ” उत्साहाच्या भरात विलास बोलून गेली

“ होय ” शांतीने सत्याश्रय म्हणाला “ बाबांची आज्ञा आहे ”

विलास लाजली. तिने लाजत लाजत खाली पाहिले. थोड्या वेळाने तिने विचारले “ माउसाहेब काय म्हणतात ? ”

“ त्यांनीतर कधीच मुहूर्त देखिल नक्की करून ठेविला आहे ”

विलासने काहीच उत्तर दिले नाही

“ विलासवती ! तुम्ही माउसाहेबांच्या परीक्षेत अगदी उत्तीर्ण झाला ”

“ असे का ! ”

‘ होय. आश्रमवासियांच्या पवित्र वृत्ती धारण करण्याला तुम्ही लायक झाला असे आम्हाला वाटते ’

‘ माझे सद्भाग्य ”

“ आपले व त्याबरोबर माझे देखील

विलास स्तब्ध राहिली

“ मग मी घेऊ रजा

“ जशी आपली इच्छा ” विलास म्हणाली

“ जय महादेव तर ” असे म्हणून सत्याश्रयकुमार आपले सवनन पूर्ण करून, आला होता त्याच स्वस्थतेने परत गेला.

सवननाचा विलासला असाच अनुभव होता, तेव्हा त्यात तिला काही विचित्र वाटले नाही पण न कळणाऱ्या अशा काही कारणामुळे तिचे अंतः-करण खिन्न होऊ लागले सोळा वर्षांत तिच्या अंतःकरणाने परिकल्पना उत्कट

प्रेमभावना अनुभविल्या नव्हत्या; व संयमाच्या सवयीमुळें हृदय एकदम शांतीला–स्वस्थपणाला मोडीत नसे. तेव्हा आज अशाप्रकारच्या स्पष्ट खिन्नतेचा अनुभव घेताना तिला कसेंसेंच वाटलें. नवीन अनुभव तिला फारच विचित्रप्रकारचा भासला. पण आज तिला इतके निरनिराळे विचित्र अनुभव मिळाले होते की तिनें या विचित्रतेविषयी जास्ती विचार केला नाही.

परंतु तिच्या मनांतील विचारशक्ति तिच्या नजीक आलेल्या लग्नप्रसंगा-पर्यंत जाऊन थबकली. ती लग्नाच्या बाबतींत साधकबाधक प्रमाणाचा विचार करावयास लागली. लग्नाचा अनुभव कसा होत असेल? काव्यनाटकांत लग्नाच्या पुष्कळ गोष्टी येतात, यांची तिला क्वचितच माहिती होती, तेव्हा त्यांत लोक विवाहग्रंथीनें कसे बद्ध होत असतील? यांची कल्पना तिला बरोबर नव्हती.

काव्य आणि कांहीं या दोघांसहि ती त्याज्य समजत होती, तरी देखिल त्या गोष्टीचा ती स्वतः अनुभव घेणार होती. ती गोष्ट दुसऱ्याला कशी वाटेल ते जाणण्याची तिला जिज्ञासा झाली. शेवटी या बाबतींत रमानवाला विचारून माहिती मिळविण्याचा तिनें निश्चय केला.



## प्रकरण ९ वें.

---

### प्रथम मीलन.

प्रभावशाली स्वभावाला अपरिचित असा क्षोभ—केवळ नावाचाच—अस्पष्टपणे मृणालवतीच्या अंतःकरणाला अस्वस्थ करीत होता. तिची हिंमत, तिचें संसाराविषयी वैराग्य, मुंजाच्या अधमताविषयींचा तिचा तिरस्कार ज्याच्या नसाच होता हा थोड्या अंशानं वाटला. वाटला तरी देखिल [illegible] पण तैलंगणच्या शत्रूला भेटावयाला जातांना तिचा स्वतःची नेहमींची स्वस्थता नाहींशी होऊं लागली. ही स्वस्थता गेल्याचा परिणाम असा झाला कीं तिची हिंमत कृत्रिम झाली व तिचा मुंजाविषयींचा तिरस्कार जास्त जोरदार बनला.

दुसऱ्या कोणत्याहि राजकीय कैद्याच्या भेटीला जाण्याचा विचार देखिल मृणालच्या मनांत आला नसता, पण मुंजाच्या भेटीला जाणें तिला स्वाभाविक वाटलें. यांत तिला आपण कांहीं विशेष अथवा अस्वाभाविक करतो अशी कल्पना देखिल शिवली नाहीं. मुंजाचा निःपात करावा व त्याला रसातळाला मिळवावें, ही तिची सर्वांत मोठी बऱ्याच वर्षांची अभिलाषा होती. कित्येक वर्षांपूर्वीपासून मुंजाच्या अधमतेचा द्वेष, ही तिला एक अतिशय सर्वांत प्रिय वस्तू होती. आपल्या मनानें ती स्वतः सत्याचा अवतार होती व अवन्तीराज मुंज असत्याचा मूर्तिमंत अवतार भासत होता. आज सत्याचा विजयध्वज उभवावा हें तिला एक महान कर्तव्य आहे असें वाटलें. पृथ्वीवरील पापी लोकांत सर्वांत श्रेष्ठ मानल्या जाणाऱ्या पुरुषाला आपल्या अधमतेची जाणीव करून देणें याहून जगांत जास्त शुद्ध आणि धार्मिक असें दुसरें काय असणार ?

मुंजाच्या भेटीला स्वतः जातांना तिला एक विचार आला. त्याच्या भेटीला जाण्यांत आपण स्वतः कोणत्याहि रीतीनें कलंकित होत नाहीं ना ? कलंक, कसचा ? असल्या नरपिशाचाला भेटणें यांत देखिल कलंक असेल—का नसावा ?

काय इतक्या वर्षांची तपश्चर्या अगदीं निरर्थक ? पाप्याबरोबर गोष्टी केल्यानं आपण कलंकित होऊन जाऊं ? स्वतःच्या शुद्ध हृदयाची खात्री असलेली, व त्यामुळेंच कलंकित होण्यापासून सुरक्षित अशी ती मृणाल अशा तऱ्हेचा संशय कां म्हणून काढील ?

हळुहळु ओठ दाबून, आपली शुद्धि आणि वैराग्य यांच्या महतीनें मगरूर असलेली मृणाल अनन्तांच्या निराधार झालेल्या नरपतीला कारागृहांत भेटावयास गेली. रखवालदार मृणालवती माईसाहेबांना पाहताच दिग्मूढ झाला. त्याचे हातपाय लटलट कापू लागले. त्याच स्थितींत त्यानें कारागृहाचें द्वार उघडून दिले.

भुयार लहान होतें व पश्चिमेकडील एका मोठया छिद्रांतून येणाऱ्या उन्हामुळें त्यांत किंचित उजेड पडला होता.

मुंज निजला होता. त्यानं आपला हात उशाखाली ठेविला होता, व दोन्ही पायांची आढी घातली होती. त्याच्या प्रत्येक अवयवाची अपूर्वता नजरेला पडत होती, प्रत्येक स्नायूची खुबीदार मुरड स्पष्ट दिसत होती. प्रचंड शरीर, तेजोमयता, त्याचा निर्मलतेच्या गर्वामुळे कांहीं समजणार नाहीं; अशा तऱ्हेचे भोग त्याच्या शरीराच्या ठिकाणीं त्याच्या निजण्याच्या ढंगांत दिसत होते. खोलींतील अंधकाररूपी शेषावर शयन करताना तो जणुं शेषशायी भगवान लक्ष्मीपति-प्रमाणे दिसत होता.

मृणाल पळभर दारांत उभा राहून मुंजाला तीक्ष्ण नजरेनें निहाळीत होती. चिंतातुर आणि गर्वभंगामुळे निराधार बनलेला मुंज आपणाला पाहाण्याला मिळेल अशी तिनें आशा बाळगिली होती. एवढया पराभवाचा अनुभव आला असताना देखिल अशी निर्लज्जता धारण करणाऱ्या मुंजाला पाहताच मृणालचा त्याच्याविषयींचा तिरस्कार वृद्धिंगत झाला.

तिरस्काराच्या भरांत ती परत जाण्यासाठीं वळली, इतक्यांत मुंज जागा झाला. हळूच त्यानें आपले विशाल व सुंदर नेत्र उघडले. गेटींत डोकें वर केलें व तो मधुरसें हसला.

त्याच्या डोळयांत घाबरेपणा नव्हता पण उलट आनंद होता; त्याच्या हास्यांत क्षोभ नव्हता पण उलट मोहिनी होती.

मृणालवती जाता जाता अटकली. येथून परत गेल्यानें भित्रेपणा दिसेल व ज्या कामासाठीं आपण आलों ते राहून जाईल, शिवाय मुंजाच्या हंसण्यांत अपमा-

याचा अंकुर आहे, असें तिला वाटलें ती परत फिरली. या वेळीं ती कठोरता व न्याय यांची मूर्ति होती.

गमतीनें मुंजाचे डोळे नाचत होते. त्याचे ओंठ हंसत होते; इतकेंच नाहीं पण त्याचें संपूर्ण मुखमंडळ आकर्षक—आल्हादकारक झालें होतें.

" मृणालवती ! आपण आल्या आहां तर क्षणभर उभ्या तरी राहा ."

मुंजाच्या आवाजांत मृदुता, निखालसपणा, आणि मित्रभाव होता. अनंत सुखाचा आस्वाद घेणाऱ्या व सर्वांना प्रेमभावानें पाहणाऱ्या कोणी एखाद्या विरल मनुष्याचाच असा आवाज असणें शक्य आहे.

मृणालच्या मनावर या आवाजाचा दुसरा तिसरा तर काही परिणाम झाला नाही; पण कदाचित् आपला आवाज बेसूर निघेल या भीतीनें तिनें कांहीं दाखल उत्तर दिलें नाहीं, मात्र ती वळली व मुंज हंसत होता, हे पाहून तिच्या तोंडावर कठोरता आणि क्रोधानें ठाणें दिलें.

बाळपणापासूनच मृणालला आपल्या प्रतापाची जाणीव होती, कारण तिच्या भ्रूभंगाला सर्व तैलंगण चळचळ कांपत असे. त्या भ्रूभंगानें नेहमींचा होणारा भयंकर परिणाम मुंजावरहि होईल म्हणून ते दृश्य दाखविण्यासाठीं ती थोडा वेळ डोळ्यांचें पातें देखिल न हालविता मुंजाकडे टवकारून पहात उभी राहिली.

याचे प्रत्युत्तर म्हणून मुंज पुनः हंसला " आला आहां तर तुमचे रूप तर पाहूं द्या. मी तुमच्या स्वरूपाची बरीच कीर्ति एकली आहे ."

मृणालवतीच्या कानावर हे शब्द आदळले पण त्यांचा अर्थ—पळभर तीं समजला नाहीं.

तपस्वी, तेजस्वी, निष्कलंक आणि अस्पृश्य मृणालवतीच्या राज्यांत असले नीचपणाचे शब्द बोलणें कोणालाहि शक्य नव्हतें. व या वेळीं असले अभद्र शब्द तिच्या कानीं पडावे इतकेंच नाही तर ते तिला उद्देशले जावे !

" पाप्या ! " ती म्हणाली " असल्या अधमतेत देखिल काय बोलावें व काय नाहीं याचें तुला भान सुद्धा नाहीं ! "

" अधमता कसली ? "

" अधमता कसली ! " मृणाल तिरस्कारपूर्वक म्हणाली. " धिक्कार तुझ्या कीर्तीला ! धिक्कार तुझ्या कवींना ! आणि धिक्कार तुझ्या सेनेला ! "

मुंज हंसला—आनंदानें. त्यांत विषमता नव्हती, “ माझ्या कीर्तीनें तर तैलपाच्या तपस्वी भगिनीला येथे ओढून आणलें आहे. माझ्या कर्तृत्वामुळेंच मला पाहण्याला येण्याचा तिला मोह उत्पन्न झाला—व माझ्या सेनेच्या प्रतापानें तुम्ही नामशेष होण्याच्या मार्गाला लागल्यामुळें मला पकडण्याचा प्रयत्न केला—”

“ व उद्यां तुला एकाद्या कुत्र्याप्रमाणे मरण येईल ते ! ”

“ मुंजासारख्या नरपतीला याहून अधिक व कीर्तिवर्धक मरण दुसरें कोणतें असणार ! ”

मृणाल मुग्ध झाली. ज्या मनुष्याला आपल्या सत्तेच्या आणि प्रतापाच्या भाराने दाबून टाकण्यासाठीं ती आली होती तो काष्ठ्यावर असून जणूं सिंहासनावरच आहे, कैदेंत असून जणूं राजमहालांतच आहों अशा शांतीनें आणि स्वस्थतेने बसला होता, व निरंकुश आनंदाच्या गोष्टी करीत होता

मृणालला तिरस्कार वाटला. सामान्य मनुष्यें दुःखाने नेहमी अशान्त होतात. हा केवढा पक्का पापाचारी की याच्या शान्तीचा कारागृहदेखिल भंग करूं शकत नाही.”

“ रक्षमा ! तुला माहीत आहे काय की तूं आज कोणती पापकृत्यें केलीं नीं ? ”

“ माझ्या मनाला आवडेल तेंच मी नेहमी केलें—त्यांत पाप कोणतें ? ”

मृणाल घोटाळली. स्वच्छंदानें आचरणें हेंच पाप असें तिच्या मनानें घेतलें होतें.

“ मनाला आवडेल तसें करण्यांत पाप नाहीं ?” ती थोड्या वेळानें म्हणाली. “ त्यामुळेंच तूं सदेह नर्कयातना भोगीत आहेस ”

जरा आश्चर्यानें मुंजानें डोळे उघडले. त्याचे नेत्र मोहक होते. त्याच्या ज्ञान मृणालचें लक्ष अधिक वेधलें.

“ तुम्ही नर्क कशाला म्हणतां ? ”

“ कमाल माणसा ! नरगा म [illegible] ! ”

मुंज हंसला

“ मृणालवती ! भ्रम आहे ”

“ कसा बरें ? ”

" स्वर्ग किंवा नरकाचा मला परवा नाहीं. पण सध्यां मी अनुभवित आहे त्यापेक्षां स्वर्गात कांही सुख असें नाही व नर्कात गेल्यानें तें कमी होईल असेंहि नाहीं "

" ह्या गोटया गोष्टी, हीं सोगें ढोंगें माझ्यापुढें चालतील ? "

" मी खोटें काय म्हणून बोलूं ! "

" तुझा अधमता लपविण्यासाठीं "

" अधमता ! कुठें आहे ? मी तर आतां तसाच आहे "

" कोण ? "

" पृथ्वीवल्लभ. " हंसून, नेत्रानंद अनुभवीत वर्णवितांना मुंज म्हणाला

" आता तूं ? पृथ्वीवल्लभ तर त्या महालांत बसला आहे "

" कुणी सांगितलें ? "

" आलम दुनियेनें "

" तर मग दुनिया झक मारते " बदरकारीनें मुंज म्हणाला "ज्या सुखाचा मी माझ्या प्रासादांत अनुभव घेत असे, तेंच मी आज या ठिकाणीं अनुभवित आहे. जो आनंद मला विजयानें प्राप्त झाला असता तोच आज मला या पराधीनतेंतहि मिळत आहे असें मी मानितो त्या वेळीं मी जसा पृथ्वीवल्लभ होतो तसाच आतांहि आहे "

" निर्लज्जा ' याला मन खुष ठेवण्यासाठीं फाका म्हणतात. "

" तुम्हांला त्या फाका अथवा थापा वाटत असतील पण जोंपावेतों माझी बलवत्ता कायम आहे तोंपावेतो ही गोष्ट खरी आहे " शांतवृत्तीनें मुंज म्हणाला.

थोडा वेळ मृणाल पाहात राहिली याच्या अधमतेला हद्द नव्हती हें तिला स्पष्ट दिसत होतें. त्या अधमतेला--निर्लज्जपणाला--नमविण्याला ती तयार झाली.

" अजून तुला तैलपाचा प्रताप पाहावयाचा आहे वाटतें ? "

" प्रताप ! आणि त्या बिचाऱ्याचा ! "

" तुझ्यापेक्षां त्याचा प्रताप अधिक तेजस्वी आहे. "

" कुणी सांगितलें ? जरा तुमच्या अंतःकरणाला विचारा. तुम्ही आणि तो दोघेंहि माझ्या प्रतापानें तेजशून्य झाला आहां "

" तुझ्या प्रतापामुळें मी तेजहीन ! काय बकतोस ? "

" मृणालवती ! रागावूं नका ! हें चंचल जीवन उगीच असें विनाकारण व्यर्थ कां तुडवितां ? "

" मला तुझ्या उपदेशाची गरज नाही. "

" म्हणूनच तर तुम्ही अशा राहिला. माझा बोध घेतला असता, माझ्या उपदेशाप्रमाणें चालला असतां तर आज अशीं वल्कलें नेसून तुम्ही तुमचें आयुष्य घालविलें नसतें. "

" तू तरी कोण कोण आहेस ? " तिरस्कारदर्शक जिज्ञासा उत्पन्न झाल्यामुळे मृणालनें विचारलें.

" मी ! " पृथ्वीवल्लभानें ठासून उत्तर दिलें " मर्त्यांचा रस तुम्हीं चाखीत नाहीं माझा एक पळदेखिल दुःखांत गेला नाहीं. जीवनसुखाचा अनुभव घेतल्याशिवाय मीं एक प्रसंग देखिल घालविला नाहीं. दरेक प्रसंगातून, दरेक पळापळांतून मी रस ओढून काढला आहे. अशा तऱ्हेच्या जीवनाचा तुम्ही अनुभव घेतला आहे ? मृणालवती ! तुम्ही माझ्या अधमतेची गोष्ट करतां आहां ? ही रसशोषण करण्याची वेळा निघून जाईल तेव्हांची गोष्ट निराळी— पण ती आहे तो पावेतो तर मी पृथ्वीवल्लभच "

मृणाल ऐकत होती. त्याच्या शब्दाच्याठायीं मद होता पण नव्हते अवडंबर ... नव्हतें ... दरेक शब्द सत्य आहे असा भास होत होता मृणालला कधीं न चाखलेला अनुभव ... करणातर आपला ताठा नमविला होता— ... सत्ता दुसऱ्यावर चालविण्याऐवजीं दुसऱ्याच्या शांत आणि आकर्षक सत्तेच्या प्रभावा- मुळें ती लज्जित झाला होती, बुझाली होती व फिकी पडली होती

" मुंज ! तर मग तूं मला ओळखीत नाहीस वाटतें ? "

" मला आपल्याला ओळखण्याची काय जरूरी आहे ? तुम्ही आहां त्या माझ्या मनानें पूर्ण आहां "

" म्हणजे ? " मृणालनें कठोरतेनें विचारलें

" मानभंग झालेल्या मालिनी "

" काय ? " दांत ओठ चावून तिनें विचारलें.

" मला वश करण्यासाठीं आला होता— वश होऊन जात आहां. तुम्हासारख्याना वश करण्यापेक्षां दुसरें जास्त सुख तरी कोणतें ? " असें म्हणून मुंज

उभा राहिला. त्याच्या प्रचंड व तेजस्वी शरीराची मोहकता चारी बाजूला फाकली होती.

" तू मला वश करूं पहातोस ? " दात खात मृणाल म्हणाली.

" नाही. तुम्ही वश होऊं इच्छिता. माझ्यापाशी येण्यात तुम्ही मोठी चूक केलीत मृणालवती ! आतां तुम्ही निराळयाच होणार ! " एकदम जरा लवून हलच मंजुळ स्वरात मुंज म्हणाला. " माझ्याजवळ आलात तेव्हा आता संजीवन झाल्याशिवाय तुम्ही खचित राहणार नाही. "

हा काय म्हणत आहे याचा स्पष्ट अर्थ न कळतांच मृणालवती आपटून म्हणाली:—"मी पाहते तूं किती दिवस जिवंत राहतोस तें. "

" या घटकेला तर जिवंत आहे, मग मला दुसरी काळजी तरी कशाला ? "

" पाहीन की तुला कशी काळजी वाटत नाही ती ! " स्वतःच्या आज्ञेचा दिमाख दाखविताना मृणाल म्हणाली:– " तुझ्या रोमरोमांत किडे पडतील मग मी पाहीन--"

"माझ्या रोमरोमांत किडे पडतील त्याची काय फिकीर आहे ? फिकीर तर तुमच्या सारख्यांना, कां की त्या तुमच्या प्रत्येक विचाराला नर्कांची दुर्गंधी येते "

मृणाल स्थिरतेने पाहू लागली. " मुंज ! अजून तुला पुष्कळ अनुभवायाचें आहे. त्याला तर अजून आहे " असें म्हणून ती जाण्याला वळली

" त्यात काय ? जो आनंद प्रसंग मिळाला तो आपला. "

" हो, वर करा, पूर्ण आनंद मिळेल " असें म्हणून रागाच्या आवेशात ती तेथून निघून गेली. तिचें मस्तक ठिकाणावर नव्हते. तिच्या मर्जीप्रमाणें तें काम करीत नव्हते.

" यापेक्षा दुसरें शुभ तें काय असणार ! " मागाहून पुष्पांजलीसारखा हसरा असा मधुर आवाज आला !



# प्रकरण १० वें.

## दया.

मृणालवती तेथून त्वरेनें महालात गेली. तिच्या मनाची कांहीं विचित्र स्थिति झाली होती.

आपण स्वतः स्वस्थ आणि शांत आहों असें तिला वाटत होतें; तरी पण तिचठायीं चलबिचल होत असल्यामुळें तिचें रक्त उसळ्या मारीत होतें. तिच्या मनास कांहीं अपरिचित वस्तूचा स्पर्श झाला होता—तिच्या मनांत कांहीं अपरिचित विचार येत होते. मुंजाच्या भेटीला गेली होती त्या वेळीं ती निराळी होती व भेटून आल्यानंतर ती निराळीच झाली.

मूर्तिमंत अधमतेचा अवतार मुंज, याच्या संसर्गदोषामुळें आपल्या शुद्धतेला कलंक लागला असें तिच्या मनानें घेतलें आणि म्हणूनच तिला असें वाटत होतें. मनःशुद्धि पुनः प्राप्त करण्याचा प्रयत्न करतांना मालवनाथाविषयीं तिचा तिरस्कार वाढत जात होता व यामुळें तो तिच्या मनासमोर येत होता. तिचे त्याच्याविषयींच विचार चालत.

संसर्गदोष नाहींसा व्हावा म्हणून तिनें स्नान केलें, व मानसिक शुद्धीसाठीं ती ध्यान करावयाला बसली. ती मुंजावर फारच रागावली होती, व हा रागरजोगुणाचा आविर्भाव असल्यानें त्याला काढून टाकण्याचा ती प्रयत्न करीत होती.

तिच्यासारख्या जीवन्मुक्तांच्या ठिकाणीं क्रोध म्हणजे काय? तिनें तर निर्विकार दृष्टीनें त्याच्या पापपुण्याची तुलना करून अथवा त्या पापपुण्याचा हिशेब करून त्याप्रमाणें त्याच्या बरोबर वर्तन करावयाचें होतें.

राग अस्वाभाविक होता. उलट रागाऐवजी हा इसम दयेला पात्र होता. तिच्यासारखीं जितेंद्रिय त्याजवर दया नाहीं करणार? गोष्ट सत्य होती. राग उतरण्यासाठीं मुंजाविषयींच विचार करून त्याच्यावर करुणा केली पाहिजे असें तिला वाटलें. मुंज तर तिच्या ध्यानांतून जातच नव्हता. तेव्हां त्याच्याविषयीं विचार करणें ही गोष्ट सोपी होती.

तिला स्वतःच्या संयमाचा खरा अनुभव आला. फारच थोड्या वेळांत ती सर्व राग पार विसरली, व मुंजाकडे दयार्द्र दृष्टीनें पाहूं लागली. मात्र या वेळी काही कळत नाहीं अशा रीतीनें तिचें मन दिलगीर होत होतें.

तें का बरें दिलगीर अथवा नाराज होत होतें? विचार करतां तिला या दिलगिरीचे कारण समजलें. अशा प्रकारे दया दाखविल्यानें अशा पाप्याच्या बाबतीत ती पूर्ण न्याय होऊं देत नव्हती. ती अन्याय करीत होती. तो पापी होता. तिच्यासारख्यांचा देखिल त्यानें अपमान केला होता. तिला स्वतःला मानापमानाची काहीच किंमत नव्हती पण पापकृत्याबद्दल शिक्षा ही तर झालीच पाहिजे.

काय ही या मनुष्याची अधमता होती? कसल्या पापपंकात तो पडला होता की त्याला आपल्या स्थितीचे देखिल भान नव्हतें? त्याला त्याच्या स्थितीची जाणीव तर करून दिलीच पाहिजे—आणि असें केलें नाही तर न्याय झाला असें म्हणता येणार नाही.

काय शिक्षा करावी? इतक्यात जुना एक चाल आठवली आणि ती न्याय्य आहे असेंदेखिल तिला वाटलें. पराजित झालेल्या राजांना लाकडाच्या पिंजऱ्यांत घालून राजमहालासमोरील मैदानांत त्यास ठेवीत व लोकांच्या हसण्यानें व मस्करीनें त्यांच्या अभिमानी हृदयांतील सर्व अभिमान उतरून टाकण्यांत येत असे. मुंजाला ही शिक्षा कां देऊं नये?

ती उठून तैलपराजाजवळ गेली. मुंजाच्या शिक्षेची पद्धति तैलपाच्या गळी उतरली, व सत्याश्रयानें तयार करविलेल्या लाकडी पिंजऱ्यांत त्यानें मुंजाला कोंडण्याचा हुकूम केला.

मृणालचें अंतःकरण आतां शांत झालें—आतां न्याय झाला! त्या वेळेस तिच्या मनांत एक विचार आला की आतां याची पृथ्वीवल्लभता कोठें राहिली? लागलीच एक उर्मी उद्भवली की मुंज आतां हा आघात कसा सहन करील ते पाहिल पाहिजे.

यांत असत्य अथवा वाईट असं काय होतं? तो भिकारी दयेला पात्र असून मात्र न्यायबुद्धीनें दिलेली शिक्षा सहन करीत होता. अशा मनुष्याची काय स्थिति आहे हें पाहणें हें तिच्यासारख्या सद्बुद्धिशाली विदुषीचें कर्तव्य नव्हे का?

काय म्हणून नव्हे?

# प्रकरण ११ वें.

## रसनिधीची खिन्नता.

विलासवतीला या वातावरणात कांहीं अपरिचित मधुरता लागली. तिच्या अंतःकरणात, सजीवता आणण्यासाठीं सिंचन केलेल्या अमृताजलीचा परिणाम व्हावा त्याप्रमाणें तो होऊं लागला.

तिचें मन अजून एकरूप झालें नव्हतें. सूर्य किरणांच्या प्रथम स्पर्शानें कमलिनींच्या पाकळ्या खुलतात—विकसतात, तसें तिच्या मिटलेल्या मानसपुष्पाच्या ठिकाणीं झालें होतें. आपणास काय होत आहे याची तिला जाणीव नव्हती. पण तें होत होतें तें खरोखर आल्हादकारक होतें ही गोष्ट मात्र निःसंशय होती.

हा आल्हाद चारहि दिशांला पसरला होता. व तिचें लग्न नक्की झाल्यामुळें त्यात भर पडली होती. पुरातनकालच्या सतीप्रमाणें सत्याश्रयाला तिनें मनानें वरिलें होतें. त्याच्या पदकमलाची ती पूजा करीत होती, त्याची अर्धांगना होण्याची स्वप्नें अनुभवून ती आपला काळ कंठित होती. या वेळीं त्या स्वप्नांत पाहिलेल्या कल्पनामय स्वप्नात एक प्रकारची तेजस्विता दृश्यमान झाली.

ती तेजस्विता, ती दिव्यता अथवा ती सुंदरता अस्पष्ट होती, कारण त्या स्मारातील कल्पनातीत आनंदानें, निरतिशय प्रेमभावानें तिला ज्ञान नव्हतें.

रसनिधीनें वर्णिलेल्या " रसिकतन " ती बुझाली तिचें मन बुचकळ्यात पडलें. हें सत्य खरें असावें ? तें जाणण्याची तिला जिज्ञासा उत्पन्न झाली. तिनें आपल्या मनाला--जिज्ञासेला--दाबून टाकण्याचा प्रयत्न तर केला. पण--कदाचित त्यात कळंक असेल ? वेळ मिळाल्यास या बाबतीत मृणालवती माईसाहेबांना देखील विचारण्याचा तिनें निश्चय केला. पण आज माईसाहेब कोठें दिसत नव्हत्या.

परंतु जें जाणण्याची तिला जिज्ञासा उत्पन्न झाली होती तें जाणण्यात हरकत तरी कोणती होती ? लक्ष्मीदेवीला कवीनें नाटक ऐकविलें होतें व तिनें तें

ऐकिलें होत तिच्या पित्यानें कवींना पदरी ठेविलें होतें तेव्हां अशा कवींना निदान भेटण्यांत हरकत तरी कसली ?

त्या दिवशीं मृणालवती माईसाहेब नेहमीप्रमाणें आल्या नाहींत. तेव्हां ईश्वराचें ध्यान सोडून देऊन स्वतःची जिज्ञासा तृप्त करण्याकडे स्वतःची चित्त-वृत्ति विलासनें लाविली

कदाचित् माईसाहेब येतील या पाहतोल या भीतीने ती थोडा वेळ बसून राहिली, पण मग धारिष्ट करून ती उठली. आज विजयप्रसंग होता; तिने आज आपल्या नियमाचें किंचित उल्लंघन केलें तरी तिला कोणी हरकत घेऊं शकेल असें नव्हतें.

हे नवीन विचार आपल्या आईला जाऊन सांगावे व ती काय म्हणेल हे ऐकण्याची तिची इच्छा होती. लागलीच यासाठी आपल्या पित्याच्या महालाकडे ती जाण्याला निघाली

भिल्लमाचा महाल राजमहालाचाच एक भाग होता प्रथमतः दोन्ही महालांत मिळून एकच उद्यान होतें, पण आज कित्येक वर्षें त्या दोन महालांमध्यें एक भिंत घातली होती. या भिंतीत एक लहानसें दार ठेविल होतें, त्यांतून विलास आपल्या पित्याच्या महालाकडे गेली

संध्यासमयाला थोडा अवकाश होता सायंसूर्याच्या मधुर तापानें बाग प्रफुल्लित होऊन फारच शोभा देत होती विलास एक पळभर बागेत उभी राहिली. या बागेंत आज इतकी पुष्कळ रमणीयता कां बरें दृष्टोपत्तीस येत होती?

मध्यभागी एक वृक्षकुंज होता. त्याच्या जवळून जातांना त्याखाली कोणी तरी भुईवर निजलें आहे असें तिला वाटलें.

" कोण ते ? " विलासनें विचारलें.

निजलेल्या मनुष्यानें एकदम चारी बाजूला पाहिलें. विलासनें त्याला ओळखलें. " कोण कविराज ! "

" होय. " रसनिधि म्हणाला

विलास लाजली. या ठिकाणी अशा परिस्थितीत कविराज मिळतील असें तिच्या स्वप्नींहि नव्हतें.

" कविराज, काय करितां ? "

" कांहीं नाही. भिल्लम राजाला अर्पण करण्यासाठीं एक अष्टक करितों आहे."

" सर्व दिवसभर कविताच करीत असता ? " विलासनें हंसून विचारिलें.

" नाही " मोठ्या दिलगिरीच्या आवाजानें रसनिधि उत्तरला.

विलासनें त्याच्या मुखावर असलेल्या म्लानतेला बघून विचारलें·—" कसें काय ! येथें ठिक आहेना ! आपणाला कांहीं लागत असल्यास जरूर कळवा "

" मला हवें आहे तें आपण कसे देऊं शकाल ? " डोके हलवून रसनिधि ह्मणाला

' आपणाला काय पाहिजे ? बाबाना, आपण सांगाल ते सर्व कांहीं मिळेल "

" आपण अजून बालक आहा सर्व कोठून मिळणार ? कोठें माळवा आणि कोठें तेलगण ! ' "

" कविराज ! तेलगणात काय कमी आहे ? आपण अजून पाहिलें नाहीं ह्मणून असें ह्मणता "

' नाही. तेलगण सोन्याचे असले तरी त्यांत मला काय ? माझ्या अवतीचे प्रिय पुरजन, माझ्या महाकालेश्वरातील गगनभेदी घंटानाद, माझ्या पित्याची पुनीत दहनभूमी—ही येथें कशी मिळणार ? "

" हे तर आई ह्मणते तसेंच आपणहि ह्मणता तिला देखिल स्यन देशांतून चैनच पडत नाहीं "

" अगदी सत्य आहे. '

" पण तुह्माला काय ? माझी आई तेथ राणी होती. त्यामुळे तिला येथील स्थिति सहन होत नसावी पण तुह्मी तेथेंहि कवि होता व येथेंहि कविच आहां. मुंजराजापेक्षा भिल्लमराज तुमचा अधिक आदरसत्कार खचित करील "

" विलासवती " पुनः म्लानवदनाने हंसून रसनिधि ह्मणाला — " परजनांच्या मैत्रीपेक्षा स्वजनाची सेवा उत्तम. "

" मला ही गोष्ट अगदी असत्य वाटते—"

" कारण तुह्मी स्वजन आणि परजन यांच्यामधील भेद पाहिला नाहीं "

" तुह्माला स्त्री आहे ? "

रसनिधीनें विचार करून उत्तर दिलें:—" होय. "

" तर मग तुह्माला तिची आठवण येत असेल "

" होय आह्माला काही तुमच्यासारख्या त्यागवृत्तीचा गौरवच स्वीकार करावयाचा आहे ? "

"हें पहा तेव्हा, मी नरा अब ह्मणत होते ? तुह्मी त्यागवृत्ति सेविली नाही ह्मणूनच तुह्माला दुःख होत आहे "

" विरह भोगून दुःखी होण्यापेक्षा निष्ठुर होऊन पर्मीजनाना विसरून जाणे याला मी महत्‌कृत्य अथवा मोठेपणा मानीत नाही "

विलास समजली नाही ! तिने एक पाऊल पुढे टाकिले ... ... मुंज भिल्लमराजाच्या महालाकडे जात होती

" विरह ह्मणजे ? "

" प्रेमाची कल्पना नसल्याशिवाय, ह्मणजे प्रेमाशिवाय विरह कसा समजणार ? " रसनिधि ह्मणाला. त्याने विस्मित होऊन या निर्दोष बालिकेकडे पाहिले

" कविराज ! माझे ऐका व थोडी तपश्चर्या करा, ह्मणजे तुमचे चित्त शांत होईल " विलास ह्मणाली

" अशा चित्तशान्तीला काय करू " डोके हलवून रसनिधि ह्मणाला " चित्त अशान्त आहे—अशान्त होण्याला त्याला सबळ कारण आहे तेव्हा उगीच असा दंभ का करावा ? माझी स्त्री तुमच्या एवढी आहे, ती बिचारी रात्रदिवस अश्रु गाळीत असेल—तिला माझ्याविना घरचा पळ न पळ दुःखदायक होत असतील. ती तडफडत असेल —विव्हळ झाली असेल ... असें दुःख भोगीत असता मी स्वार्थी शांति मिळावी ह्मणून तपश्चर्या करावयाला बसू ? निष्ठुर होऊ ? जो सुख देतो त्याच्यासाठी दुःखी होणे यात देखिल एक प्रकारचा आनंद आहे "

विलासने अनुकंपेच्या दृष्टीने रसनिधीकडे पाहिले व ह्मटले " तर दुःखी होण्यात तुम्हाला सुख मिळते असे वाटते ना ? "

" नाही —"

" तर मग दुसरे काय ? "

" मी दुःखी होऊं नये म्हणून हृदयातील प्रेमनिर्झर आज मुळातून टाकिले तर पुढें मला केव्हाहि सुखाने त्याला ओले करता येणार नाही—सुखासाठी हृदयाचे ठिकाणी आर्द्रतेची अत्यंत आवश्यकता आहे. "

"हा भ्रम आहे—सुख म्हणजे दुःखाचा अभाव."

"कुणी सांगितलें ?" जरा त्वेषानें रसनिधि ह्मणाला "तुम्हाला सुख म्हणजे काय याची मुळीं कल्पनाच नाहीं. सुख म्हणजे केवळ दुःखाचा अभाव असें नाहीं. सुख म्हणजे केवळ संतोष असेंहि नाहीं. तर सुख म्हणजे मनांतील प्रत्येक उर्मीचें नृत्य प्रभातकालीं पक्षांचा कल्लोल—किलकिलाट—कधीं ऐकला आहे ? त्याचें नांव सुख."

"हें मला कसें मिळेल ?"

रसनिधीनें थोडा वेळ विलासमणीकडे पाहिलें "तुमचें लग्न झाल्यावर तुम्हाला कळेल तुमचा विवाह गन्धाश्रय कुमाराबरोबर व्हावयाचा आहे ?"

"हो"

"तेव्हां, त्याला बघून तुमचें हृदय धमधम नाचत नाहीं ?"

"कशासाठीं नाचेल ? कुमार आणि मी—आम्ही दोघेहि संयमी आहों."

"त्याला स्पर्श करून—आलिंगन देऊन—त्याचे मधुर बोल ऐकून अन्तरात्मा शांत करण्याचें तुमचें मनांत येत नाहीं ?"

"क्वचित काळीं."

"तेव्हां विलासमणी !" रसनिधि म्हणाला—"तुम्हाला सुख किंवा दुःख यांचें कसें भान होणार ?"

"नाहीं समजलें !"

"मला याचें भान—त्याची जाणीव—होते पाहू."

"तुमचें अन्तःकरण उजाड झालें आहे तेव्हां तुम्हाला भान तरी कसें होणार ? पहा महाल आला चलावें."

"कविराज ! माझ्याशीं गोष्टी करणें आपणाला आवडत नाहीं वाटतें ? तुमचें चित्त अस्वस्थ आहे—ठिकाणावर नाहीं—अवन्तीला गेलें आहे तुम्ही दुःखी दीन आहां हें मला आवडत नाहीं."

"नाहीं तुम्ही असें बोलावें ना मी माझें सर्व दुःख विसरतों."

"तर मग मला तुम्हाला एक गोष्ट विचारावयाची आहे. बस म्हणून एका झाडाच्या पारावर ती बसली.

"विचारा." स्मित वदनानें हसून रसनिधि म्हणाला.

---

# प्रकरण १२ वें.

## सहधर्मचार

"पण कोणाला सांगू नका."

"मी कोणाला सांगणार आहे?"

"माझ्या आईला कळलें तर ती रागावेल.

"तेव्हा, अशी गोष्ट मला विचारतां तरी कशाला?"

विलास मुकी राहिली. नंतर म्हणाली "दुसरे असे कोणी नाहीं, कीं त्याला विचारावं?"

"सांगा"

'तुमचें लग्न झालें आहे?"

"होय"

"माझें लौकरच लग्न व्हावयाचें आहे.'

"बरें!"

"लग्न झाल्यावर मी कसं वागावं?"

रसनिधि मोठ्यानें हंसला. "तुम्हाला कसं वाटतें?"

विलासला या हंसण्याचें कारण कळलें नाहीं "शास्त्रांत तर सहधर्मचार सांगितला आहे"

रसनिधि पुनः हंसला. "बस! तर."

"पण सर्वच असें कोठें करितात?"

"जशी माणसाची जात निराळी तशीच सहधर्मचाराची रीत अथवा तमाम सहधर्मचाराचा प्रकार निराळा." हंसत हंसत रसनिधि म्हणाला.

"तो कसा बरें?"

"आमच्या अवन्तीमध्यें एक मोळीविक्या आहे. तो देखिल सपत्नितांडव-सहधर्मचार आचरतो—"

विलास निमूटपणें पाहूं लागली

"सकाळी, दुपारीं, सायंकाळीं, उठल्या, पडल्या, दोघेहि एकमेकाला मारतात."

विलासला देखिल हसू आले. " बरें पुढे ? "

" पुढे काय ? दुसरा प्रकार एका विप्रवर्याचा आहे "

" तो कसा ? "

" त्याचे नाव सरस्वतीसहधर्मचार आहे तो आणि त्याची धर्मपत्नि दोघेहि दररोज एकमेकाच्या सात पिढ्यांचा उद्धार करितात "

" अगदी खोटें-उगीच थट्टा कशाला करिता ? "

" अगदी खरे पण तुम्हाला तर सर्व प्रकार ऐकावयाचे आहेत ना ? "

" होय. "

" तेव्हा तिसरा प्रकार म्हणजे स्वेच्छाधर्मचार. "

" म्हणजे ? "

" ज्याला जसे वाटेल तसें त्यानें करावे. "

" याला कोठें सहधर्मचार म्हणतात ?

" होय, यालाच म्हणतात. हें पहा लग्न करून जे करणें तो सहधर्मचार. "

" बरें, दुसरे कांहीं चागले प्रकार आहेत कीं सर्व असेच ? "

" होय, या नंतरचा प्रकार, स्वयंभूसहधर्मचार. "

" म्हणजे ? "

" एक पक्ष धर्माने आचरण करितो पण दुसऱ्या पक्षाला त्याची परवा नसते "

" हें तर फारच वाईट. "

" पण बहुश: हाच प्रकार लोकांना प्रिय आहे. "

" कारण ? "

" बहुतकरून स्त्री धर्माचरण करिते आणि पुरुष— "

" काय ? "

" वाटेल तें करितात. "

" अरेरेरे ! कोण ही अधमता ! "

" यांत अधमता कसली ? धर्माचें गाडें एकानें ओढावे व दुसऱ्यानें त्यांत बसावें. "

" बरें मग ? "

" मग काय ? एक प्रकार शुष्क सहधर्मचाराचा आहे. "

" म्हणजे ? "

" दोघेंहि शास्त्राप्रमाणें वर्तन करितात. तेथें नसतो रस, आनंद किंवा प्रेम. "

" पण त्यांत काय ? "

" हा देखिल एक अधम प्रकार म्हणतात. "

" अगदींच खोटें हाच खरा प्रकार "

" विलासवती ! रस, आनंद किंवा प्रेमानीं रहित असा सहधर्मचार म्हणजे काय याची तुला कांहीं कल्पना आहे ? "

" होय ! महाराज आणि जक्कलादेवी याचा असाच शुद्ध प्रकार आहे. "

" तर मग त्याच्यासारखे दु:खी आणि भाग्यहीन प्राणी या दुनियेत मिळणें कठीण आहे. "

" तर मग खरा सहधर्मचार कोणता ? "

" ज्या ठिकाणीं अन्योन्य प्रेम असेल, जेथें एकमेकासाठीं अनंत रस वाहत असेल जेथें एकमेकाच्या नयनलग्नांत एकमेकाच्या स्पर्शास्पर्शात दिनरात्रीं आनंदी आनंद भरलेला असेल तोच सहधर्मचार "

विलास बुचकळ्यांत पडली ती रसनिधीकडे पाहू लागली.

" तुह्मीं तर सगळ्या उलट्याच गोष्टी करिता ? "

" नाहीं तुह्माला मात्र सर्व उलटेच शिकविण्यात आलेलं आहे "

" तर मग तुह्माला एक गोष्ट विचारूं ? "

" खुशाल "

" तुमचा सहधर्मचार कोणत्या प्रकारातला आहे ? "

विचारतांना विलासनें विचारलें. पण तिला पश्चात्ताप झाला. राजकन्येच्या उच्च पदवीवरून परिजनांना वाटेल तें विचारण्याची सवय तिला जडली होती, तरी पण रसनिधीच्या ठिकाणीं कांहीं समजेल अशा तऱ्हेचें ज्ञान होतें, त्याच्या गौरव करणें युक्त होतें त्याला वाईट तर वाटलें नसेल ना ?

रसनिधीचे डोळे गंभीर झाले त्याच्या ठिकाणीं मृदुता आली

" विलासवतीं माझ्या मतानें सहधर्मचार एकाच प्रकारचा आहे.

" कोणता ? "

" शेवटचा. " असें म्हणून त्यानें निश्वास टाकिला.

रसनिधीच्या हेतुपूर्ण मुखाकडे विलास पाहत राहिली त्या मुखामंडळावर अवर्णनीय, अपरिचित असा भाव तिला दृग्गोचर झाला.

" तुमच्या स्त्रीचें नांव ?

" उदयामती "

" नाव फार गोड आहे "

रसनिधि हंसला पण त्यात फिकेपणा होता

" तिला काव्य येतात ? "

" ती काव्यें लिहते "

" ओ हो हो ? तर मग कोण जाणे ती कशी असेल ? "

" देवाला देखिल दुर्लभ अशी. ! "

विलास थोडी स्तब्ध राहिली, व विचारात पडली.

" मला अशी व्हायला शिकवाल ? "

रसनिधि हसला.

" मला थोडकीच काव्यें ऐकावयाची आहेत ? " विलास एकदम म्हणाली

" मृणालवती रागावणार नाहींत ? "

" त्याना कसे कळणार ? "

" तर मग, माझी कांहींच हरकत नाहीं. काय ऐकावयाचें आहे ? "

" माझी आई कोणत्या कवीची गोष्ट करात होती ? "

" महाकवि भवभूतींनी "

" त्या कवीचें काव्य तुम्हाला येतें ? "

" होय सगळीं येतात तुम्हाला कोणतें ऐकावयाचें आहे ?

" माझी आई मालती माधव काव्याविषयीं गोष्ट करीत होती "

रसनिधि जरा लाजला. " बरें तर. मग केव्हां ऐकाल ? "

" पाहीन. वेळ मिळाला की येईन. "



# प्रकरण १३ वें.

## लक्ष्मीदेवीचा रणप्रवेश.

रसनिधीनें दु:खानें आपलें मस्तक नमविले तें विलासने पाहिलें, तिचे अंत:करण द्रवले. या बिचाऱ्यावर कोण ही आपत्ति! या बिचाऱ्याच्या स्त्रीवर केवढा हा दुर्धर प्रसंग!!

याची स्त्री बिचारी माझ्याएवढीच असेल आणि या वेळीं एकांत अवन्तीमध्यें पती वियोगाने झुरत असेल. त्या बिचारीनें त्यागवृत्तीचे शिक्षण थोडेंच घेतलें असेल!! तिला जगत् मिथ्या आहे ही कल्पना देखिल नसणार!! माझें लग्न झाल्यानतर सत्याश्रय दूर देशात कारागृहवासात असले तर मग माझी काय स्थिति होईल?

अशा तऱ्हेचे विचार बऱ्याच वेळपावेतों तिच्या मनांत घोळत होते बिचाऱ्या काव्यसेवी, कोमल हृदयी उदयामतीच्या दु:खानें तिच्या सयमी हृदयाला पण दु:खी बनविलें व त्यांत उदयेचा पती किती सुंदर आणि विद्वान् होता; अशा पतीच्या विरहानें कोण दु:खी होणार नाहीं? तिची स्वत:ची गोष्ट निराळी होती; पण दुसऱ्याची स्थिति कशी होणार? अशा तऱ्हेच्या विचारानें तिचा डोळ्याला डोळा देखिल लागला नाहीं. शेवटीं तिने खिडकी उघडली आणि बाहेर डोकावलें.

रात्र शांत होती. बागेत स्वच्छ चांदणें पसरलें होतें ज्या बाजूला रसनिधि होता त्या बाजूला तिची कळत न कळत नजर गेली व रसनिधि आपला मित्र धनंजय याचेबरोबर गोष्टी करीत फिरत आहे हें तिनें पाहिलें. ती एकाग्रतेनें टक लावून पाहूं लागली—हे कविवर कोणत्या तऱ्हेनें कोणकोणत्या गोष्टी करीत असतील याविषयीं ती कल्पना करूं लागली. एकाएकीं ती उभी होती त्या जागेच्या खालचें दार उघडलें—आणि एक स्त्री बाहेर आली.

तिनें लक्ष्मीदेवीला लागलेंच ओळखलें, तिला हाक मारण्यासाठी 'आई' शब्द तिच्या तोंडावर आला. पण तिला आईचा धाक वाटला म्हणून ती गप राहिली. देवी कविराजांना आता झोंपा अशी विनति करण्याला जात होती असें स्पष्ट दिसत होतें. विलासनें हळूच खिडकी बंद केली व पुन झोंपी जाण्याचा प्रयत्न केला.

लक्ष्मीदेवी स्तब्ध उभी राहिली. महासामन्ताला तैलप राजानें बोलावलें होतें म्हणून त्याची वाट पाहता पाहतां ती थकून गेली होती व खिडकीतून दोन कवींना पाहिल्यामुळे ती बाहेर आली

असें होतें तरी ती त्यांना फक्त भेटण्यासाठीच आली नव्हती पुष्कळ वेळ विचार कर करून तिनें एक दृढ निश्चय केला व त्या आपल्या निश्चयाच्या पूर्ततेसाठी ती या वेळीं बाहेर आली होती.

अनेक वर्षे होऊन गेलीं तिच्या निरनिराळ्या मनोभावना या वेळीं एका केन्द्रस्थानी मिळाल्या होत्या. भिन्न भिन्न विचाराचीं माला गुंफून त्यायोगें एकच जप चालला होता. हळहळु निश्चयाने पाऊल टाकीत मुंज राजाच्या पट्टराणीनें रणांगणात प्रवेश केला.

ती थोडीपुढे आली व उभी राहिली रसनिधि व धनंजय कोणाची तरी चाहूल ऐकून चमकले व स्तब्ध राहून त्यांनी वर पाहिलें.

"कविराज!" हळ[illegible]क्ष्मीदेवी म्हणाली

दोघेहि एकमेकासमोर पाहत राहिले.

"आईसाहेब! काय आज्ञा आहे?" धनंजय म्हणाला.

"कां अजून पावेतों झोंपण्यासाठी नाहीं गेला?" चारी बाजूला पाहिल्यावर लक्ष्मीदेवीनें विचारलें.

"स्थान अपरिचित आहे --तेव्हा झोंप कशी येणार?" रसनिधि उत्तरला.

"कविराज! मुंजराजाला मारण्याचा हुकूम झालेला आहे." हळूच लक्ष्मीदेवी म्हणाली.

"हं!" दोघे एकदम उद्गारले.

"होय!

दोन्ही कवींनी निश्वास टाकले रसनिधीची तब्येत गेली. त्यानें आपले दात ओठ चावले धनजयानें आपली मान खालीं घातली.

" काय धनजय, काय विचार चालला आहे ? "

" आईसाहेब ! आमचा सूर्य अस्ताचलाला गेला आहे "

" अजून अवकाश आहे "

कोणी कांहीच उत्तर दिले नाहीं

लक्ष्मीदेवीनें जवळ येऊन कोणाला ऐकू जाणार नाहीं अशा तऱ्हेनें विचारलें —" मुंजराजाची सुटका करून त्याला येथून घेऊन जाण्याची आहे तुमची हिंमत ? "

धनंजय घाबरला व मागे हटला पण रसनिधीने लागलेच वर पाहिलें आणि एका पळातच लक्ष्मीदेवीचे विचार त्यानें पारखिले पण लक्ष्मीदेवी लागलींच खोटेंच हंसली व म्हणाली " मी सहज तुमची थट्टा करीत आहे "

" आईसाहेब ! " रसनिधि म्हणाला " तुम्हाला थट्टा वाटते. पण ही तर आमच्या अंतःकरणांतील अभिलाषा आहे, काय करावें ? देश परका आहे. माणसें परकीं आहेत, आमचें दुःख अथवा आमच्या मानसिक यातना येथे कोणाला सांगाव्या. ? आम्ही तर बोलून चालून कैदी ! ! "

" तुम्ही कोठे कैदेत आहां ? "

" आम्ही कैदेत नाहीं म्हणून काय झालें ? पण आमचा प्राण, आमचा पंच—प्राण—मयुरासनी भगवती देवी सरस्वतीचा लाडका आमचा महाराजा या दुर्दशेला पोहोंचलेला आहे. तेव्हां कैदेपेक्षा का हे दुःख कमी आहे ? "

" हे तर आज तुम्हाला असें वाटते आहे बाकी उद्यांक सर्व विसरून जाल "

" आईसाहेब ! कारागृहाच्या काळ्या डागाचा कधीं तरी विसर होतो ? व त्याचा कलंक कधीं तरी दूर झाला आहे ? "

लक्ष्मीदेवीचें मुखमंडळ फिकें पडलें रसनिधीनें आपलें बोलणें पुढें चालविलें—" तुम्ही स्वतंत्र आहां—मुक्त आहां " दरेक शब्दावर त्यानें बोलताना भार दिला

" कसे ताडलेंत ? " कष्टानें राणीनें विचारलें

" तुम्ही तैलप राजाच्या राणीच्या भगिनी आहां—त्याच्या महासामन्ताच्या पत्नी आहां. तुम्ही पराधीनतेंत थोडकच दिवस घालविले आहेत ? अथवा कारागृहवासाचें थोडकेंच सेवन केले आहे की तुम्हाला आमच्या प्रभूची दया येईल ? काय करावें ? परदेशात कोणाचें साहाय्य नाहीं.—नाहीं तर—" इतकें बोलून रसनिधि अटकला

" काय कराल ? "

" तुम्ही साथितल त मुंजराजाला सोडवू "

" रसनिधि ! तैलप राजाच्या पंजातून कोण कधी निसटला आहे ?

" सहस्र हाताचा सहस्रार्जुन याचा देखिल निकाल लागला. तेव्हां या दोन हाताच्या तैलपाचा काय पाड ? "

" कविराज ! " लक्ष्मीदेवी थट्टेने बोलण्याचा प्रयत्न करीत होती तरी देखिल त्यात गांभीर्य आलें " हे काही काव्यें रचण्याचें काम नाहीं "

" नाही देवी ! हे तर कान्यांना कर्तव्याचा साक्षात्कार करून देण्याचें कार्य आहे "

" करा पाहू " लक्ष्मी देवीनें थट्टेनें म्हटलें

" अडचण एवढीच आहे की येथील एखाद्या माहितगाराची—घरभेद्याची—मदत नाहीं तुम्ही मदत कराल ? " हळूच रसनिधीनें विचारलें

लक्ष्मीदेवी रसनिधीच्या बोलण्याचा अर्थ समजली.

" मदत ? मदत तर तो भोलानाथ सदैव करील. आमच्या राजमहालातील महादेवाच्या ठिकाणीं सर्वांची भक्ति आहे सर्व त्याला मानतात. सर्वांच्या नवसाला तो पावतो त्या महादेवापाशीं येऊन मुंजानें महादेवाला एक बिल्वपत्र वाहिलें तर त्याच क्षणीं आकाशमार्गानें मुंज धनन्तीला जाईल असें त्या महादेवाचे ठिकाणीं सत्व आहे. "

रसनिधि या शब्दाचा अर्थ समजावा म्हणून थोडा वेळ खालीं पाहत उभा राहिला. व मग म्हणाला. " बस्स, इतकेंचना ? तुमची खात्री आहे ? "

" होय. पण तेथे आलें पाहिजे "

" ते कसें घडेल ? त्रिशुलधारी भगवान कुदळीपावड पाठवील तर कांहीं होईल. "

" रसनिधि ! तुमची कल्पनाशक्ति जबर आहे.

" त्या वाचूनच मी कवि झालों वाटते ? देवी ! शंकराला प्रसन्न करण्याचा एखादा मार्ग दाखवा. "

" श्रद्धा ठेवा. "

" देवी ! आमच्या मनानें म्युनाभिपत्नीच्या पट्टराणीच साक्षात श्रद्धेचा अवतार आहेत "

" ही श्रद्धा सदैव फलद्रूप होईल " धनंजय मध्येच म्हणाला.

" रसनिधि ! वज्रासारखें कठिण हृदय आहे ? " भ्रुकुटी चढवून लक्ष्मीदेवीनें विचारलें

" होय "

" इकडे या "

शब्द बोलल्याशिवाय लक्ष्मीदेवी आणि रसनिधि हीं दोघे एकमेकाच्या बोलण्याचा अर्थ समजलीं, आणि पुढे देवी व मागें कवि असे तीं महालाच्या एका पडीत व एकांताच्या बाजूकडे मुकाट्यानें चाललीं

महालाचा एक भाग जीर्ण होऊन पडावयास लागला होता, त्याचें बांधकाम चाललेलें होतें, तिकडे लक्ष्मीदेवी गेली. थोड्याशा अंतरावर एका झाडाखालीं कुदळी, पावडें, टोपल्या वगैरे बांधकामाला लागणारें सर्व सामान पडलेलें होतें. लक्ष्मीदेवीनें बोटानें तें सामान दाखविलें व रसनि[illegible] होकार भरला

तेथून कांहीं एक न बोलल्याशिवाय लक्ष्मीदेवी थोड्या दूर अंतरावर एक विहीर होती त्या विहिरीवर कवीना झाडाझुडपाच्या रस्त्यातून घेऊन गेली

" या विहिरींतील भुयार राजमहालाच्या खालीं निघतें. " लक्ष्मीदेवीनें हलुंच रसनिधीच्या कानात सांगितलें. " आणि ज्या खोलीत हे भुयार निघतें तेथून अंदाजानें तीस एक हात दूर दुसऱ्या भुयारात—"

" मुं—

लक्ष्मीदेवीनें आपल्या ओठावर बोट ठेवून त्याला चूप केलें. आणि तिघे जसे जशीं गेलीं होती तशीच अंधारात लपत छपत परत येऊन निश्चिंत विश्राम टाकूं लागलीं.

"हे पलीकडले आमच्या राजमहालातील शिवालय. या महादेवाविषयीं दंत-कथा अथवा लोकवार्ता काय आहे हें तुम्हाला माहीत आहे ?"

"नाहीं."

"रोज रात्रीं शहराबाहेरील भुवनेश्वर महादेवाच्या मंदिरात तो भैरवाच्या भेटीला जात असतो—"

"कशा तऱ्हेनं ?"

"याचा नंदी फार जबर आहे. मंदिरातून गुप्त होऊन पाताळ मार्गानें तो भुवनेश्वराच्या मंदिरात निघतो."

"असें ?"

"होय. परमेश्वराला प्रसन्न केलें पाहिजे."

"आईसाहेब ! यानें परमेश्वर प्रसन्न होईल ?" जरा उत्साहानं येऊन रत्न-निधि म्हणाला.

"आता भोलानाथाची गोष्ट पुरी झाली. महाराज आता आले असतील. मी येते आता."

"यावं, आईसाहेब." रत्ननिधि कृतज्ञतेनं म्हणाला. "आज आपणच आमच्या कुलदेवी आहां."

"तुमच्या कुलदेवी ?"

"चुकलो." जीभ चावून रत्ननिधि म्हणाला. "अनंतनाथाच्या."

"मी माझ्या स्नुषराजाची ढाल म्हणजे मिळविली—"



## प्रकरण १४ वें.

## लांकडी पिंजरा.

आज रात्रीं मृणालवतीला झोप आली नाहीं. तिला हा अनुभव अपरिचित होता. कारण ती नेहमी स्वस्थ आणि सुखानें झोप घेत असे तिनें डोळा लागावा म्हणून प्रयत्न केला. पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं तिनें ध्यानमग्न होण्याचा प्रयत्न केला पण तेंहि तिला साधल नाहीं. या वेळीं मुंजाच्या पापपुण्याची मोजदाद करण्यातच सर्व सार आहे असें तिच्या मनांत घेतलें.

तासामागून तास, प्रहरामागून प्रहर निघून गेले, पण तिचा डोळा कांहीं लागला नाहीं; व मुंजहि पण डोळ्यासमोरून हलला नाहीं. पापी मुंजाचें पारिपत्य करून, त्याचा निःपात करून, त्याला त्याच्या पापाचें प्रायश्चित्त द्यावें की त्याला त्याच्या पापाचें फळ भोगावयास लावावें, किंवा त्याच्यावर दया करून त्याला पुण्यमार्ग दाखवावा यापैकीं नक्की काय करावें तें तिला समजलें नाहीं. क्षणांत त्याला दुःखी करून, त्याचे हाल हाल करून त्याच्या पापाचें त्याला प्रायश्चित्त भोगावयाला लावावें असें मनांत येई, तर दुसऱ्या क्षणीं त्याच्या आत्म्याचा उद्धार व्हावा म्हणून त्याला निष्कलंक जीवनाचे पाठ शिकविण्याचें तिच्या मनांत येई मनाचा कोणताहि एक निश्चय झाला नाहीं. रात्रभर विचार कर करून शेवटीं कांहींच निर्णय झाला नाहीं. आणि पहाट उजाडली

निर्णय करण्याचें तिनें सोडून दिलें. लांकडी पिंजऱ्यांत मुंजाला कोंडण्याचा हुकूम तर झालेलाच होता, तेव्हां या हुकुमानें जर मुंज कांहीं नमला, त्याला सुबुद्धि झाली तर मग त्याच्याविषयीं कांहीं तरी निर्णय करण्याला सुलभ होईल असें तिला वाटलें. तेलपाचा शत्रु केवढा दुर्बुद्धिग्रस्त होता याची तिला खात्री पटली, व त्यामुळेंच तेलपाचा व तिचा प्रताप किती नीतिमान आणि न्यायाचा होता याची देखिल तिला खात्री झाली, व स्वतः आचरलेल्या न्याय-

तीनीमुळेंच तिच्या गावाला शवटी जय प्राप्त झाला असे तिला वाटून या तीनही गोष्टी तो जाहीर रहतेने मानू लागली

सूर्योदय होताच स्नान ध्यान, वगैरे आटोपून ती राजमहालाच्या खिड-कीत आली, तिला पाहताच जकलादेवी आणि लक्ष्मीदेवी पण आल्या. पाप्यांना पायाखाली तुडविण्यात, पाप्याचा मानभंग करून त्याला नमविण्यास किंवा अशास्त्र गरजांच नव्हेतें त्याला शरण आणण्यासाठी आदरलेले दृश्य पाहण्यानच सत्याचा विजय होतो म्हणून अशा प्रसंगी राजमहालातील सर्व व नरनारीजन हजर झाले होते

राजमहालाच्या चौकात देखील लोकाची प्रचंड गर्दी जमलेली होती. राज-महालाखाल एका भीताला लागूनच एक खरा पुरता मोठा गज लाकडाचा पिंजरा तेथ उभा केलेला होता.

पुष्कळदा कित्येक नरेशांवर तेलप राजाच्या बाहुबलाच्या प्राबल्यामुळे निरा-धार होऊन आपल्या पापाचे प्रायश्चित्त घेण्यासाठी अशा पिंजऱ्यात आळी-पाळीने येण्याचा प्रसंग आलेला होता व तसे पुष्कळसे नरेश आळीपाळीने येतहि. भरचव्हाट्यावर–जाहीर ठिकाणीं–तिरस्काराने हसणाऱ्या प्रजाजना समक्ष सर्व दिवस त्याच्या उपहासात घालविल्याने वाटेल त्याचा अभिमान उतरत असे असा तेथ अनुभव आला होता. ज्याला सामान्य जनाचा संपर्क लागलेला नाहीं, किंवा ज्याचा सामान्य जनाशी संसर्ग नसे त्याच्या आजूबाजुला अनेक प्रकारचे लोक येऊन त्यांनी त्याचा चेष्टा करावी व एखादे वेळी त्याच्या तोंडावर थुंकावे, कधीं त्याच्या अंगावर मातीची ढेकळे फेकावी; तर कधीं खाल्लेल्या मेवा-मिठाईच्या—बर्फीच्या वड्यांचे अवशेष त्याचे अंगावर फेकून किंवा नाना प्रका-रचीं कटुवचनें बोलून त्याला ( कैद्याला ) आपल्या अवनत स्थितीचे भान कर-वावं असा तेथील रीवाज होता, व त्यामुळे जे कधी सिंहासन किंवा अंबारी या शिवाय अथवा छत्राचामरांच्या अवडंबराशिवाय कोठेंच बसले नाहींत किंवा गेले नाहीत ते निराधार होऊन तेथ पिंजऱ्यात उभे राहात, व शेवटीं थकून गेल्याने दीन होऊन पिंजऱ्यात बसत किंवा निजत.

ही विलक्षण युक्ति भल्याभल्याच्या मानभंग करीत असे. इंद्रासारख्या प्रब-लाचा रुबाब फिका पाडी व कर्णासारखे दानेश्वरांना दीन बनवून शरणत्वाची याचना

करावयाला लावी. अवमानेच्या अशा अनुभवामुळे प्रत्येक जण जीभ चावून अथवा जीभ ओढून घेऊन किंवा डोके आपटून अगर अशाच अन्य तऱ्हेनें मृत्यु आणून घेऊन शांती मिळविण्याचा प्रयत्न करीत असे, मृत्यूच्या अशा प्रत्येक प्रयत्नात तो निष्फळ झाल्यावर लोक हंसत व त्यामुळे कदी दीन होऊन जाई, व त्यामुळें तैलप राजाची कीर्ति दाही दिशाला पसरत होती

मृणालवतीची विवेकबुद्धि जड झाली नव्हती, पिंजऱ्यात घातल्यान मुंजाचा मद उतरून जाईल व त्या योगानें सत्याचा जय होईल अशी तिला खात्री होती.

त्याठिकाणी लोकांचो देखिल खूपच गर्दी झालेली होती सैनिक मोठ्या मुष्कि-लीने लोकांना पिंजऱ्यापासून दूर ठेऊं शकले.

सर्वजण एकसारखे लक्षपूर्वक पहात होते, मृणालवतीच्या स्वस्थ हृदयात — छातींत—केवळ अधीरतेचेच ठोके पडत होते इतक्यात चार सैनिकांनी राजमहालाच्या दरवाज्यातून मुंजाला त्याच्या पाठीशी त्याचे हात बांधून पिंजऱ्यात आणून घातलें

मुंजाच्या मुखमंडळावर पूर्वीचीच शांति आणि तोच गौरव- रुबाब -, त्याच्या नेत्रात तेंच हास्य, आणि त्याच्या दिव्य शरीराच्या ठिकाणी तीच स्वस्थता होती, हौसेनें एखाद्यानें हत्तीच्या अंबारींत चढून बसावे त्याप्रमाणें त्यानें पिंज-ऱ्यात उडी घातली व थोडेसें हसून त्यानें चारी बाजूला पाहिले

तो आला तेव्हां लोकांनीं थोडी थट्टा मस्करी करण्याला व त्याची टेवढी उडविण्याला सुरवात केली होती; परंतु त्याचे स्वरूप व त्याचे हास्य पाहताच सर्वजण एकदम चूप झाले जिकडे तिकडे शांति पसरली. त्याला भरून आण-णाऱ्यापैकीं एका सैनिकाला स्वस्थ न राहवल्यामुळें तो म्हणाला'—

" कसें काय पृथ्वीवल्लभ ? मजा आहेना ? तबियत तर ठीक आहेना ? "

मुंज त्याच्याकडे वळला, आनंदाने हंसला, व व्यायासारखा मलंग पाय उचलून त्यानें त्याला अशी एक लाथ मारली की ठोकरेसरशीं एखादा विटेचा तुकडा अथवा मातीचें ढेकूळ दूर जाऊन पडावे त्याप्रमाणें तो बिचारा अधर असा उडाला व सैनिकांनी आपल्याला परत जाण्यासाठीं उघड्या ठेवलेल्या दरवाज्यातून बाहेर लोक होते तेथे जाऊन आदळला.

त्याबरोबर मुंज म्हणाला " तुझ्यापेक्षा विशेष—"

लोक एकदम खो खो हंसत, टाळ्या वाजवू लागले आणि रस्त्यात निराधार पडलेल्या सैनिकाची मस्करी करूं लागले. गच्चीवर असलेल्या स्त्रियाच्या पोटात देखिल हंसे मावेनासें झालें. दुसरे सैनिक लागलीच त्वरेनें पिंजऱ्याच्या बाहेर पडले व त्यानी पिंजऱ्याचें दार बंद केलें.

पडलेल्या शिपायाला दुसऱ्या शिपायानीं मोठ्या मुष्किलीनें उभें केलें, त्याला होणाऱ्या वेदनानीं तो अरेरें, बापरे करायला लागला त्याच्या या कृतीला लोक हंसत होते व मुंज पण हंसत होता त्याला दुसऱ्यानीं उभे केलें तेव्हा पिंजऱ्यातून मुंज म्हणाला —

" भाई ! तू तर मजेंत आहेसना ' तुझी तबियत तर ठीक आहेना ? "

लोक एकदम खदखदा हसले सर्वजण मुंजाबद्दल द्वेषभाव विसरले व त्यानें केलेल्या गमतीने खुष झाले

या गमतीनें हसणारा मुंज चोहोकडे आनंदानें पाहूं लागला. त्यानें गच्चीकडे नजर फिरविली. मृणालवतीकडे पाहिलें, आणि मस्तक नमवून नमस्कार केला. जक्कला थोडी हंसली पण लक्ष्मी तर खदखदा हसू लागली मात्र मृणालवतीनें त्या वेळी मनगट चावले व ती ते दृश्य पाहात राहिली या पाऱ्याचे ठिकाणीं खिन्नतेचा लेश देखिल नव्हता, त्याचा रुबाब-गौरव कायम होता, त्यांत मुळींच भंग पडला नव्हता, व त्याची स्वस्थता, शांतवृत्ति निश्चल होती काय ! हा मनुष्य कवडीमोल होणार नाहीं ! याच्या अब्रूच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होऊन लोक याची छी थूः करणार नाहींत ?

मुंजानें त्याच्या पिंजाऱ्याच्या आजूबाजूला उभे असलेल्या लोकाकडे पाहिलें.

" तुम्हीं हे काय करीत आहात ' तुम्हाला कांहीं लाज नाहीं वाटत ? तुमच्या राजानें आज अवन्तीपतीला पकडून आणलें आहे आणि तुम्ही आज अशा साध्या पोषाखात ? व असे वेड्यासारखे ? जा, जा, " मजेनें हंसत हसत मुंज म्हणाला, " जरा फक्कड- नवरदेवासारखे—होऊन या तैलंगणाच्या सुंदरी कोठें आहेत ? स्त्रियाशिवाय विजयोत्सव कधीं तरी साजरा होतो ? रंग, राग, वगैरे सर्व सामग्री येथें पाहिजे."

तेथें उभे असलेले सर्व लोक हंसले मुंजानें एका लहानग्या मुलीला बोलावलें.

" बाळ ! इकडे ये. तुला गाता येते ? "

" गाता ? ":

" वेडे ! अवन्तींत तर तुझ्या एवढया मुली गातात, त्या वाजवितात, नाचतात. तुला नाचता येते ? "

" नाही. "

" हत तुझी. गाता येते ? "

" नाहीं "

" तुम्ही कशीं माणसं आहात ? बिचारा तैलप विजयी होऊन आला व तुम्ही त्याचे यशोगीत गाऊन सत्कार देखिल करीत नाहीं. चल तुला मी शिकवितो. तुला संस्कृत येते ? "

" नाहीं, महाराज ! "

" ठीक. पाहा तुला मी आता शिकवितो—तुझी तैलंगणी भाषा मला बरो-बर येते कीं नाही ते मात्र पहा हो —"

" तैलपाची नगरी सदा रस—गान तान विहीन ही—"

" बोल पाहूं ? तुला पाठ झाले का ? " खाली वाकून प्रेमळ शब्दानी मुंजानें विचारलें

बिचारी बालिका लाजली व खाली पाहू लागली लोक देखिल हसतमुख झाले व पाहूं लागले

"बोल—बोल! अशी घाबरतेस का ? हे बघ मी तुझ्याबरोबर गाऊं लागतो "

मुलीने वर पाहिलें आणि असा स्नेहभरित-प्रेमळ--आवाज, असें प्रतापशाली मुख, अशी श्रद्धा आकर्षण करणारी दृष्टि पाहून तिचा घाबरेपणा नाहींसा झाला, व ती मुंजाबरोबर हळूहळू गाऊ लागली " तैलपाची नगरी सदा—"

" शाबास ! " मुंज ह्मणाला " चालू दे —रसगान तान विहीन ही—"

बाळा गाऊं लागली, लोक देखिल हळूहळू गाऊं लागले मुंजानें मोठा गळा काढून दुसरी ओळ ह्मटली —

" ती पृथ्विवल्लभ पदस्पर्शे मुदित, रसमय गीत ही— "

मुंजाच्या संस्कारी आणि बुलंद आवाजाच्या प्रताप्रेनं शमला लोकांच्या हृदयांत धडधडाट सुरू झाला, त्याना भीती वाटूं लागली, आणि त्यांनी भीतीयुक्त नेत्र गर्दीत बसलेल्या मृणालवतीकडे वळवले

मुंजानें थट्टेनें विचारलें — " मृणालवतीला तुम्ही घाबरता ? घाबरण्याचें कारण नाहीं. त्यांनीं देखिल ही गोष्ट कबूल केलेली आहे " मृणालला ऐकुं जाईल अशा तऱ्हेनें मुंज म्हणाला. मुंजाचा मधुर हसता आवाज सर्व ठिकाणीं पसरला होता मृणालवतींच्या क्रोधाला पार राहिला नव्हता. तिच्या नेत्रांत विद्युत चमकली व कदाचित तिच्या ठिकाणची अस्वस्थता कोणाच्या नजरेस येईल या भीतीनें ती तेथून एकदम चालती झाली

गच्चीच्या बैठकींत तिच्या जाण्यानें भंग पडला जक्कलादेवी देखिल तेथून उठून गेली. थोडशा दासीहि गेल्या मात्र लक्ष्मीदेवी प्रफुल्ल हृदयानें सर्व पाहात होती

मुंज पुन त्या बालेकडे वळला व म्हणाला " बाळ ! चल पुरे कर पाहूं— व तैलपाची नगरी सदा रसगान तान विहीन ही ! ! ही पृथ्विवल्लभ पदस्पर्शे मुदित रसमय होत ही ! ! "

निरंपेक्ष भीतभीत ती कडवीं म्हणाले

इतक्यांत राजमहालांतून पंचवीस तीस सैनिक आयुधांसहित आले व लोकांची झुंडी विखरण्यासाठीं त्यांच्यावर ते तुटून पडले

लोक जीव घेऊन पळूं लागले मुंज पिंजऱ्यांत उभ्याउभ्या हसत होता समो रील गच्चीवर लक्ष्मीदेवीच्या हास्याचें प्रतिबिंबहि पूर्णपणें पडलें



# प्रकरण १५ वें.

## माधवाचा संयम.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं स्नानसंध्या आटोपून शिवाला बिल्वदळ वाहण्याच्या मिषानें ज्या महादेवाच्या प्रतापाची गोष्ट लक्ष्मीदेवीनें मागितलेली होती त्या शिवालयात दर्शनाला रसनिधि गेला.

तेथे विलास ध्यान करीत आहे असें पाहताच रसनिधि थोडा थांबला, व अरसिक वृद्धाना शोभेल अशा पद्मासनाला त्या कोमल व लावण्यवती बालिकेनें मोहक बनविलेलें त्यानें पाहिलें—पद्मासन घालून बसलेली विलास त्याला अत्यंत रम्य दिसली तिच्या मिटलेल्या नेत्रांचा सुंदर घाट, तिची अस्पष्ट अंगरेखा, तरी पण त्यातील अपूर्व मोड तो एक पळभर कवीच्या दृष्टीने पाहू लागला. पाहता पाहतां त्याचें अंतःकरण वैराग्याच्या प्रखर तापानें कोमेजून जाणाऱ्या वेलीला, तिजवर अमृतरसाचें सिंचन करून जिवंत ठेवण्यासाठी तिला वाचविण्यासाठीं तळमळूं लागलें

नंदी कोठे होता ते त्यानें पाहिलें व जवळ जाऊन शंकरावर बिल्वपत्र वाहून दरवाजाजवळ विलासचें ध्यान पूर्ण होण्याची तो वाट पाहत उभा राहिला.

थोड्याच वेळानें कोणी आलें रसनिधि मागें वळला आणि सत्याश्रयाला येतांना पाहून जणूं काय बिल्वपत्र वाहून, पाहत पाहत जात आहो असा डौल करून तो मंदिराच्या पायऱ्या उतरूं लागला.

“ कोण आहे ? ” रुबाबानें भिंवया चढवून सत्याश्रयानें विचारलें.

“ मी ? अवंतीनाथाचा कवि आहे- ”

“ महासामंतानें सोडविलें त्यातील ? ”

तिरस्कार पूर्ण प्रश्न, तरी रसनिधि शांततेन पाहूं लागला व कांहीं वेळानें उत्तरला; “ होय. ”

“ येथे कशासाठीं आला आहेस ? ”

" शंकराचें दर्शन घ्यायला." तुसडेपणानें रसनिधीनें उत्तर दिलें.

" तुमच्यासाठी गावांत शिवालयें पुष्कळ आहेत. या ठिकाणी दुसऱ्या कोणाला येण्याचा हुकूम नाहीं."

" शंकरभुवन सदासर्वदा सर्वांसाठी असतें. आमच्या येथे तर असा नियम आहे, येथे कसा काय नियम आहे त्याची मला माहिती नाही."

अशा सत्तापूर्ण आणि मर्मरांत उत्तरामुळें सत्याश्रयाने रसनिधीकडे पाहिलें, पण अशा भिकारड्या माणसाबरोबर वाचावाची करीत बसू नये ह्मणून तो इतकेंच ह्मणाला —

" ठिक! पण आता तर माहिती झाली ना?"

याचे उत्तर रसनिधीकडून मिळण्यापूर्वीच सत्याश्रयकुमार तेथून निघून गेला. कवीनें थोडावेळ आपले ओठ दाबून धरिले व तो सत्याश्रयाकडे पाहत राहिला. सरस्वतीच्या भक्ताला अनुचित असा क्रोध त्याच्या अंतःकरणात भरला होता.

तो मंदिराच्या मागे जाऊन उभा राहिला. आणि थोड्या वेळानें सत्याश्रय मंदिराबाहेर निघून राजमहालात गेल्यावर तो पुन मंदिरात शिरला. विलास महादेवाची पूजा करीत होता.

" का, विलासताई! कसें काय चालल आहे?" रसनिधीनें विचारलें.

" आताच ध्यान आटोपलें."

" अशा रमणीय सकाळच्या वेळेला येथे स्वतःला कैद करून घेणें तुम्हाला बरें आवडते!"

" मला यात कैद अशी वाटतच नाहीं ध्यान केल्याशिवाय चित्तवृत्तीचा निरोध कसा होईल?"

" निरोध कशासाठीं केला पाहिजे याचाच तर मला उमज पडत नाहीं?"

" पाहाना? उदयामती नाही त्यामुळे तुम्हाला किती दुःख सहन करावें लागते. निरोधाची सवय असली म्हणजे असं होत नाही."

रसनिधि हंसला. " तुम्हाला उदयामतीची आठवण राहिली वाटते?

"होय सर्व रात्रभर तिच्या विषयींचीं. तसेंच तुम्ही ज्या नाटकाचें नाव घेतलें त्याची स्वप्नें पडत होतीं."

" याला तुमचा निरोध म्हणतात नाहीं?"

" माझ्या ठिकाणी थोडासा दोष आहे खरा. " विलासने हसून कबूल केलें, " पण मी तर अजून विद्यार्थिनी आहे. कच्ची आहे. "

" परमेश्वर करो आणि तुमची वाणी सफळ होवो. "

विलासवतीनें मुकाट्याने महादेवाला फूल वाहिले, नमस्कार केला व उठली.

" आता कोठे जाणार ? "

" माईसाहेबाना प्रणाम करावयाला "

माईसाहेब तर पृथ्वीवल्लभाला विजन्यात टाकणार आहेत तें पाहण्याला गेल्या आहेत.

" तर मग काय करू ? तुमचें नाटक ऐकत्रा पाहू ? तुम्हाला कोठे जावयाचें तर नाहींना ? "

" नाही " रसनिधि म्हणाला, " हें नाटक ऐकून काय करणार ? त्यात शुष्क वैराग्य नाही, संयम नाहीं, किंवा चित्तवृत्तीचा निरोधहि नाही त्यात तर दोन निर्दोष आणि निखालस--सरळ-हृदयाच्या प्रेमळ बालकांची कथा आहे ते एकमेकाना प्राणाहून देखिल अधिक मानीत, एकमेकाना पाहण्यातच त्याना मुक्ति सिद्ध झाली असें वाटे त्याच्या हृदयांला त्यागाची अंधारी--झापड--नव्हती, त्यान्च्या उर्मीवर उपवासाचा अकुश नव्हता. तुम्ही अशांची कथा ऐकून काय करणार ? "

" माझ्या आईनें ती ऐकली आहे तेव्हा मी काय म्हणून ती नको ऐकू ?"

रसनिधि रसपूर्ण दृष्टीनें विलासकडे पाहू लागला. " ऐका तर. विदर्भ राजाचा अमात्य देवरात याचा पुत्र माधव, पद्मावतीला अभ्यास करण्यासाठी आला. तेथें मदनोद्यानात अमात्य भूरिवसूची कन्या मालती इला त्यानें अचानक पाहिले, व त्यामुळें तो प्रेमाने वेडा झाला "

" प्रेमानें वेडा ! "

" होय. तुमच्या भाषेत सागावयाचे ह्मणजे एका पळात त्यानें संयम अनुभवला. "

" तो कसा. ? "

" त्यानें मालतीचे ठायीं चित्त स्थिर करून धारणा केली. तिच्या स्वरूपी

एकतानता साध्य करून ध्यान केलें आणि तिलाच बघत राहून स्वत चें स्वरूप तो विसरला.—हीच समाधि त्रयमेकत्र सयमं ? [1] "

विलासच्या हसण्याला पार उरला नाही. " वारे वा ! याचा सयम. "

"तुम्हाला जे प्राप्त करण्यासाठीं इतकीं वर्षे लागतात त्याचा त्यानें एका पळात अनुभव घेतला "

" पटे ? "

" पटे काय ? बिचारा मालतीवाचून अधीर बनला. त्याने आपल्या मित्राला आपले दु ख सागण्याला सुरवात केली--"

" काय ? "

" की ती होती त्या वेळी जें हृदय विस्मयान स्तब्ध झाले, भावशून्य बनले, अमृतात न्हात्याप्रमाणें आनदाने मद झालें -तें तिच्यावाचून अग्नीचा स्पर्श झाल्याप्रमाणें जळून जळून भस्म झाले [2] "

" अरेरे बिचारा ! "

" म्हणजे काय झाले ? मोजमाप करता येणार नाही असा, ज्याचे वर्णन करता येणार नाहीं असा, साऱ्या जन्मात ज्याचा अनुभव घेतला नाहीं असा, विवेकाच्या विनाशाने वाढणाऱ्या मोहाच्या रोगानें गहन असा विकार त्याला सताप देऊ लागला· त्याला जड करू लागला बिचारा भ्रमित होऊन गेला डोळ्यांत पाणी आणून मित्र मकरदाला तो म्हणाला:—

"मित्रा ! पडलेल्या वस्तूची पारख होत नाही. सरोवराच्या शीतळ जलात, मधुर चद्रिकेंत देखिल सताप शमविण्याचें सामर्थ्य नाहीं बघो ! मन एके ठिकाणीं स्वस्थ होऊन राहत नाही तें भ्रमण करिते-काहीं कांही पाहतें. [2] "

रसनिधि फक्त गोष्टीच करीत नव्हता—पण तो भाव देखिल अनुभवित होता. तो विलास, शिवालय, मान्यखेट सर्व विसरला होता. त्याच्या नेत्रांत काहीं निराळेच तेज झळकत होतें. हळहळु तो आपल्या हृदयांतील उद्गार भवभूतीच्याच शब्दांत बाहेर प्रगट करावयाला लागला.

" दुनियेंत चद्रकला आहे-पुष्कळ वस्तु विजयी आहेत. प्रकृतीमुळें मधुर होऊन त्या मनाला आनद देतात पण जेव्हा माझी विलोचन चंद्रिका माझ्या

---

१ पातजल-योगदर्शन २ मालती-माधव.

नजरेला पडली त्याच वेळी महाराजाचा महोत्सव झाला. अशा महोत्सवकर्त्रीला कोण विसरेल ? माधवाचा कांहीसा दोष तरी होता तो तर मालतीला येथें, तेथें, मागें पुढे, आत आणि बाहेर दाही दिशाला पाहू लागला "

रसनिधि थांबला त्यानें दीर्घश्वास घेतला बोलता बोलता त्याचें अंतःकरण द्रवलें निश्वास टाकून तो म्हणाला —

" ज्यानें हें अनुभवलेंच नसेल त्याला प्रमसमाधींत काय समजणार ? "

विलास तर ह्या शब्दांनी, या भावानी दिङ्मूट होऊन पहात राहिली. तिचे डोळे पाण्यानें भरून आले

" विलासवती ! हा नाटकाचा पहिला अंक " रसनिधीनें देखिल उत्तरान्या शेवानें डोळे पुसले

" कविराज ! तुमच्या देखिल डोळ्याला पाणी आलें ? "

" नाही येणार ! या वेळी मी देखिल माधवाचीच स्थिति भोगीत आहे कोठें मी आणि कोठे माझी उदयामती "

क्षणभर दोघेहि स्तब्ध उभी राहिली

' राहिलेलें नाटक मग एखाद्या वेळीं सांगा " विलासनें आश्वासन देताना हळूच प्रेमळ शब्दात म्हटलें

" जशी इच्छा " असें ह्मणून रसनिधीनें पुनः निश्वास टाकला हेतुपूर्ण हृदयानें व अश्रुपूर्ण नयनानें विलास बघत राहिली.

" चला तर मग मी आपली रजा घेतो. " थोड्या वेळानें रसनिधि म्हणाला.

" बरें तर " म्हणून दोघेंहि मुकाट्यानेच एकमेकापासून दूर झाली



## प्रकरण १६ वें.



### पुनः एक प्रयत्न.

आत्मसंयमाच्या मर्यादे बाहेर मृणालवतीचा राग गेला. जप, तप, ध्यान किंवा पारायण यानीं तो शमला नाही. पृथ्वीवल्लभाचें विजयी हास्य तिच्या दृष्टीसमोर उभें होते—त्या दिव्य हास्याचें दृश्य जणू तिच्यासमोर खेळत होतें—व ते आपली सत्ता सर्वांवर प्रस्थापित करूं लागलें. शांत, सपाट आणि शुष्क रणप्रदेशावर मोठ्या लाटा उसळूं लागल्या. साहराच्या वाळवंटांतून प्रवास करणाऱ्या प्रवाशास पिण्याच्या थंड पाण्याचा झरा कर्मधर्मसंयोगानें दिसला म्हणजे त्याची जी अवस्था होते तद्वतच मृणालवतीच्या मनाची स्थिति या वेळीं झाली.

दुसऱ्यास अधमतेचा स्वाद चाखविण्यासाठीं ती गेली होती, पण उलट तोच स्वाद आपण चाखून ती परतली. तिला आपल्या कार्यांत यश मिळालें नाहीं. मनात शंका उत्पन्न झाली, विजेता कोण—आपण स्वतः कीं पृथ्वीवल्लभ? या उपनांवानें ती केव्हांहि मुंजाला संबोधित नसे—त्याच्या गोष्टी या नावानें ती करीत नसे. तरी पण हें नांव त्याचेंच आहे असा तिला भास होऊं लागला. जस जसा अधिकाधिक हा भास होऊं लागला तसतशी तिची जास्तच तारांबळ उडूं लागली ती विवंचनेत पडली

मनात अस्पष्ट तऱ्हेनें अशी जाणीव उत्पन्न झाली हा पुरुष अद्भूत आणि अप्रतिम आहे; परंतु बुद्धीच्या साहाय्यानें ही जाणीव तिनं दाबून टाकली, हा भ्रम आहे असें समजून त्याला दूर करण्याचा तिनें प्रयत्न केला. त्याच्या ठिकाणीं होतें तरी काय? तो मनुष्यासारखाच मनुष्य होता, या विचाराचे उद्गार तिनें हजारदां तोंडावाटे काढले. तरी देखिल अंतस्थ आवाजानें वरील प्रश्नाचा प्रतिध्वनि उत्पन्न केला 'काय? माणसासारखाच माणूस?'

दुपार झाली. सूर्यनारायणाच्या प्रतापाला भिऊन जाऊन पौरजन घरांत दडून बसले; रस्ते शून्य झाले, नगरामध्यें निर्जनतेसारखी शांति पसरली.

आपल्या एकान्त खोलींतील निर्जनतेत देखिल या विचित्र विचाराने केलेल्या गर्दीमुळें ती घोंटाळली. तिच्या मनांत अशा एकान्त स्थळींसुद्धां निरनिराळ्या अकल्पित विचारांनें गर्दी करून सोडल्यानें तिचा अतिशय त्रेधा उडाली.

तिच्या तरतरीत आणि तेजस्वी मदूनें या नवीन परिस्थितीशीं झगडण्यासाठीं, या नवीन ताराबळीच्या शमनार्थ आणि मुंजाला नमविण्यास्तव नवीन नवीन युक्त्या शोधण्याची सुरुवात केली. शोध पुष्कळ केला पण त्याचा कांहींहि उपयोग झाला नाहीं, एकहि युक्ति सापडली नाहीं.

तिने खिडकी उघडली. रस्ता निर्जन होता एक चिटपाखरूंदेखिल फिरकत नव्हते. गरम वारा वाहत होता. अति परिचयाच्या शिक्षणानें, मिळविलेल्या निर्द्वंद्वतेमुळं हा प्रखर ताप तिच्या गणतीत नव्हता या उन्हाचें तिला कांहींच वाटलें नाहीं, तरीपण जंगलात वणवा प्रगट होण्यापूर्वी पडलेल्या पाचोळ्यात विस्तव जमा धुमसतो त्याप्रमाणें तिच्या अंतरंगात कांहींसें होत होतें, आणि त्याचा ताप अस्पष्ट होता तरी तिच्या अंत:करणाला त्यानें शेकण्याला सुरवात केली होती.

थोडया अंतरावर एका आगाशींत एक स्त्री आपले कपडे सुकवित होती. उन्हाच्या कडाक्यानें शुकशुकाट झालेलें शहर स्मशानाप्रमाणें शांत होतें. त्या शान्तींत ती स्त्री गात होती. तिच्या गाण्याचा आवाज ऐकू येत होता

" तैलपाच्या नगरीमध्यें गायनरस आनंद विलसे—"

मृणालवतीच्या नयनातून अग्नीच्या कणाचा वर्षाव होऊं लागला क्रोधानलाची एकदम पेटलेली ज्वाला शमविताना ती कंपायमान झाली. तिचा क्रोध तिला आवरेनासा झाला. तिरंदाजाला बोलावून त्या गात असलेल्या स्त्रीचे तुकडे तुकडे करण्याचा हुकूम देण्याविषयी तिच्या मनांत आलें, परतु हें कृत्य केवढें मूर्खपणाचे दिसेल हा विचार तिच्या मनात येतांच तिनें आपल्या मनाला आवरलें . या सर्व अशांतीचें मूळ कारण मुंज होता. मग या गरीब बिचाऱ्या निर्जीव प्रजेवर त्याचा राग काय म्हणून काढावा ?

तिनें आपला राग आवरून पुन: विचार करण्याला सुरवात केली. कोणत्या तऱ्हेनें मुंजाला चित करतां येईल ? लांकडी पिंजऱ्यानें तर उलट मुंजाची महत्ता प्रस्थापीत केली होती; तो लांकडी पिंजरा त्याच्या महत्तेचे सिंहासन

झाला होता. मुंजानें उच्चारलेल्या शब्दाचा प्रत्युच्चार करून तैलंगणाची प्रजा राजानें काढलेल्या आपल्या फरमानाचें उल्लंघन करीत होती. याला आतां उपाय तरी कोणता योजावा ?

ती दुसऱ्या सज्जांत गेली तेथून लांकडी पिंजरा दिसत होता. तिच्या हुकुमानें सेवक पिंजऱ्याच्या चारी बाजुला पाहरा करीत होते.

या प्रखर ताप्यांत आणि अशा परिस्थितीत देखिल मुंज जसाचा तसाच उभा होता, व दोन तीन शिपायांबरोबर गोष्टी करीत होता. तो हंसतमुख असून त्याच्या डोळ्यांत पूर्ण आनंद भरला होता त्याच्या ठिकाणचा अपूर्व गौरव अजून अभंग होता त्याच्या शरीराचे ठिकाणीं गुलामाच्याठायीं असणारी नम्रता आली नव्हती त्याचा तेजस्वीपणा कायम होता. तें हंसतमुख आपल्या विजयश्रीनें तेज प्रसार करीत होते.

सज्जाची खिडकी उघडताच मुंजानें वर पाहिलें आणि प्रतापशाली सौंदर्यानें अपूर्व दिसणाऱ्या ओठांतून एक भयंकर हास्यबाण मृणालवर सोडला. त्यानें आपलें कार्य केले. रागानें मृणालनें पाय आपटले. सज्जांतून ती परत आली आणि तिनें जोरानें दार बंद करून घेतलें

“ कोणी आहे काय ? ” मोठ्यानें तिनें हांक मारली

“ माईसाहेब ! ” एक दासी आली.

“ रणमल्ल नायक तिकडे आहे काय ? ”

“ पाहून येते माईसाहेब ! ”

थोडा वेळ तिनें इकडून तिकडे फेऱ्या घातल्या इतक्यांत नायक आला.

‘ रण ! ” रागानें ती म्हणाली.

“ माईसाहेब ! ” हात जोडून, रागाच्या आवाजाला भिऊन कांपत कांपत नायक म्हणाला.

“ याप्रमाणें तुम्ही माणसें पाहारा करतात वाटते ? ”

“ कशी—”

तिनें जाऊन सज्ज्याचें दार उघडलें व रणमल्लला पिंजरा दाखविला.

" हे तुझे— चौकीदार पाहारा करतात कीं शिमगा खेळ खेळण्याला निघाले आहेत ? जाऊन प्रत्येकाला सक्त ताकीद दे कीं मुंजाबरोबर जो कोणी गोष्टी करील त्याचा उद्या शिरच्छेद करण्यात येईल. "

" जशी आपली आज्ञा " असें म्हणून लवून मुजरा करून नायक परत गेला.

जसजसा सायंकाल समीप येत चालला तसतशी तिच्या अंत:करणात शांति पसरूं लागली, तिला हा राग निरर्थक वाटला. मुंज पापी—आणि म्हणूनच दयेला तो जास्त पात्र आहे तसेंच अशा माणसावर रागावणें ही चूक आहे असें तिला वाटलें अधमावर क्रोध करावा, त्याचा त्याज्य म्हणून तिरस्कार करावा, तिरस्कार करून त्याची अवहेलना करावी हें तिला आपल्या नियमाविरुद्ध आहे असें वाटलें. मुंज अजिबात वाईट तर नसला पाहिजे प्रत्येक मनुष्याचे ठिकाणी—प्रत्येक माणसाचे अंत:करणात— कोणत्याहि एका सद्गुणाचा साठा—मिळतोच. त्या सद्गुणाच्या निधीचा उपयोग केला— तर तें पापी हृदय जरूर निष्कलंक होईल. तिला स्वत:ला आपल्या चुकीबद्दल पश्चात्ताप झाला. तिनें मुंजाला जास्ती गोष्टी करूं दिल्या असत्या तर त्याच्या अंत:करणांतील झाकलेल्या सद्गुणाला संधी मिळण्याला सुलभ झालें असतें व तो हातींहि आला असता. या विचारमालेचें मणी मोजतांना तिला आपल्या स्वत:च्या अपूर्णतेचे भान झालें, व आपण पूर्णता प्राप्त केली आहे, अशी तिची असलेली खात्री नष्ट होऊं लागली.

सायंकाळीं तैलपराज भेटला

" माईसाहेब ! आज कोठे दिसला नाहीं ? "

मृणाल बुझाली ! घोटाळयात पडली ! तिच्या साऱ्या आयुष्यात पहिल्यांदाच काय उत्तर द्यावें हें तिला या वेळीं सुचलें नाहीं.

" आपल्या कीर्तीचा विचार करीत होता ? "

" आता विचार करण्याचें बाकीच कोठें आहे ? "

" मुंजाचा अभिमान उतरला नाहीं तोंपर्यंत तर सर्वच शिल्लक आहे. "

तैलपाच्या लहान डोळयांत लाली दिसूं लागली.

"होय ! मी असें ऐकलें कीं लाकडी पिंजऱ्यांत देखिल त्यानें आपला नीचपणा सोडला नाहीं. "

" होय ! मी सुद्धा त्याच्या गर्वाचें पाणी करण्याचाच उपाय योजीत आहे, त्यानें आपलें नाक मुठींत धरून मला शरण आलें पाहिजे याचाच विचार करीत आहे. "

" कशासाठीं ? "

" उदईक राजसभेत त्याला बोलवावयाचें आहे तेव्हा मी आपणाला भेटेन."

" बरें ! तू घाबरू नकोस. मी त्याला आपल्या दुष्कर्माचा पूर्ण पश्चात्ताप होईल असें करीन "

" आपल्या प्रत्येक शब्दाचे ठिकाणीं माझी श्रद्धा आहे. आपल्या प्रयत्नानें काय होणार नाहीं ? शिवाय उदईक राजसभेंत त्याच्याकडून मी पादप्रक्षालन करवून घेईन तेव्हा तो गोगलगाईसारखा नरम होईल. त्याचा अभिमान अस्तगताला जाईल "

" सांभाळून काम घ हो. हा काहीं दुसऱ्या राजासारखा नाहीं. याला सरळ करणें, रस्त्यावर आणणें कठीण काम आहे ! "

" माई ! आपला आशीर्वाद आणि आपली सल्ला. त्याच्यापुढे कोणाची मगदूर आहे ! आपल्या इच्छेच्या, आपल्या शब्दाच्या उलट वागण्याची कोणाची प्राज्ञा आहे ! "

" बरें ! आतांच मीं त्याच्या भेटीला गेलें तर ? "

" कशासाठीं ? "

" त्याला त्याच्या कलंकित, पापी आणि अधम जीवनाची पूर्ण ओळख करून द्यावयाची आहे. माझ्या कीर्तीवर त्यानें किती तरी धूळ टाकली आहे त्यानें माझी अब्रू—कीर्ति—धुळीस मिळविली त्यानें माझ्यावर कसकशी नाटकें आणि काव्यें रचली व रचविली या सर्व कृत्याचा त्याला रोकठोक चुकता हिशेब द्यावयाचा आहे. "

" तर मग याचा तूर्त वध तर नाहींच करावयाचा ? "

" नाहीं बरें ! तसें केल्यानें आपल्या विजयाचें जीवित फारच अल्प होईल. जसजसा हा कुचंबत राहील, असजसे याचे हाल होतील, जसा जसा याचा मानभंग—पाण उतारा-होईल, तसतशी आपली कीर्ति वृद्धिंगत

होईल. असल्या शत्रूवर आपला पगडा बसविणें हें कांहीं सगळयाच चक्रवर्ती राजाच्या नशीबीं नसतें. आपल्या सारखें भाग्य फारच थोडयाना लाभतें ”

“ बरें तर ! आज आपण त्याच्या भेटीला जावें, उद्यां राजसभा—दरबार—आहे. मग पाहता येईल हा कसा काय वर्तन करतो ते ”

“ लाकडी पिंजऱ्यापाशीं शिपायाचा पाहारा आपण बसविला आहे ? ”

“ होय. मला देवीनें सांगितलें, याची जीभ उपटून काढावी व तें देखिल त्या वेळीं माझ्या मनात आलें. पण त्याला आपली संमती नसति तेंव्हां मी स्वस्थ राहिलो ठीक आहे. येतो, आता काही विशेष नवीन असल्यास रात्रीं कळवावें ”

“ कळवीन बरें. ”

तैलपानें साष्टाग नमस्कार केला व मृणालनें त्याला शुभ आशीर्वाद दिला

*		*		*

मृणालच्या अत करणाला दंश झाला तिचें मन तिला खाऊं लागलें. काय, तिचें हृदय कलंकित झालें होते ? तिनें तैलपाबरोबर मोकळया मनानें का बरें गोष्टी केल्या नाहींत आपले तर्क वितर्क दाबून ठेवावे म्हणून खोट्या नाट्या गोष्टी केल्या ?

परतु या गोष्टीनें तिच्या स्वत च्या व तिच्या भावाच्या पराक्रमाविषयीं तिच्या मनांत जी निश्चित श्रद्धा होती—पण सध्या कमी कमी होत आलेली—ती पुन दृढ झाली. मुजाच्या खोटया आणि दिखाऊ अवडबरानें ती बुझाली होती—दिपून गेली होती. निराधार कैद्याच्या नीचपणाच्या गोष्टीने तिच्यावर मात केली होती ती स्वत· केवढी मूर्ख कीं अशानें ती दिपली होती, अशानें तिने आपणावर मात होऊ दिली होती ! तिच्यासारख्या निष्कलंकित अत करणाच्या ठायीं हें सभवतें तरी ' का तिला हें शोभतें ? तिचे विचार दुसऱ्या बाजूला वळले, तिच्या अंत.करणात जरा हिंमत उत्पन्न झाली. तिला धीर आला. व नाहींसा होणाऱ्या स्वस्थतेला तिनें पुनः दृढ केलें. तिला थोडी शांति मिळाली व शांतचित्ताने, हिंमत धरून मुजाच्या भेटीला जाण्यासाठीं ती तयार झाली.

या माणसाचा प्रत्येक विचार समजून घेणें, याच्या कर्तव्य हेतूचें पृथक्करण करणें, याच्या जीवनजाळाची गुंडाळी उकलणें ही तिच्यासारख्या प्रतापी

योगिनी आणि मुत्सद्दी स्त्रीशिवाय कोण करूं शकणार. ? या कार्यातून निघून जाणें हें तिला भेकडपणाचें लक्षण आहे असें वाटलें तिचा भाऊ मारून मुटकून—अर्थात बळजबरीनें—पादप्रक्षालन करवील; पण ती स्वत निष्कलंक जीवनाच्या प्रबल सत्तेनेंच या अधम अवन्तीनाथापासून पश्चात्तापाच्या जलानें स्वत चे पाय धुववील

रणमल्लाला बोलावून तिनें हुकूम केला, मुंजाला पिंजऱ्यातून भुयारांत घेऊन जावें. हें काम करून नायक परत आल्यावर नायकाला बरोबर घेऊन ती मुंजाला भेटावयाला गेली.



# प्रकरण १७ वें.



## कोणाला कोण शिकवितें ?

कठोरतेनें संकुचित झालेल्या भुंवया, सयमानें नियमित आणि हळूहळू पड-णारीं पाऊलें—मृणालवती माईसाहेबाच्या मनातील भाव व्यक्त करीत होती. तरीपण तिचें चित्त पहिल्याइतकें स्थिर नव्हतें, श्रद्धा देखिल पहिल्याइतकी दृढ नव्हती मनात अस्वस्थतेचें काहुर माजलें होतें.

मागें असणाऱ्या राज्य विधात्रीनीची भयंकर मुखमुद्रा पाहून मशालजी लट-लट कापू लागला, भुयाराचा रखवालदार असल्या विचित्र वेळीं अवेळीं माई-साहेबाना आलेल्या पाहून, तसेंच अकस्मित सयोगाच्या या नवीन प्रकरणानें त्रासला

भुयाराचे दरवाजे उघडले, आणि माईसाहेबाच्या हुकुमाप्रमाणें आत मशाल ठेऊन मशालजी बाहेर येऊन उभा राहिला

मृणाल आत आली व भुयाराच्या अंधकाराबरोबर दृष्टीचा परिचय करू लागली—भुयाराकडील अधाराकडे तिनें पाहिलें.

एका कोपऱ्यांत अवन्तीनाथ हातावर डोकें टेकून पडला होता त्यानें हळूच वर पाहिलें व तो मधुरतेने म्हणाला—" यावें ! मी आपलीच वाट पाहत होतों. "

वाक्य अगदीं साधारण होतें, आवाज असा मान्याचा व खुबीदार होता कीं तिच्या अंत.करणावर स्वत.चा बचाव व्हावा म्हणून जी निरनिराळीं विचाररूपी बखतरें तिने घातलीं होतीं त्याचे वद तुटावयाला लागले.

" माझी ? "

" होय, आपलीच. " पडल्या पडल्या पृथ्वीवल्लभ म्हणाला. मला तर खात्रीच होती कीं तुम्ही आल्याशिवाय राहणारच नाहीं. कसें काय ? ठीक आहेना ?

प्रकृति कशी काय आहे ? " त्याच्या आवाजानें मोहक वातावरण पसराव-याला लागलें मशालीच्या उजेडातहि त्याचे डोळे हंसत आहे असें दिसत होतें.

मृणालने दृढतेनें कमरेवर हात ठेविला व आपला क्रोध आवरून ती ह्मणाली:- " मुंज ! मुंज ! ! तुझ्यात समजण्याची अक्कल नाहीं कीं समजलेलें सांगण्याची सरळता किंवा निखालसपणा नाहीं ? मी माझ्या कामासाठीं येथें आलें नाहीं; पण तुझ्या आत्म्याचा उद्धार करण्यासाठीं येथे आलें आहे पापपंकात आनंद मानणाऱ्या तुझ्या निष्ठुर आत्म्याला शुद्धीच्या पवित्र मार्गाला लावण्यासाठीं आलें आहे. "

" मृणालवती ! परक्याच्या कल्याणासाठीं परमार्थ करणें याची कांहींच किंमत नाहीं. " फारच शांततेनें मुंज ह्मणाला.

मृणालनें निराशेने आपल्या कपाळावर हात ठेविला " स्वतःच्या कल्याणा-साठीं कधी परमार्थ होतो ? "

" दुसऱ्या कशासाठीं ? " मुंज हळूंच उठून बसताना उत्तरला " मी देखिल परमार्थ केला आहे, मीहि गरीबाना तारलेलें आहे आणि दुःखिताच्या दुःखाचें निवारण केलेलें आहे, परंतु हे त्याच्या भल्यासाठीं नाहीं माझ्या स्वार्थासाठीं— हा परमार्थ करतांना माझें हृदय तृप्त होत होतें ह्मणुन- -माझी अहता संतोषित होत होती ह्मणून-- माझ्या मनाला आनंद होत असे ह्मणून. दुसऱ्याचें कल्याण करण्याचें अवडंबर करणें हा देखिल अहंकाराला सतोषित करण्याचा एक मार्ग आहे "

मृणाल मुकी झाली. स्वतः मुंजाचे कल्याण करण्यासाठीं आली होती कीं आपल्या अहंकाराला सतोषित करण्यासाठीं ती आली होती ? मुंजाच्या सूत्रात काहीं न समजण्यासारखी—अगम्य—अशी सत्यता तिला भासूं लागली. तरी देखिल तिनें धैर्यानें उत्तर दिलें:—"हें देखिल तुझ्या नीचतेचें एक लक्षण आहे"

" असेल " हंसून मुंज ह्मणाला. " बोला, आतां मला कोणत्या मार्गाला लावण्यासाठीं आपण आला आहांत ? "

" निष्कलंक जीवनाच्या—"

एकदम मुंजानें आपलें डोकें पुढें करून उत्तर दिलें:—" निष्कलंक ! मृणालवती ! ज्याला कलंक ह्मणजे काय याची जाणीव असेल त्याला निष्कलंक होण्याची जरूरी किंवा परवा तुह्मी मला काय शिकविणार आहांत ? तुम्ही राजाच्या पुत्री, सुरक्षित ठिकाणीं राजप्रासादांत वाढलेल्या, सत्तेमुळे स्वतःला पूर्ण मानणाऱ्या, वैराग्याच्या अभिमानानें फुगलेल्या अशा तुम्हीं मला शिकविणार ? " फारच ममतेनें मुंजानें विचारलें नंतर तो खूप हसला

" दरेकजणात बुद्धि असली तर तो शिकू शकतो. "

मुंज पुनः हसला. "माझ्या ठिकाणीं बुद्धि आहे तरी देखिल तुम्ही मला शिकवूं शकणार नाहीं. शिकवावयाचें कोणाला ? कीं जो दुःखी असेल त्याला जो अपूर्ण असेल त्याला. मला दुःख स्पर्शित नाहीं, अपूर्णतेचा मला अनुभव नाहीं—मी अपूर्णता अनुभवित नाहीं तव्हां मला कसे शिकवाल ? शिवाय मला शिकण्याचें तरी काय शिल्लक राहिलें आहे ? "

" केवढा पण अभिमान ! "

" तुह्मी खुशाल माना. पण माझी कथा—हकीकत—तुह्माला कोठें माहित आहे ? कोणा एका अनाथाचा मी टाकून दिलेला मुलगा आहे; आज पृथ्वीचा वल्लभ आहे. मला सिंहिणींनी दूध पाजिलें आहे आणि गजराजानीं मला वारा घातला आहे. मी भिक्षा मागितली आहे व सिंहासनें दानांत दिलीं आहेत. मी दुःखितासाठीं माझा देह अर्पण केला आहे व सुखी लोकांच्या जीविताची धुळधाणी उडविली आहे म्या रमणीजनाचा रसभांडार लुटिला आहे, व लक्ष्मीसमान ललिताचा शिरच्छेदहि केला आहे श्रुतिवाक्याचा पाठ करितांना देवांना देखिल दुर्लभ अशी घोर तपश्चर्या मी केलेली आहे व शृंगारसूत्रात गुंगतांना बीभत्स रसाचा देखिल मी संपूर्ण अनुभव घेतला आहे. बोला आत्ता काय बाकी राहिलें आहे ? " असें ह्मणून डोकें मागें टाकून उत्तराची वाट पाहत मुंज थांबला.

हीं वाक्यें उच्चारतांना दंतावलीच्या विद्युतेनें दिपून निघालेलें त्याचें मुखमंडळ वर्षाऋतूंतील संध्येसारखें हृदयभेदक बनलें होतें. नयनांतून पडणाऱ्या मधुर धारानीं चारी बाजूला रस पसरविला—थोडा वेळपर्यंत तो पाहत राहिला, हंसला व मिश्र भावनेच्या उमाळ्यानें ह्मणाला:—

" हे सर्व अनुभव मला मिळाले असून देखिल मी सुखी राहिलों आहे. माझ्या ठिकाणीं मी कलंक पाहिला नाहीं. तुम्ही मला काय शिकविणार ? "

मृणालला काहीं उत्तर देतां आलें नाहीं. तिचा कंठ बंद झाला. त्यातून आवाज निघेना व तिचें मन काम करीनासें झालें.

" शिकावयाचें तर तुम्हाला आहे—जीवनाचा अकल्पनातीत आनंद तर तुम्हाला लुटावयाचा आहे तो तुम्ही लुटलेला नाहीं—बाकी राहिला आहे. पुष्प-शय्येत समाविष्ट असलेलें रहस्य तुम्हाला शिकावयाचे आहे. रस–तानात कसें नाचावयाचें हें तुम्हाला शिकावयाचें आहे. "

मृणालनें रागानें हात वर केला. त्याची पर्वा न करिता मुंजानें आपलें बोलणें पुढे चालविलें.

" कोणा रसिकाचा आश्रय—"

" पापी !—" मृणालने दात ओठ चावून म्हटले.

मुंज हसला, तो उभा राहिला व जवळ आला "रससागराचें मंथन करून काय सापडणार तें शिकावयाचे आहे "

" चांडाळा ! नकट ( नीच ) ! लंपट ! " करकरा दांत खाऊन मृणाल म्हणाली. तिचे डोळे लाल भडक झाले तिच्या कपाळावरील नसा फुगून वर आल्या. " उद्या सकाळीं पाहा काय होईल तें "

" ठीक ! व उद्यां संध्याकाळी तुम्ही देखिल पाहा काय होणार तें " हसून मुंज म्हणाला, " मी तुमची वाट पाहीन. "

' माझी वाट ! " मृणालच्या तोंडाला फेंस आला.

" होय ! तुम्हाला सर्व शिकावयाचें आहेना—"

" दुष्टा ! तुझी जीभ "

" माझ्या जीभेनें तर तुमच्यासारख्या कित्येक कामिनींना वश केलें आहे. " शांतीनें मुंज म्हणाला. " पृथ्वीवल्लभाच्या हृदयावर हृदय ठेविल्याशिवाय तुम्हाला सुटका नाहीं—"

मृणाल क्रोधाग्नीनें जळून भस्मीभूत झाली. तिनें समोर उभा असलेल्या मुंजाला जोरानें थप्पड लगावली. मुंज खदखदां हंसला, व त्याने आपल्या हातानें

मृणलचा हात धरून दाबला व तो आपल्या ओठाशीं भेटविला--मृणालच्या हस्ताचें त्यानें चुंबन घेतलें. जणू विंचू अथवा दुसरा विषारी प्राणी चावला अशी मृणालनें किंकाळी ठोकली तिचे डोळे फुलल. तिच्या सर्वांगांत कापरें सुटलें

समोर, नयनांतून अमृत वर्षावित पृथ्वीवल्लभ मधुर हसत होता

" कोणी आहे का ?

" माईसाहेब ! " रणमल्ल आला.

" या पाप्याचे हात का नाही बांधलेत ? "

" होय ! रणमल्ल ! " मुंज शांतानें ह्मणाला " तुझी शृंखला आण, ह्मणजे हृदयाची शृंखला तरी सुटेल. नाहीं तर तिचा प्रभाव दुःसह होईल. "

" रणमल्ल ! या पाप्याच्या हातानें मला स्पर्श केला आहे पहिल्यानें याचे हात डांब "

' आता ? " विस्मय पावलेल्या नायकान विचारलें.

" काय ? " मृणालने या प्रश्नाची धृष्टता पाहून गर्जना केली.

रणमल्ल थरथर कांपावयाला लागला त्यानें एक भाला घेऊन मशालीवर गरम केला.

" चाल ! किती उशीर ? " अधिकारानें मृणालनें पाय आदळला.

" होय, माईसाहेब ! अरे ए, याचा हात धर " दुसरे सेवकास बोलविलें

" मृणालवती ! कशासाठीं तसदी घेतां ? " मुंज गोड स्वरात ह्मणाला "तुमच्या स्पर्शानेंच बिचारी अगें जळताहेत त्याला जाळण्यासाठीं बाहेरच्या अग्नीची जरूर नाहीं. "

" चाल ! " मृणालनें उत्तरादाखल रणमल्लाला ह्मटलें.

सैनिक मुंजाचा शृंखलाबद्ध हात धरावयाला गेले. पण हात बांधले असूनहि बराच वेळ पावेतों मुंजानें सैनिकाला थकविलें.

" भ्याडानों ! षंढानों ! जर त्याला तुह्मी डांबणार नाहीं तर या क्षणींच तुमचा वध करीन " ओठ खावून मृणाल ह्मणाली

निराशेच्या हिंमतीनें सैनिक मुजाच्या हातावर तुटून पडले. आणि मोठ्या मेहनतीने त्याचा उजवा हात ते स्थिर ठेवू शकले. सैनिकाना थकविण्याचें श्रम करिताना देखिल मुज निश्चित उभ्या उभ्या हसत होता.

रणमल्लानें गरम केलेला भाला मुजाच्या हातावर दाबला. मुज कांहीं देखिल बोलला नाहीं. त्यानें तो जोरानें डांबतांच नरमास जळाल्याची दुर्गंधी भुयारात पसरली

जणू काय स्वत चा हातच नाहीं अशा शांतीनें पृथ्वीवल्लभ बेदरकारीनें नयन बाणाच्या योगें मृणालला मोहवश करीत उभा राहिला.

दुर्गंध निघालेला पाहून मृणाल ह्मणाली " पुरें ! "

" अरे तुमची !" मुंजाचा आवाज तसाच शांत, मात्र जरा तिरस्कारानें भरलेला होता. " इतक्यानेंच तुह्मी राजी—खूष—होणार असें मला ठाऊक असतें तर उभ्या उभ्या मी हात जाळला असता "

काय उत्तर द्यावें तें मृणालला सुचलें नाहीं

" मृणालवती ! या डाबाचें—डाग दिला त्याचें—औषध देण्याला उद्यां या हो."

मागें पाहण्याची पण तिच्या ठिकाणीं स्वस्थता नसल्यानें झप झप पावलें टाकीत निराशेनें ती तेथून निघून गेली.



# प्रकरण १८ वें.

## निराधारपणा

मृणालवती गेली—पळाली ती आपल्या खोलींत जाऊन मृगासनावर पडली तिचें डोकें भणभणत होतें तिला चक्कर येत होती तिचे हृदय समजणार नाही अशा तऱ्हेचें तांडव करीत होतें

तिच्या रोमरोमात अग्निज्वाला उठत होत्या तिच्या प्रत्येक श्वासानें त्या ज्वाला वाढत होत्या. इतक्या वर्षांच्या जीवमात असा क्षोभ, अशा तऱ्हेच्या ज्वाला—तिनें पाहिल्या नव्हत्या ज्वाला–प्रतापाचा तिला अनुभव नव्हता

वासनापूर्ण वाक्यें, पुरुषाचा स्पर्श, पुरुष किंवा स्त्रीचें चुंबन, या सर्वांशी ती अपरिचित होती या सर्वांच्या अशा अचानक परिचयाच्या योगानें ती त्रासली तिच्या शरीराचा प्रत्येक भाग कापू लागला. अशा अघोर कलंकातून कसें वागावें, हा कलंक कसा धुवून काढावा हे तिला सुचले नाहीं

तिच्यासारख्या निष्कलंक आणि जीवनमुक्ताला अशा अधम पापाचाऱ्याचा स्पर्श ? जीभ चावून तिचे तुकडे तुकडे करू ? भिंतीवर डोकें आपटून ते फोडून घेऊ ? अग्निकुंडात उडी घालून या देहाला भस्मीभूत करू ? हा कलंक कसा दूर करू ? यातून कशी मुक्त होऊ ? हे कृत्य बघून पृथ्वी रसातळाला का गेली नाही ? सूर्यनारायणानें आपली गति बंद करून तो का थांबला नाहीं ? पृथ्वी मातेनें मला आपल्या उदरांत का घेतलें नाहीं? स्वत: तिनें सर्व सुखाचा परित्याग का केला ? लोकांना सुद्धा सुखाचा आनंदाचा त्याग करावयास मी लाविलें व आतां तोंड तरी कसें दाखवावें ? अशा विचारांनीं तिच्या मन-स्थितीच्या गुंतागुंतीला पारच उरला नव्हता ती भयंकर घोटाळली;—तिच्या आत्म–तिरस्काराच्या प्रवाहानें तिची शान्ति, बुद्धि आणि स्वास्थ्य याला वाहून नेलें. ती बुडणाऱ्या माणसाप्रमाणें वांचण्यासाठीं धडपड करू लागली.

आणि तिचा अपमान ! ती कोण ? सम्राटाची कुमारी, सम्राटाची भगिनी, साम्राज्याची विधात्री—तिचा असा अपमान ! तिच्या मुखमंडळाच्या आजू-

बाजूला असह्य ज्वाळा भडकत होत्या, उकळणाऱ्या लोहरसाप्रमाणें अश्रुधारा वाहू लागल्या. अधम, लपट आणि पापाचारी मुंज तिच्याबरोबर अशा तऱ्हेनें वागला ? तिनें मुंजाला डाग देवविले, त्याचा शिरच्छेद करविला, त्याचे तुकडे तुकडे करविले, अथवा वाटेल तें करविलें तरी देखिल त्याचेपासून झालेला अपमान नाहीसा कसा होणार ? त्याने केलेल्या घोर कर्माचा कोणत्या शिक्षेनें विसर पडेल ? स्वत.च्या निराधारपणाचें तिला भान होताच तिच्या ताराबळीला पारावार उरला नाही तिला अनंत यातना होऊं लागल्या. त्या भरात तिने आपले हातपाय झाडले, मुठी वळल्या आणि दात ओठ खाल्ले, केलेले सर्व विचार निरर्थक आहेत असे तिला वाटलें. मुंज—पापी, लपट मुंज—विजेता झाला ती स्वत अधम कलंकित अशी झाली, व या स्थितींतून निघून जाण्याला मार्ग उरला नाहीं

वरील प्रकारामुळें तिला आपल्या निर्जीवित्वाची जाणीवहि झाली. तिची आत्मश्रद्धा, जी प्रथमतः डगमगू लागली होती ती अदृश्य झाली. तिनें मुंजावर मात करण्याचा विचार केला होता, स्वत च्या व तैलपाच्या सत्तेच्या बळावर त्याला दोनबापुडा करून वठणीवर आणण्याचा तिनें इरादा केला होता, स्वत.च्या शहाणपणाने त्याला दाबून टाकून, त्याला शरमिंदा बनविण्याचा तिला आशा होती. सर्व विचार, व या सर्व आशा पार धुळीला मिळाल्या. सेना वाटेल त्याला सेनापति मानो, माळवा अथवा तैलंगण याचा वाटेल तो मालक होवो, स्वत वाटेल तशी जीवनमुक्त असो, तरी देखिल मुंज पृथ्वीवल्लभ तो पृथ्वीवल्लभच राहणार. ती लाजली, घोटाळली--वरील परिस्थितीची तिला मूर्तिमंत जाणीव झाली. तिच्या डोळ्या समोर तें दृश्य उभें राहिलें मुंज अत्यंत नीच अवस्थेत होता तरी देखिल त्याचा प्रताप मावळला नव्हता—त्याच्यावर काजळी चढली नव्हती. त्याचें व्यक्तित्व निराळें आणि प्रतापी होतें त्याच्याविषयीं ज्याच्या मनात द्वेष भरलेला अशा तैलंगणच्या प्रजेला देखिल त्याने नाचावयाला व गावयाला लाविलें, तिच्यासारख्या प्रतापी आणि मुत्सद्दी साम्राज्य-विधात्रीला त्याने शरमिंदी केली—लाजेनें खालीं पहावयाला लावलें. जणूं काय धनी हुकूम करतो त्याप्रमाणेंच त्याने तिच्यासारख्या प्रभावशाली, प्रतापी आणि भयंकर स्त्रीला देखिल अधमतेचा कटु अनुभव आणून दिला. शरीर तापलेल्या लोखंडाने डागलें तरी देखिल तो

जसाच्या तसाच पृथ्वीवल्लभच राहिला. तिच्या दृष्टीसमोर मुंजाचें तेजस्वी प्रतापी आणि हंसणारें आनदी मुखमडळ उभें राहिलें. जेव्हा रणमल्लानें डाग दिला, तेव्हा तिनें स्वत. देखिल आकाश पाताळ एक केलें असतें. पण त्या वेळेला देखिल त्याच्या मुखावरील शान्ति ढळली नाही. त्याचे डोळे हंसत होते. त्याच्या मुखावरील मधुरतेंत निराशा अथवा दु:खाचें थोडे देखिल मिश्रण झालें नाहीं मुंजाच्या महत्तेचा विचार करताना तिचा अभिमान गळाला! त्याचें पाणी झालें, निराशेनें तिचा गर्व पार मावळला. ती दीन झाली. पृथ्वीवल्लभ मनुष्य नव्हता पण देव होता, तो चित होईल, त्याचा पराजय होईल असें नव्हतें. त्याला पराजित करणें कठिण काम होतें. ती स्वतः, तैलप, इंद्रराजा सर्वजण क्षुद्र आणि निर्जीव होते—मात्र तोच एकटा होता—पृथ्वीवल्लभ!

तिनें भुईवर डोकें आपटून घेतलें; तिच्या डोळयांतील अश्रु सुकले होते पण हृदयांतील उद्वेग मात्र वाढतच राहिला



# प्रकरण १९ वें.

## काळरात्र.

मृणाल तडफडूं लागली, परतु केवळ तडफडण्यानें कोणाचा ताप गेला आहे कीं कोणाचा जात असतो ? ती जमीनीवरून उठली आणि फिरूं लागली, खिडकी जवळ उभी राहिली—दारापाशीं जाऊन पुनः परतली तिची जीभ कोरडी पडली होती चावून चावून तिच्या ओठावर आरक्ती आली होती. डोळ्यांतून अश्रूचा प्रवाह चांगला न निघाल्यामुळें तिचे डोळे लालभडक झाले होते.

ती पुनः ध्यान करण्यास बसली. अत्यंत कठीण आसनें घालण्यात पारंगत अशी ती निर्द्वंद्वाची सिद्धि साधावयाला बसली. दासी जेवणाचें विचारण्यासाठीं आली. परंतु माईसाहेबाना आसनस्थ आणि ध्यानस्थ पाहून काहीं एक शब्द न बोलता परत गेली.

रात्रीचा समय झाला—घटका जाऊं लागल्या. तरी देखिल स्थिरासनस्थ आणि तपश्चर्या साध्य करणाऱ्या मृणालच्या मनाला स्वस्थता प्राप्त झाली नाहीं किंवा तिला एकाग्रतेचा अनुभव मिळाला नाहीं

प्रथमत चित्त तरफड तरफड करीत होते, आता तें बुडावयाला लागल, निराधार होऊन तें खोल खोल जाऊं लागलें. बुडणाऱ्या माणसाप्रमाणें मरणाच्या ऐन घटकेला—शेवटच्या क्षणाला—बेशुद्ध होतांना डोक्यांत प्रियतमाचेच विचार चालावेत, त्याची मूर्ति डोळ्यासमोर उभी राहावी, चित्त तिकडेसच लागावें, त्याप्रमाणें तिच्या खोल खोल जाणाऱ्या चित्तचक्षुंसमोर एकच मुखकमल खेळत होतें. तिच्या चित्तात त्याच एका मुखकमलाविषयीं विचार चालले होते तिचें चित्त विचारांत विलीन झालें होतें. असें चित्तविदारक पृथ्वीवल्लभाचें एकच मुखकमल होते. वेळ कसा निघून गेला तो कळला देखिल नाहीं. तिच्या मेंदूच्या ठिकाणीं जडत्व आलें, ती बेशुद्ध झाली, निद्रेचा थोडथोडा

संचार होऊं लागला. आपणास स्वप्न पडत होतें कीं काय हें नक्की करण्याइतकी देखिल तिच्या ठिकाणीं शुद्धि राहिली नव्हती.

केवळ, तिला एकच मुखकमल दिसत होतें—त्याचीं अनेक रूपांतरें होत होतीं तरीपण तें जसेंच्या तसेंच राहत होतें. विशाळ नयनकमालातून आकर्षक रस गळत—झिरपत होता मधुर मुखकमळ निराळ्याच तऱ्हेच्या लोकोत्तर ऊर्मोनीनें नियंत्रण देत होतें. त्याच बरोबर एक प्रकारची चुणचुण लागून राही कीं हा कलंक केव्हा धुतला जाईल ?

परिस्थिति बदलत चालली—प्रसंग अकल्पित आणि नवीन नवीन आले तरी पण तें मुखकमल होतें तसेंच राहिलें. मृणालच्या ठिकाणीं त्या मूर्तीला डोळ्या-समोरून दूर करण्याची इच्छा करण्याइतकी देखिल शक्ति उरली नव्हती.

मनोराज्य विकास पावलें—मुखकमलाऐवजीं आता मूर्तिमंत संपूर्ण मुंज डोळ्यासमोर उभा राहिला. कारागृह दिसलें—त्याच्या अंधकारात हजार सूर्य-नारायणाच्या कांतीनें प्रकाशित होणारा अनुपम नरोत्तम पाहिला त्याचा जळणारा हात पाहिला—त्यातून निघणाऱ्या ज्वाला पाहून तिच्या रोमारोमात अग्नि व्यापला.

पसतीस वर्षेपर्यंत तिनें ब्रह्मचर्यव्रताचें सेवन केलें होतें. अनंगाचा अकल्पित अधिकार आजपावेतों केव्हांहि तिच्या ठिकाणीं चालला नव्हता यौवनावस्थेचा झरा फुटला नव्हता—फुटण्याच्या अगोदरच तो पृथ्वीच्या पोटात समाविष्ट झाला होता.

अनंगाशीं अपरिचित स्त्रीला तो अग्नि दुःसह झाला; पण त्या बरोबरच या अग्नीची ज्वाला आनंदमय वाटली. अर्ध्या निद्रेत मुंजानें केलेल्या चुंबनाचें चैतन्य तिच्या रोमरोमांत व्यापून गेलें. त्या चुंबनानें तिला चैतन्य मिळालें.

या भयंकर स्थितींतून मुक्त होण्यासाठीं, या पाप समाधींतून जागृत होण्या-साठीं तिनें पुष्कळ प्रयत्न केले, परंतु नागपाशानें बद्ध झालेल्या इसमाप्रमाणें ती निराधार बनली व तिचें चित्त इतकें दूरवर गेलें कीं त्या ठिकाणाहून तें परत आणणें तिलाच असाध्य झालें. चित्ताला ठिकाणावर आणण्याला कोणतें साधन उरलें नाहीं

तिनें एकदम मुंजाला पाहिलें—त्याच्या प्रत्यंगाच्या ठिकाणची मोहकता विस्तार पावत आहे हें पाहिलें, जणू तो तिच्या अंगावर धांवला, त्यानें तिला पकडलें, हातानें दाबून दाबून तिला तिंबलें–तिचा चुरा केला–ती स्वतः पडली!

ती घाबरून जागी झाली. सर्पदंश झाल्याप्रमाणें एकदम खडबडून उठली, उभी राहिली, विव्हल होऊन चोहोकडे पाहूं लागली. स्वतः या वेळीं कोठें आहो हें तिला समजलें नाहीं—आपल्या प्रत्येक शिरेंत कोणतें नृत्य चाललेलें आहे हें देखिल तिला कळलें नाहीं—अंतःकरण आशेनें का उचंबळत होतें तें पण तिला माहीत नव्हतें.

स्वतः भानावर आहों की नाहीं याची तिला खात्री पटेना, तिनें निराशेनें डोकें दाबलें, डोळे चोळले. मुंज कोठें होता ? ती स्वतः कोठें होती ? हें काय होत होतें ?

तिला परिस्थितीचें अजून पूर्ण ज्ञान झालें नव्हते. ती एखाद्या वेड्यासारखी पाहत राहिली. ती वेडीच बनली. तिच्या नाड्या तुटावयाला लागल्या; अंगाला भयंकर वेदना होऊं लागल्या, जणूं तेज आपणास सोडून जात आहेत असें तिला वाटलें.

तिनें आपला हात छातीवर ठेविला, छाती दाबली. तिचें हृदय नवीनच तऱ्हेनें उडत होते. त्याचे ठोके कांहीं नवीनच भाव उत्पन्न करीत होते. आपल्या कपाळावर तिनें हात फिरविला—डोक्यांत काहीं नवीन अकथनीय भावना उसळत होत्या.

एका क्षणांत ती पटकन खालीं बसली. तिला स्वतःच्या स्थितीचें भान झालें. हृदयकमल पुष्पाची पाकळीनपाकळी शरीराच्या प्रत्येक भागाचे ठिकाणीं आक्रंद करीत होती—त्यांना मुंज पाहिजे होता.

मगरूर—दिमाखदार—तपस्विनी वेडी झाली. तिला स्वतःच्या अधःपाताचें भान झालें.

युद्धासाठीं शस्त्रास्त्रें किंवा हत्यारें वगैरे नव्हतीं—उत्साह पण नव्हता. ती ओशाळवाणी होऊन पुष्पधन्व्याला शरण गेली. त्रिपुरारीच्या तिसऱ्या नयनानें भस्म होऊन राहिलेल्या, देवाचा निरंतर द्वेष करणाऱ्या मदनानें तिला जाळ-

ण्याला सुरवात केली. थोड्या वेळानें अग्नीच्या ज्वाला शमल्या, आणि शीतळ समीराच्या आल्हादकारक लहरींना देखिल विसर पाडतील अशी लहरी तिच्या हृदयांत वाहूं लागल्या. तिनें आपले डोळे मिटले हातपाय लांब करून ती पडल्या पडल्या त्या लहरींचा अनुभव घेऊं लागली

असल्या लहरीचा तिने स्वप्नात देखिल अनुभव घेतला नव्हता त्या लहरींनीं ती भ्याली नाहीं, त्या लहरीपासून तिला आश्चर्य वाटलें नाहीं—पण त्या लहरींपासून ती एक प्रकारचा विशिष्ट व अवर्णनीय आनंद अनुभवूं लागली त्या तिच्या अंगप्रत्यंगाच्या ठिकाणीं स्पर्श करीत राहून रोमरोमाच्या ठिकाणीं आनंदमय चैतन्याला जिवंत करू लागल्या तिची छाती अपरिचित पण आनंददायी अशा ठोक्याने धवधव करीत होती— उडत होती तिच्या हाताच्या नसा न कळणाऱ्या उत्साहानें, तरूला वेली वेटाळतात त्याप्रमाणे प्रियकराच्या शरीराला विळखा घालण्यासाठीं आलिंगन देण्यासाठीं तळपत होत्या.

तिच्या प्रत्येक धमनींतून अद्भूत आनंदाचा प्रभव वाहत होता. तिनें स्वतःचे हात डोळयावर ठेविले- धडधडणाऱ्या छातीवर जोराने दाबले. तिचे पाय एकमेकात अडकले, पायात आठी पडली.

मुंजाच्या मानसिक मूर्तीच्या पादस्पर्शानें या असाधारण लहरी येत होत्या व त्या तिनें येऊंहि दिल्या हळुहळु श्वास वाढला—मुखकमल लालबुंद झालें. मेंदूच्या ठिकाणीं गुर्मीचें नृत्य सुरू झालें तिला असें वाटलें कीं स्वत. मुंजच आपल्या जवळ येत आहे. तिनें एक निश्वास टाकला, सर्व प्रयत्नाचा त्याग करून ती सुखमय पराधीनतेच्या पाशात पडून राहिली.

तिला अर्धी झोंप लागते न लागते तोंच--तिनें तेजस्वी पृथ्वीवल्लभाला येतांना पाहिलें. तो आनंदाचा प्रसार करित उत्साहाला प्रेरीत आला. त्यानें तिला दृढ आलिंगन दिलें एक वेळ नाहीं पण हजारदा त्यानें तिचें चुंबन घेतलें. तरी पण ती तशीच सुखमय आणि निराधारीमध्यें पडून राहिली.

काहीं तरी झालें—हृदयात कालवाकालव झाली. ती वेडी झाली. तिची बुद्धि नष्ट झाली—तिला भ्रम झाला; ती सुखाच्या शिखरावर पोंहचली व तेथून पुन: खालीं पडली. डोळे उघडून ती बसली. तिचे हृदय मोठमोठ्यानें धडधड

करीत होतें. अवर्णनीय आनंदाच्या समाधीचा तिनें अनुभव घेतला ते आनंद-सुख तिला सापडलें व तिनें तें सांडलें.

ती उभी राहिली, तिनें तोंड धुतलें, डोळ्याला पाणी लावलें व खिडकीच्या बाहेर तोंड काढून थंडगार वारा आपल्या तोंडावरून वाहूं दिला.

गंगेसारखी कोठून कोठें पडलें याची तिला स्मृति झाली. वैराग्य स्वरूप तपोनिधि महादेवाच्या जटेतून पडून सध्या अधमतेच्या धुळींत ती लोळत होती.

ती कलंकित झाली होती संपूर्ण जीवनाच्या व्रताचा नियमाचा भंग झाला आता काय करावें ? भाऊ काय म्हणेल ? वहिनी काय म्हणतील ? पापी मुंज काय म्हणेल ? या कलंकांत स्थितींत कसं जिवंत राहतां येणार ? जीवनाच्या खुललेल्या नवीन पाकळीला गुप्त ठेवून, शक्य असल्यास सुकवून, चाललें आहे तसेंच जीवन व्यतीत करण्याशिवाय तिला गत्यंतर नव्हतें. आज रात्रीं ज्या आनंदाची चुणूक तिला दिसली, स्वप्नांत का होईना—जें दृश्य तिनें पाहिलें होतें तसा आनंद उघडपणें पुन अनुभवणें तिच्यासारख्या साम्राज्यविधात्रीला जवळ जवळ अशक्य होतें. तसा अनुभव घेणें म्हणजे स्वत ची मानखंडना करून घेऊन पराधीनता स्वीकारणें होतें. तो आनंद तिला अस्पर्श्यच होता



# प्रकरण २० वें.

## पादप्रक्षालन.

पहांटेपासून तैलप राजाच्या दरबारात धामधूम सुरू झाली होती सामंत, महासामंत वगैरेंची गर्दी उडाली होती

पादप्रक्षालन नांवाचें एक पाप-पुण्याचें कुंड होतें त्यातून निर्विघ्नपणें जे राजे निघून जात त्यांना त्यांचें राज्य सामन्त ह्मणून उपभोगण्याला परवानगी देण्यांत येत असे, व अभिमानाच्या तोऱ्यात जे कोणी त्यांतून जात नसत ते आपलें जीवन हत्तीच्या पायाखालीं चिरडून टाकले जावें अथवा आपले सबंध आयुष्य कारागृहांत राहावें अशी मागणी करीत स्वतः तैलपानें अनेक वेळा मुंज राजाचे पाय धुतले होते व त्यामुळे त्याला तेलंगणाच्या गादीचा प्रसाद मिळाला होता, पण आज धारेच्या सिंहासनासाठीं मुंजानें तैलपाचें पादप्रक्षालन करून याचना करावयाची होती

मुंज या शिक्षेचा क्वचितच स्वीकार करील असेंच सर्वांना वाटत होतं. तरी पण पकडलेल्या नरेशाचा देह पवित्र आणि अस्पर्श मानीत असल्यामुळे कारणाशिवाय त्याचा नाश करणें शक्य नव्हतें, ह्मणून तैलपानें विचार करून ही युक्ति शोधून काढली होती जर मुंजानें पादप्रक्षालन केलें तर त्याच्या कीर्तीला कायमचा कलंक लागून ती नाहींशी होत होती आणि तैलप पृथ्वीचा नाथ होणार होता व जर तो याप्रमाणें करणार नाहीं तर त्याला वाटेल ती शिक्षा करण्याचा—हत्तीच्या पायाला बांधून त्याचा जीव घेण्याचा देखिल--अधिकार उघड उघड तैलपाला मिळणार होता.

सर्व नगरात लोकांच्या ठिकाणीं एकच प्रश्न उपस्थित झाला होता. काय ? मुंज पादप्रक्षालन करील ? कित्येकांची अशी इच्छा होती कीं मुंजानें पादप्रक्षालन केलें तर तें बरें त्याचा जीव वाचेल व तैलपाच्या कीर्तीत वृद्धि होईल. कित्येक असें मानीत होते कीं मुंजानें पादप्रक्षालन न केलें तर बरें, कारण मग

तो कैदेंत राहील किंवा आपला जीव गमावील व असें झालें म्हणजे मग तैल-पाची कीर्ति वाढेल. त्याच्या रूपावर व गुणावर कित्येकजण मोहित झाले होते, त्यांची अशी इच्छा होती, कीं कोणत्याहि तऱ्हेनें मुंज वाचला म्हणजे झालें. पण ही आशा कोणी बाहेर स्पष्टपणें बोलून दाखवीत नव्हता

राज्य--सभेत येण्याला जेवढ्यांना अधिकार होता तितके सर्वजण आले होते. कोणालाहि असा अप्रतिम प्रसंग बघण्याचें सौख्य घालविण्याची इच्छा नव्हती. सूर्योदय होऊन थोडा वेळ होताक्षणीच दरबारात इतकी गर्दी झाली कीं तेथें पाय ठेवण्याला देखिल जागा उरली नाहीं

सर्वजण आल्या नंतर तैलपराज महासामन्ताला बरोबर घेऊन दरबारात आला. त्याचा कुमार अकलंकितचरित हा देखिल दाखल झाला तैलपाच्या सिंहासनाजवळ एक आत जाण्याचें दार होतें त्यांत आतल्या बाजूनें मृणालवती, जक्कला व लक्ष्मीदेवी ह्या येऊन बसल्या मृणालचें मुख रागीट पण फिक्कें पडलें होतें तिच्या डोळ्यांत भयंकर तेज चमकत होतें तिचा मुखमुद्रा पाहूनच लोकांना वाटलें की मुंजाची शभर वर्षे भरली

तैलपराजानें मिशांवर पिळ देऊन मोर्के वर चढविण्याला सुरुवात केली, व दोन सामन्तांना कैद्यास आणण्याचा हुकूम केला

थोड्या वेळा नंतर कैदी राजे आले त्या सर्वांच्या अघाडीला मुंज होता. त्याचे हात पाठीशीं बांधलेले होते

विजयसेनेंत तो जसा चालत होता तसाच येथेंहि आला विसकटलेले केश त्याच्या कांतीला वृद्धिंगत करीत होते. चमचम चमकणारा अभिमान त्याच्या मुखकमलाच्या गौरवाची अभिवृद्धि करीत होता त्याच्या डोक्याची ठेवण त्याची सत्ता स्वयंभु आहे असेंच शाबीत करीत होती जणू काय तो देवासारखा दर-बारात आला--राजसभा मात्र जंतूंची आहे अशी दिसावयाला लागली.

मृणालनें त्याला भर सभेत पाहिलें तोंच तिचे रोमांच उभे राहिले. आदल्या रात्रींच्या अनुभवाची तिला स्मृति झाली--नवयौवनेप्रमाणे तिच्या गालावर लाली आली, ती लज्जित झाली व आपल्या बदललेल्या परिस्थितीचें कोणाला भान होऊं नये म्हणून ती लपविण्याचा प्रयत्न करू लागली

दिवसाच्या प्रकाशात त्या नरेशाच्या मोहक शरीराच्या दिसणाऱ्या अपूर्व रेषा तिनें चोरासारख्या आपल्या हृदयांत साठविल्या, व आपल्या डोळ्यांसमोर त्या संजीवन केल्या.

मुंजाला आणून तैलपाच्या सिंहासना समोर उभें करण्यात आलें, त्याच्या मुखमंडळावर गर्वभरित हास्य विलसत होते व तो स्मितमुख त्याच स्थितींत बेपर्वाईनें उभा होता.

तैलपानें हुकूम करिताच बंदीजनांनीं तैलपाचीं स्तुतिस्तोत्रे गाइलीं. तीं संपल्यावर राजा महासामन्ताकडे वळला आणि ह्मणाला,—

" भिल्लमराज ! काल कवीजनाना सोडविलेंत त्याचें काय झाले ? "

" ते पाहा ते आहेत. " असे ह्मणून त्याने एकीकडे धनंजय बसला होता तिकडे व दुसरीकडे रसनिधि व त्याचे मित्र बसले होते तिकडे बोटाने दाखविलें

" त्याना मागा कीं काही ह्मणा उज्जनीच्या कवींनी मुंजाला खूप चढविलें होतें आता त्याला खालीं आणण्याऱ्या कामात ते सामील होतीलना ? "

भील्लम, राजाच्या या युक्तीनें, कुचंबला, पण भर सभेंत राजाच्या वचनाचा उपमर्द करणें शक्य नव्हतें, तेव्हा त्याने धनंजयाजवळ जाऊन राजाचा संदेश कळविला.

सर्व कवींच्या अगात कापरें भरलें. पुष्कळ रसनिधीकडे वळले, रसनिधि लागलीच धनंजयाला ह्मणाला. " महाराज ! आपण सरस्वतीचे लाडके आहात काही तरी ह्मणा " ! धनंजयानें नेत्रसंकेतानें होकार दिला. बसलेल्या सामन्ताच्या ओळींतून तो सिंहासनाजवळ आला.

धनंजय सिंहासनाजवळ येताक्षणींच मुंज दुसरीकडे पाहत होता त्याने आपले तोंड फिरविलें, धनंजयाकडे पाहिलें, व तो हसला.

" धनंजय ! अवन्तीचें नाव ठेव बरं " हंसत हंसत तो ह्मणाला. " जशी महाराजाची आज्ञा " खाली वाकून धनंजय ह्मणाला. तैलप ही गोष्ट ऐकून चिडला. त्याच्या कपाळावर आठ्या पडल्या. तुच्छतेने त्यानें विचारलें. " तुमचें नाव ? "

धनंजयानें उत्तर देण्यापूर्वीच मुंजराज मोठ्यान म्हणाला:-

" तैलप ! इतकें देखिल माहिती नाहीं ? ज्याची कविता ऐकून भगवती मयुरासनी आपला वीणा सोडून देते, ज्याच्या सुविख्यात नांवामुळे अज्ञानी सदोदित नरकसमान अंधकारांतच राहतात, अशा कवींचा कवि, अवन्तीच्या कवींमध्यें श्रेष्ठ असा हा धनंजय आहे " त्या वेळच्या कवींना शोभेल अशा तऱ्हेनें मुंज म्हणाला

" तुला मी विचारलें नव्हतें ? " रागानें तैलप म्हणाला

" मी कोठें म्हणतो कीं मला विचारलें होतें ? " शांत वृत्तीनें मुंज म्हणाला. " परंतु कोणाचीहि प्रशंसा त्याच्याच तोंडून वदवावी हें विनयशील पुरुषाच्या संमत झालेलें मी ऐकिलें नाहीं."

सभासदांच्या हृदयांत थरकांप झाला तैलप जी अल्पता अनुभवित होता, ती सर्वांना स्पष्ट दिसत होती, व यामुळे तैलपाच्या रागाचा पारा वर चढत होता हें देखिल उघड उघड दिसत होतें याचा परिणाम काय होणार याच्या अनिश्चिततेंतच सर्वजण मान उंच करून पाहात होते

" चालू द्या " तैलप धनंजयाला म्हणाला.

धनंजयानें प्रथमतः महाकालेश्वर महादेवाच्या प्रशंसेचा एक अनुष्टुप वृत्ताचा श्लोक म्हटला, व तदनंतर रामाच्या स्तुतीच्या श्लोकांना गाण्याची सुरुवात केली.

श्लोकरचना फारच सरस होती—त्यांत पृथ्वीनें ज्यांना आपला नाथ केलें आहे अशा राजराजेन्द्राची स्तुति होती. एकप्रकारें ते वर्णन तैल[illegible] लागू पडेल असें होतें व यानेंच मुंजाची देखिल प्रशंसा होऊन गेली असे दिसत होतें तैलप कांहीं थोडें समजला व रागाचा आवेश कमी करून तो म्हणाला. " शाबास ! कविराज यावें ! बसावें ! "

धनंजय वंदन करून स्वतःच्या स्थानी परत गेला.

मृणालवतीनें लक्षपूर्वक हे सर्व पाहिलें व ऐकिलें. ज्या छटेनें, ज्या आधिपत्यानें मुंज या राजसभेत शोभत होता ते पाहून तिला गर्व उत्पन्न झाला; व जसजसा तैलपाचा भ्रूभंग वाढत चालला, जशी जशी त्याच्या नेत्रांच्या ठिकाणीं क्रूरता दिसूं लागली तसतशी तिच्या हृदयांत न जाणों रागाच्या

आवेशात कदाचित् मुंजाला मारण्याचा तैलप हुकूम करील अशी भीति उत्पन्न झाली. या विचारामुळें तिचें हृदय कापू लागलें.

धनंजय बसल्यानंतर तैलपासमोर पाहून मुंज हसला व " कसे काय ? तैलपराज ' कवि कसा आहे ? " एकदम बेदरकारीने आणि तिरस्कारीनें मुंजानें प्रश्न केला. उत्तर देण्यासाठीं दात ओठ खाऊन तैलप गुरगुरत होता सुई पडली तरी तिचा आवाज ऐकू जाईल इतकी दरबारात शांति पसरली होती सर्वांच्या अंतःकरणात क्षोभ उत्पन्न झाला

" मुंज ! " खकारून तैलप म्हणाला त्याच्या तीक्ष्ण नेत्रात तरवारीच्या धारेचें तेज चमकत होते. " तुझ्या पापाचा घडा भरला—तुझ्या राजलक्ष्मीचा नाश झाला आहे तूं—"

" कोण म्हणतो ? " मुंजाने विचारले

" मी म्हणतो "

प्रत्युत्तरात मुंज मजेने हसला व मुका राहिला. ' अद्यापि जिवंत राहण्याचा आतां एकच मार्ग शिल्लक राहिला आहे—"

मुंज ज्या दरवाज्याजवळ मृणालवती बसली होती त्या दरवाजाकडे बेपर्वाईनें पाहत राहिला

" ज्या पायाच्या स्पर्शानें आज धरणी कांपत आहे ते धुऊन अपराधाची क्षमा माग. " त्या समयाच्या कृत्रिम भार्पेत तैलप म्हणाला

दोघा सैनिकानीं मुंजाच्या हातातील बेड्या काढल्या, व सुवर्णाच्या झारींत पाणी घेऊन एक सामंत पुढें येऊन उभा राहिला पाय धुऊन घेण्यासाठा उत्सुक बनलेल्या तैलपाने सिंहासनाखालीं आपला पाद ठेविला.

हात सुटता क्षणींच मुंजानें इकडेतिकडे आपल्या मर्जीप्रमाणें पाहिलें व गर्वानें वर पाहिलें.

झारी घेऊन तयार असलेला सामन्त म्हणाला —"मुंजराज ! चला महाराजाचे पाय धुवा. "

मुंजानें त्याच्याकडे आश्चर्यानें पाहिलें. " सामन्तराज ! ताडवानें त्रिभुवनाला डोलवणाऱ्या चंडीश्वर–भगवन्महाकालाचे प्रतापी चरण कोठे आहेत की त्याना धुवून हा पृथ्वी–वल्लभ पावन होईल ? "

उत्तराची मार्गप्रतिक्षा करीत मुंज उभा राहिला. झारी धरणाऱ्या बिचाऱ्या सामंताची जीभ टाळूला चिकटली. तैलपाच्या भिवया भयंकर रीतीनें संकुचित झाल्या महासामन्त भिल्लमाला वाटलें कीं यांतून काहीं तरी मार्ग काढला पाहिजे ह्मणून तो मधुरतेनें ह्मणाला —

" अवन्तीनाथ ! आहवमल्ल महाराजांचें पादप्रक्षालन करा. विजेत्याचाच हा पूर्वापारपासून चालत आलेला अधिकार आहे. "

मुंज तिरस्कारयुक्त हंसला. " ग्यूनराज ! पृथ्वीवल्लभाचे पाय धुवून धुवून ज्याच्या हाताचा ओलेपणा अजून सुकला नाहीं त्या तैलपाचे मी पाय धुवूं ? तुह्माला काहीं श्रम तर झाला नाहीं ना ? " त्याच्या शब्दांत व नेत्रांत पूर्ण तिरस्कार भरलेला होता

दरवाज्यांत बसल्या बसल्या, अजाण अशा उर्मीनीं जिचें हृदय भरत होतें अशी मृणालवती मुंजाकडे पाहत राहिली

तैलपाच्या क्रोधाला पार उरला नाही. त्याच्या डोळ्यांत अग्नि चमकू लागला, व तो ताडकन् उभा राहिला. " अभिमानी पापाचारी दुरात्मान, अजून तुझा गर्व उतरला नाही वाटत ! "

मोठा मनुष्य एखाद्या निराधार बालकाला ह्मणतो तशा प्रकारच्या तिरस्कारानें हंसून मुंज ह्मणाला —" असे फाका मारल्यानें पृथ्वीवल्लभ थोडेंच होता येतें ? "

" दुष्टा ! काय ह्मणतोस ? उभा रहा " तैलपानें रागानें आरोळी ठोकली. अर्धी सभा उभी राहिली

तैलपानें क्रोधावेषांत चोहींकडे पाहिलें त्याचे नेत्र विकाळ झाले. क्रोधामुळें त्याचें शरीर कांपूं लागलें

" सामन्तांनो ! काय पाहत आहां ? या पाप्याला पकडा आणि करवा याच्याकडून पादप्रक्षालन ! "

चारपाच सामन्त समोर आले व मुंजावर घसरले

आपलें प्रचंड शरीर फुगवून त्यांच्याकडे बेपर्वाईनें पाहत मुंज उभा राहिला. त्याचे नेत्र अनिमिष होते. त्याच्या मुखकमलावर गर्वाचें हास्य विलसत होतें. आपल्या कपाळावरील रेषांनींच तो सर्वांना दरडावीत होता.

मृणालेन हे सर्व पाहिलें—व या सर्वात मुंजाचें—व्यक्तिवैशिष्ट्य किती निराळे, अप्रतिम आणि दुर्धर्ष होतें तेंहि पाहिलें तिला देखिल गर्व झाला आणि मुंजाचा विजय पाहण्यासाठीं ती एकसारखी टक लावून बघत राहिली. तिचे देखिल ओठ मिटले जे तेज मुंजाच्या नेत्रात होते तें तिच्याहि नेत्रात चमकू लागलें- जे सामन्तजवळ आले होते ते एक वेळ तैलपाकडे तर पुन्हा मुंजाकडे असे आळीपाळीने पाहत उभे राहिले मुंजाजवळ जाण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती ताकत नव्हती

" धिक्कार ! तुह्माला लाज नाहीं वाटत ? " तैलप ओठ चावून ह्मणाला " असें पाहत उभे आहात ! अकलंकितचरित ! तुझ्यात देखिल पाणी नाहीं?"

राजकुमार आणि सामंत मुंजाचे हात धरण्याला आले भिल्लम आपल्या मनातील विकार दाबून ठेवून मुकाट्यानें तयार उभा राहिला

' या भिता कशाला ? " मुंज हसून ह्मणाला, व त्याला न धरण्याला येनाक्षणींच त्यानें सहजासहजीं त्याची पागापाग-करून टाकली

राजसभेंत कोलाहल माजला ! मानभंग झालेला तैलप दुसऱ्या सामंताना ह्मणाला " काय पाहता ? "

दुसरे आठदहा सामंत मुंजावर तुटून पडले व त्यांनीं त्याचा हात धरला ज्या हातावर मृणालनें डाग दिले होते त्या हातातून मास खालीं गळून पडलें. मृणालनें तें पाहिलें आणि निःश्वास टाकून, डोळे मिटून, दुसऱ्याच क्षणाला ती पण उभी राहिली.

मुंजाला पकडणें ही एक गोष्ट होती व त्याला नमवून-त्याच्याकडून जबरीनें पादप्रक्षालन करविणें ही दुसरी गोष्ट होती. पर्वताच्या शिखराप्रमाणे सर्वाहून उंच आणि मान न वांकविता तो थोडा वेळ उभा राहिला, सामंताचे त्याला धरण्याचे प्रयत्न निष्फळ होण्याच्या बेतात आले शेवटीं त्यानीं मुंजाला फरफर ओढण्याची सुरुवात केली.

मुंजाच्या ठिकाणी अद्भुत शक्ति होती, तो बळवान् होता; व त्यामुळेंच प्रथमतः त्यानें सहजपणें, हंसून सर्वांना खेळविलें; परंतु सामंतांची संख्या पुष्कळ असल्यामुळें शेवटपर्यंत तो टिकाव धरूं शकला नाहीं. तैलपाच्या मुखावर क्रूरतेनें भरलेले हास्य झळकूं लागलें. त्याच्या हांसण्यात क्रोधाचा आविर्भाव होता.

मुंजानें एकदम जोर कमी केला; तो सामंताच्या अंगावर पडला, त्या सरशींच या अचानक पडण्यानें त्याला जोरजोरानें ओढणारे सामन्त एकदम पडले व त्याचे हात सुटले. झारी घेऊन उभा राहिलेला सामंत मुंजाला ओढणाऱ्या सामंताची निश्चितपणे गंमत पाहत उभा होता मुंज त्याच्यावर घसरला आणि त्याने खालीं मान करून खाद्याने झारीला एक धक्का दिला त्या धक्यानें सामंताच्या हातातील झारी उडाली व जवळ असलेल्या तैलप राजाच्या अंगावर पडली व त्याच्या सर्व शरीरावर पाणीच पाणी झाले झारीतील पाण्याने त्याचे सर्व अंग भिजलें.

हें सर्व एका क्षणात झालें. मुजाला धरून ठेवणाऱ्या सामन्ताने या आश्चर्यामुळें मुंजाचा हात सोडला. तैलप आपल्या पडणाऱ्या राजमुकुटाला सावरीत होता व मुंज एकटाच निश्चितपणे उभ्या खदखद हसत होता !

मृणाल दाराच्या उमऱ्यात येऊन उभी राहिली !

तेलपाच दृश्य हास्यजनक होते त्याच्या गौरवाचा, अभिमानाचा आणि राजसत्तेचा भयकर अपमान झाल्यामुळे नाश होता, त्यानें आपले ओठ चावले. एक आरोळी ठोकली व म्यानातून आपली तरवार बाहेर काढली.

लागलीच शंभर तरवारी म्यानातून बाहेर पडल्या व मुजाच्या चारी बाजूला रक्त पिपासू तरावरींचीं छटा पसरली त्याच्यावर तरवारींचे जणूं काय छतच बाधलें आहे असें दिसलें त्या छायेखाली मुज बिनदिक्कत—कोणतीहि भीति न ठेवतां उभा होता. सर्व तरवारींच्या धारांना त्याच्या नेत्रांतील तेजाच्या तीक्ष्ण धारा प्रत्युत्तर देत होत्या.

"दुष्टा ! आतां पाहा ! मारा या हरामखोराला !" तैलपानें हुकूम केला.

तरवारींचा खणखणाट सुरू झाला—मुंज गर्वानें पाहूं लागला.

एकदम एका आवाजानें सर्व राजसभा दणाणून सोडली "हे काय करिता !"

क्रोधानें जाज्वल्य झालेल्या जगदंबेसारख्या दिसणाऱ्या मृणालवतीनें तैलपाजवळ उडी घेऊन वरील शब्द उच्चारले होते. तिच्या नेत्रांत निःसीम सत्ता चमकत होती; युद्धकालीन घंटेचा ठणठण नाद व्हावा व त्या घंटेच्या आवाजाने ज्याप्रमाणें सर्वांच्या वृत्ति एकदम एकत्र होऊन विवक्षित स्थळीं जाण्याला तयार व्हाव्या त्याप्रमाणें तिच्या आवाजानें सर्वांची स्थिति झाली.

तैलंगण ज्या आवाजानें कांपत होतें तो आवाज ऐकतां क्षणींच सामंतांच्या समशेरी नमल्या. तैलप स्वत. लज्जित झाला.

" काय करीत आहा " रागानें मृणाल म्हणाली. तिची छाती उसळत होती. " लाज वाटत नाहीं ? एका निःशस्त्र नरेशावर शस्त्र चालविण्याला तयार झाला ? सर्व तैलगणाला कलंकित करण्याला तयार झाला ! तैलपराज ! हें तुला शोभत नाहीं. तुझ्या धर्मराज्यांत असा--? "

सर्वजण स्तब्धपणे ऐकत राहिले ! मुंज आपल्या मिशातल्या मिशात हंसला " सर्वांनीं आपआपल्या घरीं जावें. सभा विसर्जन झाली आहे मुंजाच्या बाबतींत मागाहून योग्य विचार करण्यांत येईल. "

" भाऊ ! चला ! " असें म्हणून तिनें तैलपाकडे पाहिलें—

तैलपानें जरा रागानें मृणालकडे पाहिलें पण दोन पळांतच मृणालचें साम्राज्य कायम झालें, तैलप खालीं मान करून मृणालच्या बरोबर निघून गेला.

---



# प्रकरण २१ वें.



## बहीण आणि भाऊ.

“ ताई ! हें काय केलेंस ? ” आंत गेल्यावर तैलपानें विचारलें.

“ तुझ्या कीर्तीला लागणारा कलंक धुवून टाकला ” मृणाल म्हणाली.

“ या पाप्याला तर ठारच केलें पाहिजे ”

“ युद्धाशिवाय राजाचें शरीर सदाच अस्पर्श्य आहे ”

तैलप मुका राहिला.

“ त्यानें पादप्रक्षालन केलें नाहीं म्हणून त्याला दुसरी शिक्षा करणें आपल्या हातीं आहे. ”

“ सर्व जग मला हसेल. माझी छी थू करील. ”

“ नाही ' तुझ्या निष्कलंक राज्यनीतींची कीर्ति गातील. इतका अपमान झाला असून देखिल तू सत्याला सोडिलें नाहींस. सत्याची कास धरलीस याहून जास्त कोणत्या यशाची तूं आशा ठेवितोस ? '

तैलपानें डोकें हलविलें.

थोडा वेळ पावेतों कोणी बोललें नाहीं. तदनंतर तैलप म्हणाला—“ तर मग याचें आता काय करावयाचें ? ”

“ तूं सांगशील तसें ? ”

“ लांकडी पिंजऱ्यांत याला ठेवतां येत नाहीं. याचा जीव देखिल घेतां येत नाहीं. तेव्हां याचें करावयाचें तरी काय ? ”

सध्यां तर कारागृहांत आहेना ? मग पाहतां येईल. आपल्याला या बाबतींत उतावीळ कोठीप आहे ? ”

" मला तर कांहींच उमग पडत नाहीं " असें म्हणून पुनः डोकें हलवून तैलप चालावयाला लागला.

" उमग पडेल—आता नाहीं थोडया वेळानें पडेल. " असें म्हणून मृणालने आश्वासन दिलें.

राजा तेथून निघून गेला एकटी मृणाल विचार करीत उभी राहिली. तिचें अंतःकरण आनंदाने उचंबळले होतें तिनें मुंजाला मृत्यूच्या जबड्यातून ओढून काढलें होते—मृत्युमुखातून त्याला वाचविलें होते. तिच्या कल्पनाशक्तीचे बंद पुन तुटले व क्षणोक्षणीं मुंजाच्या स्वरूपानें जी मोहकता धारण केली होती ती पुन नेत्रासमोर आणण्याच्या प्रयत्नांत ती गुंग झाली. डोळे मिटून ह्या रसिक प्रयत्नात यश मिळाल्यावर ती जरा हसली व आपले हृदय आनंदानें भरून ती तेथून निघून गेली.

मानभंगित झालेला तैलप एकातात बराच वेळ पावेतो इकडेतिकडे येरझारा घालीत होता. त्याच्या गर्वाचें पाणी झालें होते त्याची स्थिति तिरस्काराला पुष्कळच पात्र झाली होती ही देखिल निर्विवाद गोष्ट होती सर्व तैलगणच काय परंतु सर्व दुनिया पादप्रक्षालनाला विसरणारी नव्हती व या पादप्रक्षालनात स्वतःची विदूषकाची भूमिका लोक ठरवितील यात देखिल संशय नाहीं असें त्याला वाटूं लागलें.

त्याला मृणालवती असे का करीत आहे हें कळले नाहीं. मुंजानें त्याचा असा अपमान करावा—आणि मृणालने मुंजाला वाचवावें ! त्याची आपल्या भगिनीच्या ठिकाणीं पूर्ण श्रद्धा होती. आपल्या भगिनीला देखिल मुंजाचा पूर्ण तिरस्कारा आहे हें त्याला माहित होतें. त्याने या बाबतीत बराच वेळ विचार केला तरी त्याला कांहीं कळलें नाहीं—हें कोडे त्याला उलगडलें नाही.



# प्रकरण २२ वें.

## विलासचें स्वास्थ्य.

काव्यसेवा आणि संगीत या दोन विषयात, पुरुष आणि स्त्री यांना प्रेमाची पर्वा नसली तर सहजीवन करू नये काव्य आणि संगीत यांचा सहचार विमानाची गरज भागवितो आणि सहचारी दोरीशिवाय तीं योमांत चढू शकतात; व एक दुसऱ्याच्या आधारानें उडताना जेथून सुटका होणार नाहीं अशा एकांतात जाऊन पडतात. विलास आणि रसनिधि ही गोष्ट विसरले होते.

रसाचा स्वाद चाखताना विलासची तृषा वाढत चालली, आणि रसनिधि पण संतत रसधाराचा पर्जन्य वर्षवून तिची तृषा शमविण्याचाच प्रयत्न करीत होता.

मालतीमाधवाच्या तुफानी प्रदेशातून त्यानीं म्लानवदनानें उत्तर रामचरित्राच्या हृदयद्रावक वातावरणात विहार केला; व तेथून ते शाकुन्तलाच्या सुवर्णमय, मोहभरित मधुरतेचा अनुभव घेत घेत वाहत गेली. कोठल्या कोठें या मनाला आवडणाऱ्या मुशाफरींत अजाण बाला वेडी झाली, व क्षणोक्षणीं खुलणाऱ्या रसिकतेनें काव्याच्या अनेकरंगी लाटांनीं तिचें अंतःकरण आनंदित झालें, तिला हर्ष झाला. तिचा आत्मादेखिल नवरंगी झाला. इतकेंच नाहीं पण एखाद्या प्रसंगीं तिच्या आणि रसनिधीच्या रंगाचें नकळत असाधारण मिश्रण होऊं लागलें.

पादप्रक्षालनाची राजसभा विखुरल्या नंतर सांयकाळीं मंदिरात बसल्या बसल्या रसनिधीनें विक्रमोवर्शीय नाटक पूर्ण केलें.

" आता काय ऐकविता ? "

रसनिधीनें दीन वदनानें—दयाशीलतेनें—बालेकडे पाहिलें. त्याच्या डोळ्यासमोर एक प्रकाश पडला; व त्यामुळें तो भांबावला.

" विलासवती ! आता पुरें, झालें हेंच फार झाले. मी काहीं या मानवलोकांत कायमचा राहणारा नाहीं. "

विस्मयतेनें दिग्मूढ होऊन विलासवती पाहत राहिली. " तुम्ही केव्हा जाणार आहात ? "

" तुमचे महाराज परवानगी देतील तर याच क्षणीं. "

विलासवतीने निश्वास टाकला " व परत—"

" परत ! " रसनिधीने ओठ दाबून म्हटले. " भोलानाथ शंकर आणील तेव्हा " त्याचे नेत्र चमकत होते.

विलासनें पुन निश्वास टाकला आणि ती हळूच "शिव ! शिव !" बडबडली

" भोलानाथाचे स्मरण करण्याचे माझे देखिल मनात आहे मी तुमच्या जीवनाला विनाकारण रसिकतेच्या मार्गावर चढविलें, मला त्याबद्दल आता पश्चात्ताप होत आहे." असे म्हणून अचानक आलेले अश्रु रसनिधीने पुसून टाकले

" तुम्ही का रडता ? "

" तुमच्यामुळे ! " रसनिधी हिंमत करून म्हणाला

"माझ्यामुळे ?" जरा गौरवाचा—अभिमानाचा—डौल करून बाला म्हणाली

" होय ! येथे तर सर्व जनावरेंच आहेत, तेव्हा त्यात तुमचे कसें होईल ? "

विलासचे ओठ कापू लागले रसनिधी उभा राहिला.

" माझे चालेल तर—"

विलासला नकळत एक हुदका आला " तर—"

" तुम्हाला अवन्तीला घेऊन जाईन—"

अश्रुभरित नयनांनी विलास पाहात राहिली तीन दिवसाच्या परिचयाने या पुरुषाला जणू ती पहिल्यापासूनच—फार दिवसाची—ओळखते आहे असा भास होत होता

विलासवती जमीनीकडे पाहत होती, रसनिधी प्रेमाश्रूंनी ओल्या—तिरस्कार झालेल्या—नेत्रांनीं—सजल नेत्रांनी—विलासकडे पाहत राहिला.

थोडा वेळ कोणी काहींच बोललें नाहीं.

" विलासवती ! ! "

" काय रे ! काय करितो आहे ?" एक कठोर आवाज मागाहून आला

दोघेहि वळले—कुमार अकलंकितचरित मंदिराच्या पायऱ्याखालीं यमराजासारखा भयंकर स्वरूपात उभा होता. त्यानें कांहीं ऐकलें नव्हते, परतु रसनिधीची स्नेहाद्रित मुखमुद्रा पाहूनच त्याचें चित्त भडकलें होते.

रसनिधीने जोरानें ओठ दाबले व आपले मन ताळ्यावर आणलें विलास बावरी झाली

रागीट मुद्रेनें आणि डोळे वटारून कुमार पाहू लागला. अनिमिष नेत्राने रसनिधीनेंहि त्याच्याकडे पाहिले

" तू काय करितोस ? " अकलंकितचरिताने विचारलें

" मी काय करीत आहे ते तर तुह्मी पाहातच आहांत." जरा कठिणतेनेच रसनिधीनेहि उत्तर दिलें.

" मी नव्हते सागितले का हे मदिर तुम्यासाठी नाही ह्मणून ? "

" मी मंदिरात आलो नव्हता महासामन्ताच्या कुमारिकेला भेटण्याला आलो होतो. "

कुमारानें आपलें ओठ चावले. " कशासाठीं ? "

" माझ्या प्राणरक्षकाची ती कन्या आहे माझ्या मनाने घेतलं की मी तिला भेटलेच पाहिजे "

कुमाराला काय उत्तर द्यावें ते सुचलें नाहीं

" विलासवतीच्या तपश्चर्येत भग पाडावयाचा नाहीं चाल, तू तुझ्या रस्तानें जा. "

रसनिधी हसला. " आपले तीर्थरूप परवानगी देतील तर या क्षणींच. "

" चाल, आता चालता हो. "

" कुमारिकेला घेऊन जाईन. लक्ष्मीदेवी त्यांना बोलावित आहेत. "

" ठीक आहे ! अमळशानें ती येईल. जा. "

रसनिधीनें पाहिले कीं आता जास्त वेळ येथे उभे राहणें अनुचित आहे, इतकेंच नाहीं पण कदाचित येथे उभें राहिल्याने गोष्टी विकोपाला जातील. तो हळूहळू पायऱ्या उतरला आणि तेथून जाऊ लागला

अकलंकितचरित पायऱ्या चढूं लागला.

" विलासवती ! अशा माणसाबरोबर गोष्टी करणें चागले नाही ! "

विलास खालीं बघून ह्मणाली —“ मनुष्य तर बरा आहे. ”

अकलंकितचरिताच्या नेत्रात निष्ठुरतेचें तेज चमकावयाला लागलें. “ अशा माणसाबरोबर गोष्टी करणें हे तैलंगणाच्या भावी साम्राज्ञीला शोभत नाहीं. ”

विलासनें वर पाहिले. तिला एकदम रडे कोसळलें बराच वेळ तिचे हुदके तिला आवरता आले नाहींत हुंदके येतच होते. कुमार स्थिर नेत्राने पाहत राहिला विलासच्या नयनातील अश्रुप्रवाह कमी झाल्यानंतर तिरस्कारानें अकलंकितचरित ह्मणाला “ हेचं का तुझें वैराग्य आणि तुझें स्वास्थ्य ? ”

विलास कांहींच बोलली नाहीं. कुमार शान्तीनें तेथून निघून गेला.

*　　*　　*　　*

तो गेला, तेव्हा रसनिधीची मार्गप्रतिक्षा करीत, तृषार्त चातकीप्रमाणें विलास चोहोकडे पाहूं लागली.



# प्रकरण २३ वें.

## तपाची महासिद्धि.

मृणाल सायंकाळची मार्गप्रतिक्षा करीत होती

या दुनियेत कित्येक दुःखें सहन करिता येतात, कित्येक दुःसह अशीच असतात—परंतु प्रियतमाची वाट बघतांना होणाऱ्या वेदनासारख्या असह्य वेदना दुसऱ्या कोणत्याच नसतात त्यातूनहि अशा तऱ्हेच्या वेदना मृणालला या वयांत पहिल्यादाच अनुभविण्याला मिळाल्या.

स्वतःच्या मनाप्रमाणे करण्याची, दुसऱ्याकडून स्वतःला रुचेल तें करून घेण्याची तिला संवय होती, पण या वेळी ती निराधार होती तरी पण या निराधारींत, या वेदनांत समाविष्ट असलेलें अनुपम सुख तिनें केव्हांहि अनुभवलेलें नव्हतें. नववधूच्या उत्साहानें ती सायंकाळाची वाट बघत होती.

सूर्यास्त झाल्याबरोबर ती उठली आणि धडधडणाऱ्या छातीला आश्वासन देत ती मुंजाला भेटावयाला निघाली

कारागृहावरील पाहरा करणाऱ्या सैनिकांनी या राज्यविधात्रींला येतांना पाहिलें, व ते दूर झाले. पादप्रक्षालनाच्या वेळी झालेल्या अनर्थाची बातमी सर्व मान्यखेटभर पसरली होती, व या तुफानाचा अंत कसा होणार याविषयीं सर्वांना जिज्ञासा लागून राहिली होती. सैनिक देखील नवीन नवीन गप्पा मारीत होते, व हा प्रसंग कांहीं अनन्य आहे असें त्यांना वाटत होतें या कारणामुळें या वेळीं मृणालचें मुंजाच्या भेटीला येणें याविषयीं त्यांना कांहींच आश्चर्य वाटलें नाहीं.

मृणालनें पाहिलें कीं लोकलज्जेसाठीं, आपण येथें या वेळीं कशासाठीं आलों आहोंत, त्याचें कांहीं तरी कारण सांगितलें पाहिजे. तिनें तेथें उभा असलेल्या नायकाला विचारलें —

"केदारदत्त! तो पापी कसा काय आहे!"

"आहे तसाच आहे निश्चिंतपणें निजला आहे"

" केवढा निर्लज्ज ! या पाप्या अ काहीं बोध केला पाहिजे. तैलंगणाच्या कीर्तीची वृद्धि वाढेल व हा नमते घेईल तरच या अनर्थाचा अंत होईल " असे म्हणून ती आत गेली. तिच्या आवाजात नेहमी जो करारीपणा असे तो या वेळी नव्हता ती स्वत या वेळीं असत्य भाषण करीत होती, व हें तिच्या लक्षात येताच तिच्या अंगाला कप सुटला.

परंतु त्या असत्य भाषणाचा परिणाम फार वेळ टिकला नाही. कारण ती भुयारात दाखल होते न होते तोंच मुंजाचा आवाज तिच्या कानीं पडला. " कां ? आलात वाटते ! म्या नव्हतं सागितलें ? "

मृणालचें मन ताळ्यावर नव्हते ती तर वेडी झाली होती मुंजाच्या आवाजातील मोहिनीनें ती सर्व कांहीं विसरली. काल रात्रीं अनुभवलेल्या आनदानें पुन तिचे चित्त व्यापले तिला क्षोभ झाला. ती शरमली—लज्जित झाली—कापरे हात एकमेकात घालून ती उभी राहिली पायानीं पुढे चालण्याल नाकारलें.

" मृणालवती ! " हसतमुखाने मुज म्हणाला " आता असें लाजून कसे चालणार ? आता यातून तुमची सुटका होणे नाहीं. "

मृणालनें बराच प्रयत्न केला, पण तिच्या तोंडातून शब्द निघाला नाहीं तिचे विचार स्थिर झाले नाहींत व तिच्या ठिकाणी स्वस्थता आली नाही तिला स्वत:विषयीं तिरस्कार उत्पन्न झाला. स्वस्थता आणण्यासाठीं केलेले सर्व प्रयत्न निष्फळ ठरले

नयनतेजाच्या सुदर्शन चक्रानें मृणालचे रक्षण करणारा धरणीधरासारखा पृथ्वी-वल्लभ मृणालजवळ येऊन उभा राहिला.

" घाबरता कशाला ! आता पावेतो तुह्मी प्रेत होता—आता सजीवन झाला आहात " असे ह्मणून त्यानें आपले बाहुद्वय पसरले.

मृणाल क्षोभात होती तरी ती चमकली, व मागे हटली. मुजानें आपले हात लांबविले, आणि जोरानें हो ना करणाऱ्या मृणालला आपल्या बहुपाशात बद्ध केलें—तिला घट्ट आलिंगिलें—तिला कवटाळलें.

मृणाल—वृद्धावस्थेच्या टोकाशीं उभी असलेली उग्र तापसी—तरफड करीत होती, घाबरली होती, पळून जाण्याच्या इच्छेने कापत होती, पण आनंदाच्या परमावधीचा अनुभव घेत ती उभी होती मुंजानें खालीं लवून तिचें चुंबन घेतलें.

आनंदाच्या मदात, पश्चात्तापाच्या क्रोधात व क्षोभाच्या अनिश्चिततेंत तिनें जोरानें सुटून जाण्याचा प्रयत्न केला जणूं काय ती लहान बालक आहे अशा तऱ्हेनें हंसत हसत मुंजानें तिला आपल्या बाहुपाशात पकडून कवटाळिलें--तिला आलिंगन दिले.

" हे काय करिता ? " शेवटीं मृणाल ह्मणाली.

" मृणाल ! आनंद अनुभवित आहे आणि त्याचा तुला अनुभव आणून देत आहे " असे ह्मणून तो हसला.

मृणालवतीने जोराने तरफड केली म्हणून मुंजाने तिला सोडले ती उडी मारून दूर उभी राहिली

" तुम्ही मला कलंकित करीत आहात, मला भ्रष्ट करीत आहात, माझ्या तपावर पाणी फिरवीत आहात " एकावर एक श्वास घेतघेत अर्ध्या आत, अर्ध्या तोंडाबाहेर अशा शब्दाने मृणाल म्हणाली.

" मृणालवती ! पुनः ढोंगाची सुरुवात केली वाटते कलंक पाप्याच्या ठिकाणी असतो, भ्रष्ट, अशुद्ध असतो तो होतो, निर्बल असेल त्याच्या तपावर पाणी फिरते. आनंद समाधीचा अनुभव घेत असताना कधींच कोणी कलंकित होत नाहीं किंवा भ्रष्ट होत नाही ही तर तपाची महासिद्धि आहे आनंदाची अरुचि याचे नाव रोग, आता तुम्ही रोगापासून मुक्त झालात--आज पावेतो मुक्त झाला नव्हता, बोला ! असें सुख आज पावेतो अनुभविले होते ? "

" तुम्ही कसें जाणिले ? "

मुंज हसला

" रोगापासून जो मुक्त झाला आहे तो ताबडतोब निरोगी मनुष्याची परीक्षा करितो मृणालवती ! क्षणभंगुर जीवनात आनंदाच्या अनुभवाशिवाय दुसऱ्या कोणत्याच गोष्टीला समय नाहीं. या जीवनात आनंदाचा अनुभव हेच महत्कार्य आहे. मला तुम्ही पाहिलें, माझी तुम्ही परीक्षा केलीत तेव्हा तुम्हाला हे कळलें."

" मुंजराज ! तुम्ही अद्भुत आहात " जरा हसून मृणाल म्हणाली

" नाहीं. मी अद्भुत नाहीं पण अनुभवी मात्र आहे, आणि तुम्हाला अनुभव करविण्यासाठींच विधीने मला येथे पाठविलें आहे. नाही तर माझ्या सारख्याला हा कारागृहवास कशासाठीं ? " असें म्हणून मुंजाने पुनः हात लांब केलें आणि त्याने मृणालला आपल्याकडे ओढली.

हळूंहळू मृणाल ओढली गेली आणि पूर्ववत पृथ्वीवल्लभाच्या विशाळ वक्षस्थलांत लपून राहिली.

मृणालनें कलकाचा समज, क्षोभ आणि पश्चताप हे सर्व दूर केले. अनेक वर्षांतच्या दबलेल्या उर्मी तिने वाढू दिल्या.

मुंज होता तसाच स्वस्थ होता सिप्रातरंगात अवन्तीच्या मदभरित सुंदरींशीं ज्या रसानें तो गोष्टी करीत असे त्याच रसानें या वृद्ध आणि विद्रूप तापसीबरोबर तो गोष्टी करीत होता

दुरून चौघडा वाजल्याचा आवाज कानीं आला. त्याच क्षणो बाहेर कोणाच्या पावलाची चाहूल आली, तेव्हा मृणालला काळ आणि स्थळ यांचें भान झालें

" पृथ्वीवल्लभ ! आता मला गेलें पाहिजे. "

" कशासाठीं ? "

" माझ्या दासींना कळलें तर काय बरें होईल ? आणि तैलपराज--"

" खुशाल कळूं दे, आपण थोडाच गुन्हा करीत आहों ? "

मृणालने हसता हंसता ओठ चावले आणि ह्मणाली -"तुमच्या नीचपणाला सीमा नाहीं. "

" कशी ? "

" तुह्माला कशाचीच परवा नाहीं. "

" कशासाठीं मीं कोणाची परवा ठेऊं ? जो सेवक असेल त्याला परवा; अधम असेल त्याला परवा, आपणास कशासाठीं परवा असणार ? सिंह आणि सिंहीण याना लाजलेले कधीं कोणी पाहिलें आहे ? "

" तुह्मी खरोखरच पृथ्वीवल्लभ आहात. "

" आणि तेंच तर तुह्माला व तुमच्या भावाला मी कधींपासूनच सांगत आहे. "

" मीं तुह्माला पकडून आणिले आणि शेवटीं मीच पकडलें गेलें. "

" हें मला माहीत होतें. "

बाहेरून दार उघडण्याचा कोणी प्रयत्न केला.

मृणालनें उडी मारून मागें सरून विचारलें:--

" कोण ? "

केदारदत्त दार उघडून आत आला " माईसाहेब ! मल्लराजसाहेब आपणाला बोलावीत आहेत "

कृत्रीम गांभीर्याने मृणाल ह्मणाली –" सांग !, की आले ह्मणून मुंज ! मी सांगितलेलें ध्यानात ठेव. "

" तुमच्यासाठीं तर अजून पुष्कळ शिल्लक आहे जमल्यास पुन भेटू. ' लुच्चाईने हंसत हसत मुंज ह्मणाला

मृणालच्या प्रेमार्द्रित नेत्र कमलातून मोहक कटाक्षबाण निघाले. समोर उभा असलेल्या, युद्धाच्या महारथीने ते शांतचित्तानें हसत हसत झेलले.

खालीं दृष्टी देत, रसधारांनी तिंब होऊन आनंदसागरात पोहणाऱ्या हृदयाच्या स्थितीत तलंगणची राज्यविधात्री तेथून निघाली



# प्रकरण २४ वें.

## भोज.

मुंज प्रणयी जनाच्या उत्साहपूर्ण नेमाने मुंज मृणालकडे पाहात राहिला. ती गेल्यानंतर तो जरा हंसला, एका बाजूला वळला आणि गाढ झोप यावी म्हणून एका कोपऱ्यात जाऊन आडवा झाला थोडयाच वेळानंतर त्याच्या सेवेत निरंतर हजर असणाऱ्या निद्रादेवीनें त्याच्यावर प्रसन्न होऊन अनुग्रह केला.

काही वेळानंतर त्या भुयारात दुरून कांहीं आवाज ऐकू येऊ लागला, जमीनींत कोणी खोदीत असल्याचा तो आवाज होता आवाज हळुहळु जवळ जवळ येत चालला.

मुजानें हळच डोळे उघडून कानोसा घेतला तो निजला होता त्या जागेखालील दगड कोणी पाडीत आहे असें त्याला अर्ध्या घटकेत दिसलें.

मुज तथून दूर झाला आणि अंधारातच स्वतःशीच हसावयास लागला. त्याचे ओठ तिरस्काराने घट्ट झाले. त्याला असे वाटलें कीं चोरून लपून त्याचा खून करावा म्हणून तैलपानें या मार्गानें मारेकऱ्याना पाठविलें

" गरीब बिचारा तैलप ! बिचाऱ्याला अन्य कोणताहि मार्ग सूचला नाहीं." असें म्हणून तो पलीकडच्या कोपऱ्यात जाऊन चित्ताला ठिकाणावर आणून शांतीनें उभा राहिला.

थोडयाच अवकाशात दगड हालू लागला. दुसऱ्या क्षणीं तो उचलला गेला आणि एक मानवी डोकें वर आलें.

' महाराज ! "

" कोण आहे ? " मुंजानें शांतीनें विचारलें.

" आपला मी—भोज ! " असे म्हणून येणाऱ्या इसमाने चकमक घासून काकडा पेटविला.

" कोण भोज ! आणि तू येथें ? "

रसनिधि नांवानें संबोधलेला पुरुष ह्मणजेच भोज भुईवर काकडा ठेवून उडी मारीत भुयारामधून भोज बाहेर मुंजाजवळ आला, आणि मुंजाला कडकडून भेटला.

" बाळ ! येथे तू कोठून व कसा आलास ? " मुंजानें पृच्छा केली.

रसनिधीने ( भोजाने ) मुंजाच्या प्रश्नाला उत्तर देण्यापूर्वीच भुयारांतून धनंजय आणि दुसरे दोन तीन कवि पटकन बाहेर आले.

" ओहोहो ! कसे काय आहे ? धनंजय ! हलायुध ! अग्निमित्र ! " असे ह्मणत मुंज त्यानाहि कडकडून भेटला.

हलायुधाने जमीनीवर पडलेला काकडा उचलून वर धरला.

" कविराजानो ! हे काय ? हें साहस कशासाठीं ? "

" महाराज ! आपणाला वाचविण्यासाठीं " भोज ह्मणाला.

मुंज हसला, " पण तू आज सकाळी या कविवरामध्यें कोठून आलास ? "

" महाराज लष्कर पांगलें-अर्धे इकडे झालें, अर्धे तिकडे झालें-त्यांत विभाग पडले लोक सैरावैरा पळू लागले, आपणाला पकडण्यात आलें; हें मला कळताच वश पालटून लोकाच्या जमावात मी येथे आलो. "

" आणि मला वाचविण्याचा मार्ग शोधून काढला ! " मुंज ह्मणाला," एवढे साहस काय ह्मणून केलें. "

" महाराज ! काय ह्मणून कशाला विचारता ? आपणाशिवाय आह्मी राहू शकू ? "

" वेड्या ! तर मग तू राज्य केव्हा करणार ? "

" महाराज ! मला राज्यलक्ष्मीची तृष्णा नाहीं ! "

" तुज मारावयास मारेकरी पाठविले तेव्हां तर तूं दुसरेंच ह्मणत होतास" हेतुपुरःसर हंसून मुंज म्हणाला "त्वा काय म्हटले होतें त्याची मला अजून आठवण आहे—

"नकेनापि समंगता वसुमती मन्ये त्वया यास्यति[1]"

"आणि म्हणूनच मला पृथ्वीला अनाथ करावयाचें नाही. चला महाराज" असें म्हणून भोजाने भुयार दाखविले

"पण मान्यखेटाच्या बाहेर कसें घेऊन जाल"

"त्याचीहि तजवीज करून ठेविली आहे. अर्ध्या प्रहराच्या आत आपण अवंतीचा मार्ग आक्रमण करू चला महाराज आता विलंब कामाचा नाही"

"ही तसदी कशासाठीं घेतली ?"

"महाराज ! गोष्टी करण्याची ही वेळ नाही"

"का बरे नाही ?" शांततेने मुंज म्हणाला "असा आनंद दुसऱ्याला थोडकाच मिळणार होता ?"

"पण कोणी आले तर आपण सर्व पकडले जाऊ ?"

"पण तुला हें तरी कसे सांगता येईल की येथून जात असताना आपण कोणी पडणार नाही ? कविराज ! मला तुम्ही कसे वाचविणार ?"

"प्रभो !" धनंजय कचरत कचरत म्हणाला--"येथून शहराबाहेर निघणारे असे एक भुयार मला मिळाले आहे"

"भुयार मिळाले आणि इतक्यानेच सुटका होत असली तर मग आणखी काय पाहिजे तुम्ही देखिल अशा भ्रमात पडलात ? अमात्य रुद्रादित्य यांची वाणी विसरला ? त्यानीं काय म्हटलें होतें ?--पृथ्वीवल्लभ संबंध आयुष्यात एकच वेळा गोदावरी ओलांडील--दुसऱ्यादा नाहीं मी एक वेळा गोदावरीचे पात्र ओलांडून आलो आहे" स्वास्थ्यानें पृथ्वीवल्लभ म्हणाला.

"महाराज !" भोज अधीरतेनें म्हणाला. "भगवान भास्कराचार्यांची भविष्यवाणी देखिल जर खरी होत नाही ! तर रुद्रादित्याच्या भविष्यवाणीवर भरंवसा ठेवून आपण येथे राहणे उचित आहे काय ?"

---

१ भोजाला मारून टाकण्यासाठी मुंजानें जेव्हा मारेकरी पाठविले होते तेव्हा रागाच्या आवेशात त्याने म्हटलें होते कीं --कोणत्याहि राजाबरोबर जी पृथ्वी गेली नाहीं ती हे मुंज ! आतां तुझ्या बरोबर येईल."

मुंज हसला " भोज ! भोज ! तुझा उतावळा स्वभाव अजून कायम आहेना ? मला आज येणें शक्य नाहीं "

चौघेहीजण स्तब्ध होऊन मुंजाकडे पाहूं लागले.

" महाराज ! उद्याच्या दिवस उजाडण्यापूर्वी काय होईल हे आपणाला कळणें शक्य आहे काय ? "

" काय होईल ? होय, तें मला माहीत आहे सूर्याचा उदय होईल आणि तारे अस्ताला जाईल " मुंज बेपर्वाईनें म्हणाला.

" पण, महाराज ! आज चलण्याला आपली काय हरकत आहे ? "

" मला अभिसारिकेचा आदरसत्कार करावयाचा आहे. तिच्याबरोबर माझें आज वाग्दान व्हावयाचें आहे. "

" आं ! " धनंजय आणि भोज चकित होऊन म्हणाले

" कां ? घाबरलात वाटतें ? कामबाणाला हें कारागृह नडत असेल नव्हे ! कविराज ! ज्या ठिकाणीं विश्वव्यापी परब्रम्ह दखिल जाऊं शकणार नाहीं अशा ठिकाणीं दखिल हे कामबाण माणसाला त्रास देऊं शकतात हें आपण विसरला वाटतें ? "

भोज कुचंबला व आपले ओठ चावूं लागला धनंजय पृथ्वीवल्लभाच्या बेफिकीरीला पाहून आश्चर्यानें थक्क झाला.

" महाराज ! " त्यानें हंसून विचारलें. " या कारागृहात आपणाला असें प्रेमपात्र तरी कोणतें मिळालें ? "

" तलगणाची महातपस्विनी-तैलपाची भगिनी ! "

" काय म्हणता ? " धनंजय आश्चर्यानें म्हणाला

भोजाच्या अंगात कापरें भरलें, हलायुध व अग्निमित्र हे स्वप्न आहे की काय आहे याचा विचार करूं लागले.

" खरी गोष्ट आहे. ती बिचारी विरहाग्नीनें जाळून खाक होत आहे. "

" महाराज ! " भोजाला न राहवल्यामुळे तो म्हणाला " या वेळेस तरी मेहेरबानी करा. निदान आमच्यावर नसली तरी अवंतीवर तरी मेहेरबानी करा "

भोजाची चर्या बघून मुंज हसला ' बाळा ! आपल्याला प्राणसुद्धा देता येईल पण अभिसारिकेला दिलेलें वचन कधींतरी मोडता येणे शक्य होईल काय ? तूं अजून बच्चा आहेस ? "

ते चौघेजणहि एक मेकाकडे पाहूं लागले. ते मुंजाला चांगल्या तऱ्हेनें ओळखित होते त्याना माहित होते की मुंज निश्चल होता

" तर मग उदईक केव्हा ? "

" मध्यरात्रीला, "

" महाराज ! एका दिवसाच्या अवधींत काहींच्या काहीं झालें तर ? " भोजाने शेवटचा प्रयत्न करून पाहिला

" होऊ दे. त्यात काय आहे ! "

भोज थकला याचे काय उत्तर द्यावे तें त्याला सुचलें नाहीं त्याने एक निश्वास सोडिला

" बरें तर ! जिवंत राहिलों तर उद्या मध्यरात्रीला. "

" मी आणि मृणाल, दोघानाहि धरून जाण्याची तयारी करून ठेवा. "

ही शान्ति ते सहन करू शकले नाहींत एक शब्द देखिल न उच्चारता ते चौघेहि परत भुयारात उतरले

भुयाराच्या तोंडावर दगड बसवून त्या जागेवर पृथ्वीवल्लभ निजला. थोड्याच वेळाने तो निद्रावश झाला

भुयारातून भोज आणि कविजन विचारात कुचंबत बाहेर पडले

" कविराज ! " भोज म्हणाला " महाराज म्हणजे मनुष्य की देव ! "

" महाराज देव आहेत. "

"मीं तर रागाच्या आवेशात म्हणालो होतों की पृथ्वी आपल्याबरोबर येईल, पण मृणाल आपल्याबरोबर खाचित येईल असेंच महाराज गृहित धरून बसले आहेत "

" हीच तर महाराजाची खुबी आहे. " असें म्हणून थकलेला धनंजय जमीनीवर बसला.

---

# प्रकरण २५ वें.



## मुंज.

युवावस्थेत प्रणय निस्वार्थी आणि शुद्ध असतो असें वय झाल्यावर तोच क्षमाशील आणि सूज्ञ असतो ह्मातारपण त्याच्यासाठीं मुळींच नाहीं, आणि अशा वृद्धावस्थेत जर प्रणय अतिथी आला तर या वेळीं त्याच्या ठिकाणीं वरील चार गुणापैकीं एकहि नसतो

प्रणय हा दबलेल्या मनोवृत्तीचें अस्वाभाविक तुफान असें असतो किंवा अत्यंत विषयी स्वभावाच्या लालसेचा तो परिणाम असतो मृणालवतीचा प्रणय यातल्याच एका प्रकाराचा होता. तिला एकाच वस्तूची परवा होती व ती म्हणजे आपल्या तुफानी अंत करणाला संतोषित करण्याची. तिच्या ठिकाणीं सुकोमल, अनुभवशून्य बालिकेची कल्पनाशक्ति आणि अज्ञानता नव्हती, व त्यामुळे तशी बाला जशी आपल्या प्रणयीजनाची पूजा करित, त्याच्या मूर्तीची मानसिक अध्यान आराधना करित, त्याच्या आचार विचाराच्या मनना-मध्येंच तल्लीन होऊन राहते तसें काही मृणालवतीला होत नव्हते विषय-तृप्तीनें समंजस झालली, सुखभोगी आणि शान्ति सेवन करणारी स्त्री जशी स्नेहान प्रणयीजनाला पाहते, त्याच्या सेवेत आनंद मानते तसे देखिल काहींच मृणालला होत नव्हते

मृणालच्या ठिकाणीं बारा वर्षाच्या नववधूचे अज्ञान असून सत्रा वर्षाच्या रसिकेचा असंतोष होता—प्रौढा नारीच्या ठिकाणीं असणाऱ्या मस्तीपेक्षाहि जास्त मस्ती होती—वृद्धेची कल्पनाहीन, अनुभवी व स्वार्थी बुद्धि होती—ब्रह्मचारिणीचे शरीरबळ होते—व उग्र तपस्विनीची कार्यसाधकता होती देवपदभ्रष्ट एखादी दुर्गा मदमस्त जनावराचें स्वरूप घेऊन केव्हाहि ज्याचा अनुभव घेतला नाहीं अशी आपली लालसा तृप्त करण्यासाठी जणू या भूवर अवतरली आहे असेंच वाटत होते.

ती आनंदात होती. हवेत उडत होती. तिच्या चतुर बुद्धीच्या ठिकाणी निर्णय झालेला होता मुंज जन्मभर कैदी राहणार तिचा इच्छा झाली की तैलप मुंजाला राजकैद्याच्या योग्यतेनुरूप कारागृहवासाची तजवीज करील. " तेव्हा माझ्या प्रेमाच्या आड कोण येऊ शकेल ? "

तिनें आपल्या मनोवृत्तींना " प्रेम " शब्दाची संज्ञा दिलेली होती, व हे तिचे " प्रेम " देखिल तिच्या स्वभावाला साजेसेंच होते जसें महत्वाकांक्षा साध्य करण्यासाठी तिनें पृथ्वीवल्लभाला जिंकलें होते तसेंच लालसा संतुष्ट करण्यासाठी तिनें मुंजाला अंकित करण्याचा प्रयत्न चालविला होता. अवन्तीनाथाच्या प्रतापानें तिच्याठिकाणीं एक इच्छा उद्भवली होती—दुसरी त्याच्या अप्रतिम सौंदर्यामुळे उत्पन्न झाली होती. व या दोन्ही इच्छा त्या प्रतापी नरशार्दूला कैदेंत ठेवल्यानेंच पूर्ण होतील असें तिला वाटलें.

ती आत्मस्तोत्राचे गानात मग्न झाल्याने आपल्या आणि मुंजाच्या प्रणय प्रकरणात मुख्य पात्र—विजेता—कोण हे ती विसरली तिला वाटत होते कीं आपण विजेती

रात्र झाली व ती उठली आणि परत कारागृहात जाऊन मुंजाचे मुख अवलोकन करण्याचे तिच्या मनाने घेतले. ती तेथून निघाली आणि कारागृहात गेली

तिला येताना पाहून रखवालदाराच्या मनात बिचाऱ्या कैद्याविषयीं दया उत्पन्न झाली त्याला असें वाटलें कीं ही भयंकर राज्यविधात्री इतक वेळ मुंजाकडे येते याचा परिणाम खास असा होणार कीं बिचाऱ्या कैद्याला वाईट तऱ्हेनें मृत्यु येणार, त्याचे हाल हाल होणार. मृणालचा स्वभाव आणि तिची राजनीति अशी क्रूर मानिली जात होती कीं ती कोणाला भेटण्याला आली म्हणजे त्या तिच्या भेटींत देखिल क्रूरतेशिवाय दुसरा कोणता मुद्दा असेल अशी कल्पना देखिल शक्य नव्हती.

मृणालला पाहताच उगवणाऱ्या सूर्याच्या किरणाप्रमाणें मुंजाच्या नेत्रांतून किरण बाहेर पडले. जणूं थोड्या गोष्टी झाल्या, नेत्र एकमेकांसमोर नृत्य करूं लागले, व मुंजानें गोष्ट काढली. " बरें झालें, आपण आलांत ? " असें म्हणून मुंजानें प्रेमानें मृणालच्या खांद्यावर हात ठेविला.

" का बरें ? "

"मी विचार करीत होतो की असे चोरटे जीवन किती दिवस निभावणार ?"

" दुसरा मार्ग तरी कोणता ? काहीं काळाने एखादा मार्ग सुचेल. "

" आपण आता काही बालक आहोंत कीं असा वेळ फुकट जाऊ द्यावा ?" असे म्हणून मुंज हसला, " तुमचे केस पाढरे झाले व माझीहि पन्नाशी होत आली '

" काय म्हणता ? मला तर असे वाटत होते कीं—"

" की मी फार लहान आहे, नाही ? "

" होय. कारण आपला एकहि केस पाढरा झालेला नाहीं, तसेंच आपल्या कपाळावर एकहि सुरकती पडलेली नाहीं. तुम्ही तर खरोखर अद्‌भुत आहात."

" जसें मन तितकी उमर " मुंज म्हणाला. " तुम्हाला येथे राहून सुख मिळणार नाहीं "

" कारण ? "

" मी सर्व देशाचा दुश्मन आहे तुमचा भाऊ माझा शत्रु आहे तुम्हाला सर्वजण तपस्विनी म्हणून समजतात व या ठिकाणी तुम्हाला राजमातेची पदवी आहे आपली चोरटीं कृत्यें उघडकीस आल्यास येथील लोक तुम्हाला व मला जिवत नाहींत सोडणार "

" येथे मला विचारणारा कोण आहे ?"

" तुम्ही तपस्विनी नाही ही गोष्ट बाहेर फुटली कीं आटोपलें मग तुम्हाला विचारावयाचे काय घेऊन बसलात, तुम्हाला लोक खाऊन टाकतील. "

मृणाल गप्प राहिली. मुंजाने प्रेमाने आपला हात तिच्या खांद्यावर ठेविला आणि उत्तराची तो वाट पाहूं लागला

". तर मग याला मार्ग कोणता. ? "

" एक तर हा कीं तुम्ही माझ्या विषयींचा विचार सोडून द्यावा व पुनः आपलें अवडंबर सुरू करावे. "

मृणाल मदभरित नेत्रानें मुंजासमोर पाहत राहिली. ती स्पष्टपणानें उत्तर देत होती सुचविलेला मार्ग पत्करावा हें घडणें शक्यच नव्हते.

" हें घडणे शक्य नसले तर तैलपाच्या गादीवर तुम्ही बसा " जणू काय ही एक क्षुल्लक गोष्ट आहे अशा तऱ्हेने मुंज म्हणाला

' सध्या देखिल तसेंच आहेना ? "

" कोण म्हणतो ? सिंहासनाच्याजवळ उभे राहणें आणि त्यावर आरुढ होणें यात जमीनअस्मानचे अंतर आहे "

" ते कसं शक्य आहे ?" मुंजाच्या बोलण्याचा काय रोख आहे ते न समजता मृणालनें विचारले

" तैलपाला मारून टाका " शांत वृत्तीनें पृथ्वीवल्लभ म्हणाला.

मृणाल चमकली मागें सरली " हें कसं बनेल ? "

" फारच सुलभ आहे. मला रात्री त्याच्याजवळ घेऊन जा दोन पळात तो स्वधामाला जाईल " मधुर आवाजानं मुंज म्हणाला

" पण ' तैलप माझा भाऊना ? मी तर लहानपणापासून त्याचें पुत्राप्रमाणें लालनपालन केले. त्याला कसें मारावें ? "

" तर्‍हा तिसरा एक मार्ग आहे तो या सर्वांहून कठिण आहे. "

" कोणता ? "

" तुम्ही मजबरोबर चला. तुम्हाला घेऊन जाऊन मी अवन्तीला तुमची साम्राज्ञी म्हणून स्थापना करीन "

मृणाल चमकली मुंजाच्या भयंकर व अशक्य गोष्टीनें तिला दिग्मूढ बनविले.

" मग काय विचार आहे ? "

हंसून मुंजानें तिचें चुंबन घेतले व हळूच मृणालची पांढऱ्या झालेल्या केसांची एक लट वर केली.

" महाकालेश्वर भगवानाच्या छायेंत पृथ्वीचें महाप्रतापी सिंहासन आहे त्यावर आता पावेतो मी एकटा होतों; पण आता आपण दोघे बसूं शकू. "

" पण मी--तैलपाची भगिनी--"

" होय. तैलगणाच्या सिंहासनापेक्षां एकच सिंहासन जास्त प्रतापी आहे; आणि ते अवंतीचें तैलपाची भगिनी तेथेच जास्त शोभेल. "

' पण--"

" तर मग चौथा मार्ग असेंच्या असेंच येथे राहणें हा आहे त्यांत मला कांहीं नाहीं. पण लोक तुम्हाला काय म्हणताल ? तुम्ही पूर्ण तपस्विनी राहिला नाहीं आणि अभंग आनंद पण तुम्ही लुटला नाहीं परिटाच्या कुत्र्यासारखी तुमची स्थिती होईल त्याचा कुत्रा म्हणजे: नसतो घरचा किंवा घाटावरचा" असें म्हणून जरा बफिकिरीने मुंज थोडा पुढे सरला

मृणाल पाहत राहिली. तिला तेजस्वी पुरुषाशिवाय जिवंत राहणें अशक्य वाटू लागलें. हळुहळु तिनें त्याच्या मुखमंडळावरची एकून एक रेषा नजरेखालीं घातली या पुरुषाला आपलासा करण्यासाठी केलं तेवढे थोडेंच असें तिला झालें.

" कसा काय विचार चालला आहे ? " मृणालच्या खांद्यावर हात ठेवून तिला जवळ ओढून थोडया वेळानें मुंजानें विचारलें.

मृणालला एकदम उमाळा आला तिनं मुंजाचे दोन्ही हात धरले

" पृथ्वीवल्लभ ! तुम्ही मला वेडी करून टाकलें आहे. बोला मी काय करूं ? माझ्या भावाला माझ्यानें नाहीं मारवणार, पण अवंतीला आपण जाऊं. " उमाळ्यानें तिची छाती भरून आली.

" आज रात्री ? "

" आज रात्री! " चकित होऊन मृणालनें विचारलें " पण तें कशा तऱ्हेनें ? "

" बरोबर मध्यरात्रीच्या सुमाराला येथे यावें. म्हणजे येथून जाण्याला मार्ग मिळेल. "

" पण तो कसा ? "

" जर कामदेवाला मार्ग पाहिजे तर कारागृह त्याला थोडेंच नडणार आहे ? " असें म्हणून मुंजानें पुन्हा तिचें चुंबन घेतलें. मृणालला आपल्या छातीशीं धरिलें, थोडया वेळानें मृणाल अलग झाली.

" पण अवंतीमध्यें आपली पट्टराणी असेल ? "

मुंज खदखदा हसला " माझ्या हृदयांत बसेल ती पट्टराणी. "

मृणालने पुन: मुंजाला आलिंगन दिलें.

" तर मग आज रात्रीं जरूर ! " मुंज म्हणाला.

" जिथे पृथ्वीवल्लभाची आज्ञा तिथे नाहीं कोणाला तरी म्हणता येईल ? " असें म्हणून मृणाल तेथून निघाली.

---

# प्रकरण २६ वें.

## लक्ष्मीदेवीचा निरोप.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं रसनिधीनें लक्ष्मीदेवीला शोधून काढलें. ती मूर्तिमंत असंतोषाच्या मूर्तीप्रमाणें एकीकडे रसनिधीच्या कारस्थानाचा परिपोष करण्यात तर दुसरीकडे महासामंताच्या मनात असतोषाच्या जलाल विषाचा प्रसार करण्यात गुगली होती.

रसनिधी आला तेव्हा लक्ष्मीदेवी त्याच्याजवळ आल्या

" रसनिधी ! अजून तूं एथेच ? '

" आज रात्रीं ! " चोहीकड नजर टाकून कोणी नाहीं असें पाहून रसनिधि म्हणाला.

' काल, काय मूहूर्त नव्हते ? " जरा तिरस्कारानें लक्ष्मीदेवीने विचारलें."

" त्यानी नाहीं म्हटलें "

" मोणी—पृथ्वा—"

" होय "

" का बरें ! " चकित होऊन महासामंताच्या पत्नीने पृच्छा केली.

रसनिधि जरा हसला " त्याना कारागृहात बसल्या बसल्या कामबाण लागत आहेत. "

" हूं ! "

" कोणाला सागूं नका"—रसनिधी म्हणाला " तुमच्या मृणालवती महाराजावर मोहित झाल्या आहत, महाराजाना पाहून त्याना वेड लागलें आहे."

अंधःकारातून एकदम उजेडांत आल्याबरोबर ज्याप्रमाणें मनुष्य डोळे उघडतो व फिरवितो त्याप्रमाणें लक्ष्मीदेवीनें पहिल्यानें आपले डोळे उघडले, मिटले व पूर्ण समज पडल्यानंतर ती एकदम खदखदा हसली बराच वेळ पावेतों ती आपलें हंसे आवरू शकली नाहीं.

" तूं काय ह्मणतोस ? " शेवटी हसता हसता आलेले डोळयातील पाणी पुसत तिनें विचारलें

" सत्य गोष्ट आहे आज त्या देखिल बरोबर येणार आहेत "

" चला फार उत्तम झालें बरें ! तू देखील विलासला तुझ्या बरोबर घेऊन जाणार आहेस ना ? " लक्ष्मीदेवी जरा हसून ह्मणाली.

रसनिधी जरा चपापला. " आपण—सर्व—जाणतच—आहात. "

" होय. पण तू आमच्या जवळून गोष्ट चोरून ठेवल्यानें ती मला कळणार नाही असें का तुला वाटलें ? "

" बरें ! आपण परवानगी देताना ? "

" न देऊन काय करू ? येथे ती कुजत राहण्यापेक्षा तेथें गेलेली काय वाईट"

" पण तेथे गेल्याने तिला तेलगणाची गादी नाहीं मिळणार—"

" लुच्चा कुठला ! तू मला फसवू पाहतोस नाही ? तेलगणाची नाहीं तर अवंतीची काहीं हरकत नाहीं समजलास ! "

"देवी ! क्षमा करा." रसनिधी—भोज—ह्मणाला " काका आहेत, तेव्हा परमेश्वराला माहीत मी गादीवर कधीं बसेन पण इतकें मात्र खचित कीं विलास माझी हृदयस्वामिनी—सम्राज्ञी—खचित होऊन बसणार "

"मला देखिल इतकेंच हवे आहे. बाळ ये हो. तुला माझा आशिर्वाद आहे "

" विजयीभव "

" बरें ! पण विलासला हे आताच कळवू नकोस--नाहीं तर ती कदाचित तिच्या बापाला किंवा दुसऱ्या कोणाला तरी कळवील "



# प्रकरण २७ वें.

## मृणालनें मार्ग काढला.

मृणालवती अस्थिर मनानं विचार करीत होती. पण तिचा कोणताच एक निश्चय होईना मुंजानें बळजबरीने तिचा होकार मिळविला होता. आज रात्री अवन्तीला जाण्याचं तिने वचन दिलं होतं मुंजाच्या मोहक नेत्रांच्या आवाक्या बाहेर येताच आपण दिलेलं वचन तिला रुचेनासं झालं तिचा मान, तिचा शौर्य, कितेक वर्षांपूर्वीपासून बाळगलेली मत्‍ राकांक्षेचे किल्ले, आता पावेतो स्वत्व मिळविण्यासाठी केलेले दीर्घ प्रयत्न या सर्वांचा त्या वचनानें समूळ नाश होत होता

ती वृद्ध होती. तिच्या ठिकाणी शहाणपणा होता. तिला कळून चुकले की मुंज आपल्याला निमिषार्धांत खेळवू शकेल इतका तो वस्ताद आहे मुंजाबरोबर त्याच्या राज्यात ती गेली म्हणजे निराधार झाली यात तर काहीच संशय नव्हता

या निराधारपणाच्या भयंकर अनुभवाचें दृश्य डोळ्यापुढे उभें राहताच तिला कळमळून आलें—ती कांपावयाला लागली. तिच्या डोळ्यां समोर अंधारी आली जी अशी तपस्वी—अशी राज्यधुरंधरा—अशी सर्व पृथ्वीला कांपविणारी महामाया पण तिची एका पळात अशी स्थिती ! असा निराधारपणा !

पण मुंजाचा मोहदेखिल तसाच भयंकर होता त्याच्या वाचून एकटें राहण्याची तिची हिंमत नव्हती त्याच्या विरहानें दोन दिवसांत, निर्माण झालेल्या रससृष्टीचा विनाश होईल याची देखिल तिला खात्री होती ती मुंजासाठीच जन्मली होती आता पावेतो मुंजासाठीच निर्जिव जीवनाच्या शुष्क अरण्यांत ती भटकत होती. आता मुंजाला आपल्या हातातून कसें जाऊं द्यावें ? आपल्याच हाताने या नवीन रससृष्टीला आग कशी लावावी ?

मुंज निश्चल होता, मृणाल आली नाही तरी तो जाणार च, व ती कायमची एकटी होणार तेव्हा मग जिवंत राहण्यात तरी काय उपयोग ? बरें, मग

सत्ता असली तरी देखिल त्या सत्तेची काय किमत ? सत्तेला करावयाचे तरी काय ? बरें, मग महत्त्वाकांक्षा परिपूर्ण न झाली तरी त्यात काय आहे ? ही स्थिति, निराधारपणापेक्षाहि तिला जास्त वाईट आणि दुस्तर वाटली.

तव्हा सत्ता आणि महत्त्वाकांक्षा यावर तिलांजलि का देऊं नये ? त्यात असे कोणते सुख आणि शान्ति भरली आहे ? एकटेपणापेक्षा निराधारी काय वाईट?

ती निश्चयावर येऊं लागली—अवन्तीला जाण्यातच दुःख कमी होतें. तिच्या मनाच्या अनिश्चित स्थितीचा अंत येत चालला.

तिच्या मनात एक विचार आला आणि तिचें अंतःकरण वज्राच्या पंजात अडकलें. मुंज तरुण होता, सुंदर होता व रसिक होता, स्त्रियांना वश करण्याच्या विद्येत तो प्रवीण होता तरी त्याच्या गोष्टीवरून देखिल त्यानें अनेक स्त्रियांच्या अंतःकरणाला रिझविलें आणि रंजविलें असेल असे वाटत नव्हते. तो सौंदर्याचा भक्षक होता ती स्वतः वृद्ध, विद्रूप, निरस, रसशास्त्राविषयीं अज्ञात, आणि ललितकलाची कट्टी दुष्मान होती. स्वतःचा आणि मुंजाचा संबंध किती दिवस टिकेल ? हा विचार अत्यंत भयंकर, त्रासदायक आणि हृदयभेदक होता कोणत्या सूत्रानें हा संबंध बांधला होता—जोडलेला होता ? नव्हतें सौंदर्याचें आकर्षण, नव्हती रसजीवनसहकार करण्याची शक्ति किंवा नव्हता बालपणचा प्रणय फक्त या दोहोंमध्यें कच्च्या सुताची दोरी होती स्वतः मुंजाच्या कीर्तीवर आणि सौंदर्यावर ती मोहित झाली होती, त्याच्या प्रभावशाली आणि सत्ताधारी स्वभावावर तिचा मोह जडला होता हा तिचा मोह किती वेळ टिकणार ? कसा टिकणार? अवन्तीला जाताच स्वतःच्या प्रभावाची पूर्णाहुती होईल व स्वतःची सत्ता संपूर्ण नाहीशी होईल. सध्याच तिचा प्रभाव आणि तिची सत्ता पृथ्वी—वल्लभाच्या पायाच्या तळव्याखाली लोटांगण घेत होती तेव्हा अवन्तीला गेल्यावर मग—मग काय ?

एक संशय मत्सरपणाच्या स्वरूपाचं दिग्दर्शन करीत होता. मुंजानें केवळ क्षणिक सुखासाठी तिला वश केलें होतें याप्रमाणें अनेकांबरोबर तो वर्तन करीत असला पाहिजे. तेव्हां तो कारागृहामधून सुटताक्षणीच नवयौवनभरित मोहक संसारात त्याच्या इच्छेनुरूप एकादी रसिक सुंदरी त्याला नाही का सापडणार ? असें झाल्यावर मग कसें ?

आपण मान्यखेटात असलो-अवन्तीला गेलो-तरी पृथ्वीवल्लभ आपल्या हातचा जाणार. तेव्हा आपण कोठे जावे ? या स्थितीची कल्पना करण्याची देखिल तिच्यात शक्ति राहिली नव्हती

दोन्ही हातात मस्तक ठेवून ती विचारमालेचे मणके फिरवूं लागली. या सर्वांचे सार इतकेच निघाले की मुंजाला मान्यखेटातच ठेवावे हे निराकरण सर्व तऱ्हेनें चांगले होतें स्वत. सत्ताधारी राहून मुंजहि हातात राहील आणि आनंदाचा परमावधीचा अनुभव घेण्याला सुलभ पडेल जसजसा ती जास्त विचार करू लागली तसतसे हे निराकरण तिला जास्त रुचकर वाटू लागले, पण या विचाराला मुंजानें हमण्याबाहेर नेलें होते म्हणून तिने हा विचार बाजूला ठेविला होता

आता मुंजाला येथें कसे ठेवावे ? त्याला जाऊन भेटून यावे ? तिने बराच वेळ विचार केला—व मग ती निश्चयावर आली.

एका सेवकाला तिने हाक मारली आणि कुमार अकलंकितचरिताला तिनें बोलावून आणविले

" कुमार ! "

" माई, काय आज्ञा आहे ? "

" बाळ ! तुझ्या शौर्याला शोभेल असे एक काम तुझ्यावर सोपवावयाचे आहे. "

" कोणते ? "

" मला एका गुप्त कारस्थानाची बातमी मिळाली आहे "

" कशाविषयीं ? "

" मुंजाला आज रात्री कारागृहातून घेऊन जाण्याविषयीची ! "

" आ ! " असे म्हणून कुमार एक पाऊल मागे सरला " कोणी सांगितलें ? "

" तुझें आणि तुझ्या पित्याचें रक्षण करताना अशी कोणती गोष्ट आहे कीं तिची बातमी मला मिळत नाहीं ? " मृणाल म्हणाली " आज रात्री बारा वाजता मुंजाला घेऊन जाण्यासाठीं मनुष्ये येणार आहेत "

" कोठून ? "

" भुयारातून त्या लोकाचे कारस्थान फोडावयाचें आहे व मुजाला येथून जाऊ द्यावयाचे नाही त्याला कारागृहातच ठेवावयाचे. "

" जशी आज्ञा "

" पण मी तुलाच का बोलाविले याचे कारण तुला कळले का ? "

" नाही "

" तुझ्या पित्याला बोलावून मी ही हकीकत त्याला सागितली असती, परतु निर्मल बुद्धीचा त्याग करून त्याने द्वेषबुद्धीचा स्वीकार केलेला आहे मुजाला मारावे अशी त्याची इच्छा आहे राजाचे शरीर कायमचें अस्पर्श्य मानलेले आहे आणि त्यातच राजनीति आहे. तू ही नीति पाळशील म्हणूनच तुझ्याकडे ही कामगिरी मी सोपवीत आहे. "

" जशी आज्ञा "

" मुजाच्या एका केसालाहि धक्का लागता उपयोगी नाही—नाहीतर तुझी अकलंकित कीर्ति कलंकित होईल, हे तुझ्या ध्यानात असू दे जा दक्षता ठेवून काम कर. "

" माई ! त्यात आपल्याला सागायला नको —सर्व आपल्या अनुज्ञेप्रमाणेच करीन " असे म्हणून आला होता त्याच स्वस्थतेनें कुमार परत गेला



# प्रकरण २८ वें.



## मध्यरात्र.

कारागृहातून चोरून पळून जाण्याच्या वेळी आपल्याबरोबर मृणालला घेऊन जावयाचें या गोष्टीने मुजाच्या मनात कोणत्याहि प्रकारची अस्वस्थता शिरली नाहीं, तो नेहमींप्रमाणें हात उशाखालीं ठेवून-निश्चित निद्रेत पडला होता.

त्यानें हळूच डोळे उघडले दरबारातील मध्यरात्रीचा नगारा नुकताच सुरू झाला असें त्याला ऐकू आलें

नगारा बद झाला व लागलींच भुयाराच्या बाहेरच्या दाराजवळ पावलांचा दडदड असा आवाज झाला, ह्मणून तो कानोसा घेऊ लागला. थोडयाच वेळात सर्व शात झालें, त्याला मृणाल अजून का आली नाही याचें आश्चर्य वाटलें

लागलीच भुयारातून ठोक्याचा आवाज ऐकू आला कोणी पांच वेळ ठोके दिले; मुज उभा राहिला व आपल्या टाचेनें त्यानेंहि तितकेच वेळां ठोके दिले. हळूच खालून भुयाराच्या तोंडावरील दगड उचलला गेला व भोजाने आपलें डोकें वर काढिलें.

" काका ! तयारी आहेना ? " त्यानें हळूच विचारलें.

" नाही ! अजून मृणालवती आल्या नाहीत—" हे शब्द तोंडा बाहेर पडतात न पडतात तोंच भुयाराचे बाहेरील दार एकदम उघडलें गलें आणि मशाल घेऊन दहा पधरा इसम एकदम आत आल.

मुज फिरला, त्यानें दरवाजाकडे तोंड केलें या माणसांना पाहून तो मनात सर्व काहीं समजला.

" जय महाकाल " असें भुयाराकडे पाठ करून तो ह्मणाला, व पायानें भोजाला जाण्याची सूचना दिली. लागलाच भुयाराच्या तोंडावरील दगः भोजानें ओढला व तो चालता झाला

पण जाता जाता तो दगडहि खालीं जात आहे तिकडे अकलंकितचरिताचें लक्ष गेल्यामुळें त्यानें तिकडे उडी घातली एका नायकानें खालीं लवून त्या दगडाचे झाकण खाली पडताना अडकाविलें. दगड खाली पडला पण नायकाचें बोट मध्ये सापडल्यामुळे भुयाराच्या तोंडावर तो दगड सारखा बसला नाहीं पाच सात सैनिक तो दगड उचलू लागले

वीस पचवीस सैनिक मुंजाच्या अंगावर धावले, व मोठया शिकस्तीनें त्यानीं त्याला बांधिलें.

इतक्यात दगड उचलला गेला.

" नायक, त्या हरामखोराचा पाठलाग करा. व त्याच्यात व तुमच्यात पडलेले अंतर कापून काढून शक्य असलें तर त्याना जिवंत पकडा, नाहीं तर त्यांना यमसदनाचा मार्ग दाखवा " कुमार ह्मणाला.

" पाप्या " मुंजाकडे वळून कुमार ह्मणाला, " तुझी हातचलाखी तू येथें सुद्धा दाखवितोस नाही ? सैनिक ! जा, मी नवीन तयार करविलेल्या तळघरात याला घेऊन जा. याला तुह्मी जाऊं दिलें तर त्याबद्दल तुमचा प्राण जाईल हें लक्षात ठेवा, तेव्हा नीट काळजीनें घेऊन जा—तुमच्या हातून हा निसटणार नाहीं अशा कडक बंदोबस्तानें याला घेऊन जा." असें ह्मणून एका मशालजीला पुढे करून अकलंकितचरित भुयारात उतरला.

सैनिकांनीं पृथ्वीवल्लभाला मजबूत बांधिले आणि त्याला तेथून घेऊन जाऊन दुसऱ्या एका तळघरात त्याला ठेविले

अर्धा झोपेंत, अर्धा जागा अशा स्थितींत तैलप राजाला कांहीं अपरिचित कोलाहल ऐकू आला बिछान्यावरून उठून लागलीच त्याने खिडकी उघडली. ज्या बाजूला मुंजाला कैद करून ठेविलें होते त्या बाजूला मशालींचा उजेड व सैनिकाचा आवाज ऐकूं आला. त्यानें आपले कान त्या बाजूला लावले. कान व कपाळ चोळलें. कदाचित् मुंज आपल्या हातातून निसटून जाईल अशी त्याला भीती उत्पन्न होताच त्यांनें आपली तरवार हातीं घेतली व तो खाली उतरला. खालीं येताच त्याला सर्व माहिती मिळाली व मुंजाला अटकेंत ठेवलेल्या नवीन भुयारापाशी तो आला.

तो एका बाजूनें तेथें आला, व समोरून मृणालवती येताना त्याला दिसली. या वेळीं त्याच्या क्रोधाला सीमा उरली नाही. पादप्रक्षालनाच्या वेळीं झालेला अपमान, आणि मृणालने केलेला मुंजाचा बचाव या गोष्टींचा त्याला विसर पडला नव्हता. शिवाय आताशा स्वतःच्या वहिणीच्या ठिकाणीं त्याचा अविश्वास उत्पन्न झाला होता. इतकेंच नव्हे तर तिच्याविषयीं त्याच्या मनात द्वेष आणि तिरस्कार याचें बी पेरलें गेलें होतें, व त्या बियापासून द्वेषाचा वृक्षदेखिल उगवला होता गुप्तहेराकडून त्याला असें देखिल कळलें होते कीं मृणाल बऱ्याच वेळ मुंजाच्या भेटीला जात असते

या वेळीं त्याच्या मनाने घेतले की, मुंजाला पळून जाण्याच्या कृत्यात आपल्याला अंधारात ठेवून मृणालच मदत करीत आहे—व या वेळी त्याच कारणासाठी ती येथें आली असावी तैलपाच्या क्रोधाला सीमा राहिली नाही. मातृतुल्य वहिणीच्याठायी असलेला त्याचा पूज्य भाव आणि प्रेम हीं नाहीशी झाली.

" तुम्ही येथे का आलात ? " त्यानें मृणाळला कठोरतेनें विचारलें. अशा अपरिचित तऱ्हेनें तैलपानें तिला संबोधलेले पाहून तिने देखिल रागानेंच वर पाहिलें. पण तिचें मन तिला खात होते शिवाय या वेळी तैलपाला येथें पाहून तिचें छातीचे ठोके बंद झाले, ती देहभान विसरली

" मुंजाला भेटण्यासाठी ! " फारच कष्टानें ती म्हणाली.

" या वेळी त्याला नाहीं भेटता यावयाचें घरी जावे. कैद्याना भेटण्याची ही वेळ नाहीं. "

मृणालचा मानभंग झाला या अपमानानें तिच्या नेत्रात विष चढले.

" भाऊ काय म्हटलेंस ? " तिने गौरवानें विचारलें

" जें म्हटलें तें बरोबर आहे "

मृणालनें पाहिलें कीं तैलप या वेळी क्रोधामुळें शुद्धीवर नाहीं, व सैनिका समक्ष त्याशीं तोंड दिलें तर त्यात आपली शोभा राहणार नाही.

" बरें ! मला सकाळीं भेट ! "

" बरें " तिरस्कारानें तैलप म्हणाला

मृणाल तेथून निघून गेली. तिला स्वतःच्या कृत्याचा पश्चात्ताप होऊं लागला.

ती गेल्यानंतर तैलपानें भुयाराचें दार उघडविले. मशालजीला घेऊन तो आंत गेला. हात पाय बाधलेला मुंज जमीनीवर पडला होता.

" कसें काय मुंज ! काय चाललें आहे ?" तिरस्काराने, व रागारागाने तैलपाने विचारलें.

" आनंद चालला आहे " हसून मुंजानें उत्तर दिलें.

" अवन्तीला पळून जावयाचें होतें नाहीं ?"

" त्यात मला तुझ्या परवानगीची जरूरी नव्हती."

" मग तू राहिलास कसा ?"

" मला कोणी ठेविलें नाहीं—मी आपण होऊनच येथे राहिलों. मी असा मार्ग स्वीकारला कीं मी येथें राहून गेलो "

तैलपाला मुंजाच्या ह्मणण्याचा मतितार्थ कळला नाही " बरें तर. दुरात्म्या तुझ्या पापाचा घडा आता पुरा भरत आलेला आहे आता तुला हत्तीच्या पायाशीं बाधतो बघ '

मुज हंसला ! त्याच्या हसण्यांत तिरस्कार भरलेला होता " अशा धमक्या ऐकून मला तर त्याचा कटाळा आलेला आहे."

तैलपाने पाहिलें कीं सैनिकां समक्ष आपला मानभंग होत आहे तें बरें नाहीं; ह्मणून त्यानें थोडक्यांतच आटोपतें घेतलें.

" आतां तुला फार कटाळा येणार नाही. सैनिक ! या पाप्याला बरोबर संभाळा. हा पळाला तर तुमची जिवंतपणीं चामडी काढली जाईल."

मुंजाचा विनोदपूर्ण आवाज ऐकूं आला. विनोदानें मुंज ह्मणाला—"माझा खुशाल वध करीव. पण या पृथ्वीवल्लभाच्या नांवाला शोभेल अशाच तऱ्हेनेंच माझा वध कर "



## प्रकरण २९ वें.

## कारस्थान्यांचा शोध.

गुन्हेगाराना शिक्षा करण्यासाठीं आतुर झालेला कुमार त्वेषानें भुयारांत धावला, विनाश करण्याच्या लालसेनें त्याचे सर्व अवयव कांपत होते. इतका त्याच्या ठिकाणी त्वेष भरला होता.

थोडया वेळानें वारा वाहू लागला मशालीची ज्वाळा नाचू लागली; भुयाराचें दार दिसलें तें महासामन्ताच्या वाडींत निघत होतें त्यातून बाहेर पडताना कोणीहि नजरेस पडला नाहीं.

कुमाराच्या लक्षात आलें कीं आपणा जवळ मशालजी असल्यामुळें आपण स्वत: अधारातील इसमाना ताबडतोब दिसत असलों पाहिजे परतु मशालीच्या उजेडानें त्याचे डोळे अधारात बरोबर काम करित नव्हते; म्हणून त्यानें मशालजीला ती विझविण्यास सागितलें.

इतक्यात भुयारांत त्याच्या मागोमाग आठ दहा सैनिक आले. त्यांस त्यानें कारागृहातून मुजाला पळविणाऱ्याचा शोध करण्यासाठीं निरनिराळ्या दिशांस पाठविले, आणि स्वत महासामताच्या महालाकडे गेला.

बाहेरील ओटयावर लक्ष्मीदेवी उभी होती कुमार तेथेंच थांबला.

“ देवी ! येथून जातांना कोणाला पाहिलें ? ”

“ कोण कुमारसाहेब ! ” समजणार नाहीं अशा तिरस्कारानें लक्ष्मीदेवी म्हणाली. “ आपण येथें कसें आला ? ”

“ कोणाला जाताना पाहिलेंत ? इकडून ते हरामखोर आतांच गेले. ”

“ जे तुमच्याबरोबर त्या बाजूला होते ते ? ” लक्ष्मीदेवीनें निर्दोषतेनें प्रश्न केला.

“ महाराज ! महाराज ! हे इकडे कोण चाललें आहे. ” एका सैनिकानें ओरडून म्हटलें.

अकलकचरित थाबला. दुरून अंधःकारात कोणाला तरी महादेवाच्या मंदिराकडे पळताना त्याने पाहिलें. पळणाऱ्याच्या खांद्यावर काहींतरी आहे असा भास होत होता.

तो मंदिराकडे धावला, पळणारा अदृश्य झाला. कुमार अधिक जोरानें धांवू लागला.

त्याच्या पायाखालीं कोणसें माणूस लागलें. त्या इसमानें दुःखानें आरोळी मारली अकलकचरित थाबला व खालीं पाहूं लागला. तो आवाज त्याला परिचित वाटला.

' कोण नरसिंह ? " त्याने आश्चर्याने विचारलें

जमीनीवर पडलेल्या सैनिकानें रडत व अडखळत अशा आवाजानें उत्तर दिले.—" होय महाराज ! गेला—विलासबाईना घेऊन त्या—मं—दि—रा—त अरेरे म—म—ला—मा—र—लें ! !—आ—"

मृत्युपथाला लागलेल्या सैनिकाचे शेवटले शब्द ऐकण्याला कुमार उभा राहिला नाही तेवढ्या शब्दानींच त्याला पुष्कळ कळून चुकलें. विलासला घेऊन जाणारा रसनिधीच असला पाहिजे, व मुजाला पळविण्याचें कृष्ण कारस्थानहि त्यानेच केले असलें पाहिजे. त्याला माहीत होते कीं महादेवाच्या मंदिरातून गांवाबाहेर जाण्याला एक गुप्तमार्ग आहे. आणि त्याच मार्गानें रसनिधि पळून गेला अशी त्याची खात्री झाली.

अकलकाच्या प ़ात आणि हातात आता हजारपट जोर आला. दोन पळातच तो मंदिरांत पोहोचला. त्याने चोहींबाजूला नजर टाकिली; पण तेथें कोणीहि नव्हते. तेथून बाहेर निघणाऱ्या भुयाराचें तोंड कोठें आहे याची त्याला बरोबर माहिती नव्हती, पण लक्षपूर्वक पाहताच त्याला नंदी वाकडा झालेला दिसला. त्याने जोरानें नंदीला पदभ्रष्ट केलें. नंदीला कोणी जसेंच्या तसेंच वर ठेविलें होतें. नंदीला तेथून काढताच भुयाराचें तोंड मिळालें. तेथून भुयारात जाण्याला दगडाच्या पायऱ्यांचा मार्ग होता.

दूरवर विचार न करिता तो धावत धावतच भुयारात शिरला. त्याला प्रथमपासूनच रसनिधीविषयीं तिटकारा होताच, व आता तर त्यानें राजद्रोहाचा भयंकर गुन्हा केला होता; शिवाय त्याच्या विलासला तो पळवून नेत होता.

पाची क्रूरता व मृणालची कठोरता या दोन्ही लक्षणानी युक्त असलेलें रक्त-शु'क नियमाचें मिळालेलें शिक्षण या दोहोंच्या मिश्रणानें बनलेला त्याचा कर स्वभाव या वेळी दुसरे काही बघेल हे शक्य नव्हतें. त्याला तर रस-धीच्या रक्तानें आपल्या तरवारीला स्नान घालावयाचें होते

अंधारात भुयाराच्या भितीवर आदळत, हातानी चाचपडत व पायाने करा खात तो झपाटयानें पुढें चालला चोहींबाजूच्या काळ्याकुट्ट अंधारात त आणि पायाच्याच साहाय्यानें तो मार्ग काढीत होता.

थोडेसें दूर गेल्यावर त्याच्या कानी आवाज पडला—कोणी तरी हळु हळु, डपडत, आदळत पुढें मार्ग आक्रमित आहे, असें त्यास आढळलें. त्याच्या र्शला पारावार उरला नाही. तो उत्साहाने फारच झपाटयाने पुढें जाऊ गला

एकदम त्याचें शरीर भितीवर आदळलें. रस्ता अरुंद झाला. फक्त एकच मम जाऊ शकेल इतका रस्ता राहिला. आडवे फिरणें किंवा परत फिरणें खिल मुष्किलीचें झालें, पण पुढें जाताना याहिपेक्षा मागें कठीण आहे असे टलें. कुमार आपली नग्न तरवार समोर करून पुढें जाऊ लागला

या अरुंद रस्त्यामुळें रसनिधीचें कार्य फारच कठीण झालें. विलास शुद्धीवर व्हती; व या रस्त्यात तिला खांद्यावरून नेणे शक्य नव्हते तरी पण एके णीं तिला उचलून, दुसरे क्षणी तिला फरफर ओढून ती बेशुद्ध असताना खिल रसनिधि तिला मोठया मुष्किलीतें नेत पुढे पुढें जात होता थोड्या ळाने तो पुढे जाताना अटकला मागून येणारी पाऊलाची चाहूल फारच वळ ऐकू येऊ लागली व अशाच तऱ्हेनें तो चालला तर पाठीमागून णारा त्याचा सहज विनाश करील अशी स्थिति होती.

त्यानें देहभानावर नसलेल्या विलासला भितीशीं जमीनीवर बसविले व रत फिरून, हातात तरवार घट्ट धरून त्यानें विचारलें:—" कोण आहे ? "

कुमार फार जवळ होता. तो हा प्रश्न ऐकून चमकला, पण दुसऱ्या क्षणीच ावध होऊन " तुझा काळ " असें उत्तर देऊन तो पुढे आला

" तर हा मी आहे " असें म्हणून रसनिधि पण पुढें आला

एका क्षणातच दोन तरवारी एकमेकावर आदळल्या; त्यांतून ठिणग निघू लागल्या, पण वार करावयाला जाताच दोघाच्या तरवारी भींतीवर आ ळल्या मुळे त्याचे तुकडे झाले.

दोघेहि योद्धे कुशल होते. दोघानीं तरवारी टाकून दिल्या व ते एक कावर तुटून पडले.

ही कुस्ती जिवावरची होती. ज्या ठिकाणीं, मोठ्या मुष्किलीनें, एका म ष्याला सरळ चालता येणें देखिल दुरापास्त होते त्या ठिकाणीं या दोघा नाडवनृत्य करण्याला सुरुवात केली. भिंतीवर डोकीं आपटत, कोपरें व गुड सोलले जात, दगडावर आदळत, असें होते तरी हे दोघे कट्टे वैरी त्या भयं अधारात अद्‌भुत अथवा आश्चर्य वाटण्यासारखें जीवनहारक युद्ध करीत होते

दोघांनीं एकमेकांचा प्राण घेण्याचें नक्की केलेलें दिसत होतें. दोघाचीहि प खात्री झाली होती कीं विजयाशिवाय या दुनियेत जिवत राहण्याला दुस मार्गच नाहीं.

रसनिधि अंगानें लहान होता, अकलंक चरित विशाल देहाचा होता; प रसनिधीची युद्धाची पद्धती खऱ्या युद्धकलानिपुणाची होती. पहिल्या ध ऱ्याला कुमाराच्या धडाडीच्या व त्वेषाच्या हल्लयानें तो जरी जरा कचरला- मागे हटला, तरी देखिल हळुं हळुं त्याची युद्धकला—त्याचें नैपुण्य त्याच मदतीला आलें. दोघेहि बराच वेळ पावेतो झुजले तरी कोणीहि नमतें घेत नाहीं. पण कुमाराचा दम कमी कमी होत चालला व, चलाख रसनिधी तीं वाट पाहत आपला बचाव करीत होता.

अकलंक समजला. आपला दम आहे तोपावेतों शत्रूला यमसदन दाखव ण्यासाठीं त्यानें पराकाष्ठा केली, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. मात्र योद्धा खरा खेळाडू होता. थोडया वेळानें त्यानें कुमाराला एका कोंपऱ्य चेपलें व लागलीच तो त्याच्या छातीवर बसला.

रसनिधीने थोडा श्वास घेतला व म्हणाला " बोल ! दुरात्म्या ! बो कोणाचा काळ आला आहे ? "

कुमार बोलला नाहीं. ही हार त्याला मृत्यूपेक्षा देखिल जास्त सलत होती

" मी आपले सात पिढ्यांचें वैर उगवून घेऊं काय "

" घे; मला जगणे किंवा मरणें या दोन्ही गोष्टी आता सारख्याच आहेत. मृत्यूची मला मुळींच परवा नाही."

" अशा तऱ्हेनें तुला मारल्यानें माझ्या कीर्तीला कलंक लागेल, लोक ह्मणतील कोण जाणे तूं कसा मेलास ? "

" चल आटप " तिरस्काराने अकलंक ह्मणाला. " हा माझा गळा. दाब गळा व घे प्राण. तुझ्यासारख्या नपुंसकास हेंच साजेसें आहे "

" अकलंक ! अवन्तीच्या परमाराला नपुंसक ठरविणारा अजून तरी या पृथ्वीवर जन्मला नाहीं. तुझे गुमान राहूं दे. जसा तू मान्यखेटचा युवराज आहेस तसा मी देखिल अवन्तीचा युवराज आहे, समजलास ? "

" कोण भोज ! "

" होय मीच तो—तुला मारीन तर युद्धात मारीन असा अंधारात गळा दाबून तुझा मी जीव घेणार नाही आणि ह्मणूनच मी तुला जिवंत जाऊं देतो. जा. पण एका अटीवर. "

" ती कोणती ? "

" कोणत्याहि प्रकारची गडबड केल्याशिवाय आल्या रस्त्याने परत जा. "

" या अटीची जरुर काय ? दुसरा रस्ता तरी आहे कोठे ? बाहेरच्या बाजूला तर तुझे साथीदार असतील ? "

" पण तूं पाठलाग केलास तर ? "

कुमार एक पळभर स्तब्ध राहिला त्याला वाटलें कीं पुनः असें युद्ध करणें हितकर नाहीं.

" पाठलाग नाहीं करणार "

" दे वचन. "

" हें घे "

" बरें तर. " असे ह्मणून भोज उठला.

झोंके खात, अंगावरील धूळ झटकीत अकलंकचरित उठला.

" चल, चालावयाला लाग "

" हा मी चाललो " असे म्हणून अकलंकचरित खालीं वळल्यासारखा दिसला.

भोज हसला, " विजयाची आठवण म्हणून तरवारीचे तुकडे बरोबर घेऊन जातोस वाटतें ? "

कुमारानें उत्तर दिले नाहीं. थोडासा दूर गेल्यावर नतर तो पडला असें वाटलें, थोडा वेळ तो तसाच पडून राहिला

भोजाच्या मनात शका उद्भवली. " कां उठता येते की नाही, कीं येऊ मदतीला ? "

अकलंकचरिताने उत्तर दिलें नाहीं. थोड्या वेळाने तोच उठला व धावत धांवत निघून गेला.

त्याच्या धावण्याचा आवाज दूर गेल्यानंतर भोज खाली वळला, व तो विलासच्या शोधाला लागला. विलासला निजविलें होते त्या जागेपासून कुमाराबरोबर युद्ध करता करता आपण बरेंच पुढे आलो असें त्याला वाटलें. तो परत फिरला व हाताने चाचपडत विलासचा शोध करूं लागला. युद्धाच्या परिश्रमानें त्याला थकवा आला होता व त्यामुळे त्याचे डोकें फिरू लागलें होतें, व त्या कारणानेच विलासचा शोध करणे त्याला थोडे कठीण झाले होतें. थोड्या वेळानें विलासचे पाय त्याच्या हाताला लागले. त्याने लागलींच तिच्या कंबरेला धरून तिला दोन्ही हातांनीं उचललें व झपाट्यानें तो चालू लागला

" विलास ! प्रिय विलास ! त्या राक्षसाच्या पज्यांतून तूं सुटलीस खरी ! "



## प्रकरण ३० वें.



## विलास कशी सुटली ?

भोज पचवीस एक पावलें गेला; त्याचे डोकें फिरावयाचे थांबलें तो शुद्धीवर आला.

तो चपापला. विलास त्याला हलकी लागली. त्यानें आपले ओंठ चावले व धीर आणण्याचा प्रयत्न केला.

त्याचें काळीज चर्रर झालें. त्याचा उजवा हात विलासच्या पृष्ठभागाखालीं होता. त्या हातावर पाणी पडत आहे असा त्याला भास झाला. पाणी—रक्त इतकें पुष्कळ ! भोजाची छाती धडधड करूं लागली—त्याचे पाय कापूं लागले; तो दगडासारखा उभा राहिला.

त्यानें मोठ्या मुष्किलीनें विलासला सारखी केली. रक्त कोठून येत आहे तें पाहण्यासाठीं त्यानें आपला हात विलासच्या अंगावरून फिरविला व एकदम एक गगनभेदी आरोळी मारून भुयार गजबजविलें.

विलासच्या खांद्याचा वरील भाग मुळींच तिच्या शरीरावर नव्हता.

भोजाचा हात रक्तबंबाळ झाला. ज्या ठिकाणीं विलासचें मस्तक असावयाला पाहिजे त्या ठिकाणाहून उष्ण रक्त बाहेर वाहत होतें.

भोजाला शुद्धी आली—त्याच्या हातांत फक्त विलासचें धडच होतें.

त्याच्या शरीरांतील प्रत्येक रंध्रांतून एकदम केस ताठ उभे राहिले. त्याचे हातपाय थरथर कापूं लागले. त्याच्या हातातील धड जमीनीवर पडलें

तो एखाद्या दिङ्मूढासारखा उभा राहिला. लागलाच त्याच्या हृदयाच्या ठिकाणीं अवर्णनीय शोक प्रसवला. रक्तानें चिंब झालेला हात आपल्या डोक्यावर घेऊन तो ओक्साबोक्शीं रडूं लागला.

एकदम समोरून दौडत येणाऱ्या पावलांची चाहूल आली, मशालीचा उजेड पण दिसला. थोड्या वेळानें समोरून मशाल घेऊन धनंजय येतांना त्याला दिसला. त्याच्या मागें कांहीं कवि होते. भोजाला येण्याला विलंब झाला म्हणून ते शोध करण्यासाठीं येत होते. " महाराज ! महाराज ! ! "

धनजय जवळ आला—रडण्याचा सूर ऐकून थांबला, पुनः थोडासा पुढे आला, व त्यानें एक भयकर किंकाळी ठोकली.

" अरे बापरे " त्याच्या हातातील मशाल गळून पडली

त्याच्या नजरेसमोर ठिकठिकाणीं रक्ताचे डाग पडलेले आहेत असा कोणी उभा होता—भुईवर एका शवातून रक्तधारा वाहत होत्या.

धनजय हिंमतवान होता—जेथें मानुषी धैर्याचें अथवा हिंमतीचें काम असेल तेथें या वेळीं त्याला असेंच वाटले कीं साक्षात् भैरव त्याच्यासमोर उभा आहे.

पण भोजानें त्याला ओळखलें. " धनजय ! धनंजय ! भाऊ ! "

धनंजयाला शुद्धि आणि हिंमत येऊन त्यानें मशाल उचलली.

" कोण युवराज ! काय आज्ञा आहे ? "

" धनंजय ! हे पाहिले काय ? " कसें बसें भोजानें सांगितलें व विलासच्या धडाकडे त्यानें बोट दाखविलें.

" काय आहे ? "

" विलासचे धड "

" पण महाराज कोठे ? "

महाराज कारागृहात. मी भुयारांत जातो न जातो तोंच अकलंकचरित आणि त्याचीं माणसें भुयाराचें दार उघडून तुटून पडलीं, महाराज पकडले गेले. मी भुयाराचें तोंडावर दगड टाकून तेथून निसटलों. अकलंक माझ्या मागें लागला. तो दम घेण्याला थांबला. "

" मग पुढे ? "

मी अत्यंत त्वरेनें लक्ष्मीदेवीकडे जाऊन विलासला घेऊन झपाट्याने तेथून निसटलों. विलास बेशुद्ध झाली होती. तिला उचलून मी मंदिराच्या भुयारात शिरलों.......”

“माझ्या मागोमाग अकलंक आला—या भुयारात द्वन्द्व युद्ध झालें. मी त्याला सोडून दिलें. त्याने दगा न करण्याचे वचन दिलें. पापी येथून गेला, पण जातां जातां माझ्या विलासचें मस्तक कापून घेऊन गेला.”

“ औं ! ” धनजय व त्याच्या मागें असलेले कवि चकित झाले

“ मला आतां सर्व कळले. तो कमजात आदळून पडला त्याच वेळेला त्यानें हें काम केलें. चल पाहू बरें ! ” असें म्हणून त्यानें मशाल घेतली व तो मागें फिरला.

ते थोडे दूर गेल्यानंतर त्याना द्वन्द्वयुद्धाचें स्थान लागलें. पण त्याठिकाणी दोन तरवारीपैकीं एकाच तरवारीच्या मुठीचा भाग व दोन तरवारींचे अग्रभाग पडले होते. एका कोपऱ्यात ज्या ठिकाणीं विलासला निजविले होतें—त्या ठिकाणीं रक्ताचें डबके साचले होतें.

मुकाट्यानें सर्वजण परत फिरले. विलासचें धड त्यानीं उचललें व थोड्या वेळानें ते भुयाराच्या बाहेर पडले.

बाहेर आल्यावर सर्वजण आपआपल्या घोड्यावर बसले आणि झपाट्यानें मुशाफरी करीत ते गोदावरीच्या समीप आले.

तेथे चिता रचून भोजानें विलासच्या धडाला अग्नि संस्कार केला. भोजाच्या शरीरांमात अग्नि व्यापून गेला. विलासच्या धडाला अग्नीची आच लागतांच तो मनांत म्हणाला “ इच्या रक्ताच्या प्रत्येक थेंबाचा मी सूड घेईन. ”

दुसऱ्या क्षणाला त्याला विलासची आठवण झाली. त्या निर्दोष काव्य रसिकेचें म्लान पण मनोहर मुखकमल त्याच्या नजरेसमोर उभें राहिलें. त्याचें हृदय भरून आलें. तो हुंदके देऊन देऊन रडूं लागला.

“ युवराज ! पण आतां काय करावयाचें ? ” धनंजयानें विचारलें

“ आतां होय ? अवन्तीचा रस्ता. ”

“ पण महाराजांचें काय ? ”

दुःखाने भोजानें आपलें मस्तक हलविले. " कांही म्हण, रुद्रादित्याचें भविष्य सत्य झालें. मुंज गोदावरी एकच वेळा ओलांडील. दुसऱ्यादा नाही. महाराज तर आता मान्यखेटांतच मरणार "

" आपण त्याची काही बातमी तर मिळविली पाहिजे ? एक काम करूं. गोदावरा ओलांडून गुप्तवेशाने दोन चार दिवस राहून काहीं शोध लावूं. "

" बरें आहे त्याला माझी काहीं हरकत नाही. पण आता आपण महाराजांची सुटका करू शकूं असे मला तरी वाटत नाहीं. "

* * *

विलासची रक्षा गोदावरीत विसर्जन करून त्यानी गोदावरी ओलांडली. व जवळ एक गाव होते त्या बाजूला गेले

या गावाहून दुसऱ्या गावाला रस्ते जात होते. हे मध्यवस्तीचें गाव होतें तेथे उतरून त्यानी विश्रांती घेतली न घेतली तोंच गोदावरीच्या पलीकडच्या तीरावर दोन तीनशें माणसाची एक तुकडी येऊन दाखल झाली.

भोज आणि त्याचे माळवी योद्धे ही तुकडी पाहताच गर्भगळीत झाले. तैलपानें त्याना पकडण्यासाठीच हीं माणसे पाठविलीं असावीत असे त्याना वाटले. पण ते नदी–तीराला आले त्यासरशींच धनजानें पुढें येणाऱ्या योद्धयाला ओळखलें. " महासामन्त—"

" लक्ष्मीदेवी—"भोज म्हणाला.

सर्वजण माळवी योद्धयाकडे पाहत राहिले. समोरून येणाऱ्या माणसाच्या अघाडीला महासामन्त व लक्ष्मीदेवी अशी दोघें दोन घोडयावर होती.

पण त्या सर्वांचा देखावा विक्राळ होता. महासामन्ताच्या एका हातांत परशु होता, व दुसऱ्या हातांत एक महान खड्ग होते. त्याच्या तोंडावर ज्यांतून रक्त निघत आहे असे घाव होते. त्याचा घोडा देखिल रक्तबंबाळ झालेला होता.

लक्ष्मीदेवीचे स्वरूप चंडिकेसमान भयानक होते. तिच्या एका हातात लाल भडक रक्तानें माखलेली तरवार होती. तिच्या शरीरावर धूळीचे थर आणि रक्ताचे ओघळ होते. तिच्या जिनाला एक डोकें बांधलेलें होतें. जसा या दोघांचा देखावा होता तसाच त्याच्या सैनिकांचाहि होता. दरेकाच्या हातांत नग्न शस्त्र होतें, प्रत्येकाच्या शरीरावर रक्ताचे डाग पडलेले होते व प्रत्येकाची मुखमुद्रा भयानक होती.

" धनंजय ! हे आपणाला पकडावयास येत नाहींत पण हे युद्धांतून येत आहेत असें वाटतें. " भोज ह्मणाला.

इतक्यात महासामन्ताने "जय भुवनेश्वर !" ह्मणून घोड्याला टाच मारली. व त्याला नदींत घातलें त्याच्या मागे लक्ष्मीदेवी व त्याचे सैनिक होते, त्यांनींहि महासामन्ताचेंच अनुकरण केलं.

इकडे भोज व त्याचे स्वार घोड्यावर चढले व पळून जावे कीं जाऊं नये याची त्याना समज न पडल्यामुळे ते टकमक पाहात राहिले, महासामन्तानी नदीच्या या तीरावर येताच त्यानें भोजाला ओळखलें.

" रसनिधि ! "

" महासामन्त ! आपण येथे कोठून आणि कसे ? " असें म्हणून त्यानें आपला घोडा महासामन्ताच्या घोड्यानजीक घेतला.

" मी स्थूनदेशाला जात आहे. "

इतक्यांत लक्ष्मीदेवीचा घोडा नदी उतरून तेथ आला.

" भोजराज ! आता हे महासामन्त नाहींत. स्थूनदेशाचे महाराजाधिराज भिल्लमराज आहेत. "

लक्ष्मीदेवीचे नेत्र लाल भडक आणि टवकारलेले होते, तिचे ओंठ दबलेले होते, तिच्या अंगातील प्रत्येक धमनींत त्वेश आणि क्रोध पूर्ण भरलेला होता. रसनिधी ही भयंकर मूर्ति पाहत राहिला--पाहता पाहता त्याची नजर लक्ष्मी-देवीच्या जिनावर अडकविलेल्या शिरावर गेली.

विकाळ लक्ष्मीदेवीनें भयंकर तऱ्हेचें हास्य करून केश धरून तें मस्तक उंच धरिलें.

" हा स्थूनाधिपाचा विजयध्वज "

लक्ष्मीदेवी ज्याप्रमाणें स्मशानांतील भुतें हंसतात त्याप्रमाणें एकदम खद-खद हंसली.

भोजानें तें तोंड पाहिले—ओळखलें. त्या मुखमंडळावर विलासच्या मुख मुद्रेची छाप होती. तें विलासचें शिर होतं.

त्याला कांपरें भरलें. त्याच्या डोळ्याला अंधारी आली. बेशुद्ध होऊन तो आपल्या घोड्यावरून जमीनीवर पडला.

---

# प्रकरण ३१ वें.

## लक्ष्मीदेवीनें तैलंगण कां सोडलें ?

अकलक चरिताच्या गर्विष्ठ स्वभावाला भयकर धक्का बसला. त्याच्या हृदयाला मोठी जखम पडली पराजय झाल्यामुळें या वेळीं तो निराधार झाला होता तरी देखिल त्याच्या अत करणांत सुडाच्या भावनेचें हालाहल भरलें होते.

इतक्यात त्यानें ठोकर खाल्ली पडता पडता तुटलेल्या तरवारीचा अर्धा भाग त्याच्या हाती लागला. तो घेऊन तो पुढे चालला. दोन पावलें पुढें गेल्यावर त्याने पुन ठोकर खाल्ली—व तो बेशुद्ध विलासच्या आगावर पडला

हार खावयास लागल्यामुळे झालेला मानभग सह्य होता—पण भोजानें विलासला घेऊन जाणें हा मानभंग असह्य होता. सूड घेण्याच्या भावनेनें उत्सुक झालेल्या अकलकाच्या बुद्धीला एक घातकी विचार सुचला. विचार येताच त्यानें तो अमलात आणिला. तरवारीच्या अर्ध्या तुकडयाने त्याने विलासचें मस्तक धडापासून वेगळें केलें, व तें त्याने आपल्या हाती घेतलें.

हें घोर कर्म करून तो पुढे गेला. त्याचा हृदयभार हलका झाला. एका घावाने पापी भोज आणि निमकहराम विलास या दोघानाहि तो शिक्षा करू शकला.

थोडासा पुढें गेल्यावर, मशाल घेऊन त्याच्या शोधार्थ निघालेले सैनिक त्याला भेटले विलासचें मस्तक हातात घेऊन रक्तानें माखलेल्या कुमाराला पाहून ते चमकले व उभे राहिले. त्यांच्या दगडासारख्या कठिण हृदयाला कंप सुटला, ते थरथर कापू लागले.

"परत फिरा" कुमार म्हणाला.

हुकुमाला शिरसा वंद्य करून सैनिक परत फिरले, व हळुहळु मदिरात आले. त्या ठिकाणीं तैलप आणि भिल्लम थोडया योद्धयासह वाट पाहत उभे होते.

अंगावर रक्ताचे डाग व ज्यांतून रक्त गळत आहे असें माणसाचें मस्तक कुमार घेऊन येत आहे हें पाहतांच सर्वजण घाबरले व थोडे मागें सरले.

" हें काय ? " तैलपानें भिवया चढवून विचारलें.

" हें—" असें म्हणून अकलकानें तें मस्तक उंच धरलें व तो म्हणाला— " जी पापिणी मला सोडून भोजाबरोबर पळून जात होती तिचें हें मस्तक ! "

" विलास—" डोळे वटारून भिल्लम म्हणाला.

" होय—! तैलंगणाची भावी साम्राज्ञी. " पाषाण-हृदयी कुमार क्रूरतापूर्वक स्मित करीत म्हणाला. " आपल्या चुलत्याला पळवून नेण्याच्या कार्यांत भोजाला यश मिळालें नाहीं, व इजला घेऊन तो पळून जात होता मी त्याला पकडण्याचा प्रयत्न केला—पण उलट त्यानेंच मला पकडलें. माझा पराजय करून त्यानें मला सोडून दिलें. परत फिरतांना मी इचें मस्तक कापून घेऊन आलों."

" कोणाचें शिर ? " मृणालवतीचा आवाज आला. ती जक्कलादेवी, लक्ष्मी व थोड्या सैनिकांसहित या ठिकाणीं धावून आली होती.

" विलासचें ! " असें म्हणून मशालीच्या उजेडांत त्यानें तें उंच धरिलें. विलासचें मुख भयानक निश्चलतेनें सर्वांकडे पाहात होतें.

एक पळभर भयानक शांति पसरली.

युवराज ओंठावर ओंठ दाबून, अंधकारानें पूर्ण व्यापलेल्या अंतःकरणानें एखाद्या मूढाप्रमाणें डोळे वटारून पाहत होता. त्याची विचारशक्ति त्याला सोडून गेली होती

मशालीच्या उजेडाच्या वर्तुळांत कोणी एकानें उडी घातली आणि अकलंकाच्या हातांतून विलासचें मस्तक हिसकून घेतलें.

" माझ्या विलासचें शिर ? "—लक्ष्मीदेवीनें गर्जना केली.

तिनें मस्तक उंच केलें. इकडूंच विलासचें निर्दोष मुखकमल, सुकोमल मुखमंडळावरील रेषा, सुंदर नयनांची निर्जीव निश्चलता पाहिली. सर्वजण तिच्याकडे पाहत राहिले—मध्यें बोलण्याची कोणाची हिंमत राहिली नाहीं.

लक्ष्मीदेवीची या वेळची मूर्ति महिषासुरमर्दिनीसारखी दिसत होती. तिच्या वटारलेल्या नयनांतून अग्नीचा वर्षाव होत होता; तिच्या मुखमंडळावर विध-

संहारक क्रोधाचा दुःसह प्रताप दिसत होता. श्वेत होऊन राहिलेली ती, फक्त शरीरांतून प्रगटणाऱ्या कोपानलाच्या ज्वालेनेंच सर्वांना जाळीत होती.

"माझ्या बाळेला तूं मारिलेस ?" तिनें एकदम कुमाराला विचारलें.

कुमार ताबडतोब उत्तर देऊं शकला नाहीं.

" चला आता–" तैलपराज भावी तुफान शमविण्यासाठीं बोलावयास गेला.

लक्ष्मीदेवी मध्येंच म्हणाली:–" भिल्लमराज ! पाहिलें ना ? अकलंकचरित्राच्या पायाची धूळ डोक्यावर ठेवा ! कारण तुमच्या एकुलत्या एक कन्येची त्यानें ही दशा केली !" ती टवकारून आपल्या पतीकडे पाहूं लागली. तो दीन योद्धा दिङ्मूढ होऊन टकमक बघत राहिला होता. ती क्रोधावेशानें त्याच्याकडे वळली " धिक्कार असो तुमच्या सारख्यांना ! तुमचे हात काय चुलींत गेले ! की तुम्ही हातात कंकणें भरलींत ? तुमचीं आयुधें तुम्हीं कोठें गहाण टाकलींत कीं विकून आलात ? या पिशाच्चानें या एकुलत्या एक कन्येचें शिर छेदिलें----आणि तुमच्यांत याचें शिर धडापासून वेगळें करण्याचें सामर्थ्य नाहीना ? तुमची शक्ति कोठे गेली ? असें काय पाहून राहिलांत ? पाहण्यासारखें आता राहिलें आहे तरी काय ?" तिच्या आवाजात अनिवार तिरस्कार आणि अमर्याद क्रोध याचा समावेश झालेला होता.

भिल्लमाच्या कपाळावर आठया पडल्या, पण तो कांहीं एक बोलूं शकला नाहीं, अथवा पाऊलभर देखिल आपल्या जागेवरून हालला नाहीं तो फक्त लक्ष्मीदेवीकडे टकमक पाहात होता.

" लक्ष्मी ! तू हें काय भकतेस ! " मृणालवतीनें नेहमींच्या संवयीप्रमाणें अधिकारयुक्त वाणीनें म्हणाली. " जरा शुद्धीवर ये. देहभान विसरूं नको. "

" देहभान ? शुद्धी ? " लक्ष्मीदेवीच्या क्रोधावेषानें मृणालदेखिल दिपून गेली. " माझ्या विलासनें कोणता गुन्हा केला होता ? या वेळीं मुंजाला मारून तुम्ही सुद्धां तर पळून जाणार होता ! तुमचें डोकें तुमच्या धडावर आहे. कारण तुम्ही तैलपराजाच्या भगिनी—व तिचें मस्तक धडावेगळें झालें; कारण ही स्यूनदेशाच्या कंगाल आणि भिकार्या राजाची कन्या ! असेंच ना ?"

वीज पडल्याप्रमाणें सर्वजण एकदम चमकले व एकमेकांच्या तोंडाकडे टकमक पाहूं लागले. तैलप सर्वांच्या आधीं शांत झाला. त्याला वाटलें कीं सैनिक-

देखत फटफजिती होणें इष्ट नाही. त्याने भिल्लमाला सांगितलें —"महासामंत ! लक्ष्मीदेवीला घेऊन जावे. '

" कोठे ? " एक पाऊल पुढे सरून, एखाद्या वेड्याप्रमाणें लक्ष्मीदेवी तैलपाकडे डोळे वटारून ओरडून ह्मणाली, "भिल्लमराज ! घेऊन जा—मला—जाच घेऊन माझ्या स्यून देशाला—आता या भूमींत अन्न अथवा पाणी ग्रहण करणे मला विषवत आहे. पण तुह्मी काय करणार ? तुह्मी तर दास-गुलाम-बनला आहांत, हातांस बांगड्या भरल्या आहेत. तुह्मी कां मला घेऊन जाणार ? मी स्वतः जाईन. मी चालुक्य महाराजांची कन्या आहे. हजार वीरांगनांचे त्वेषयुक्त रक्त माझ्या अंगांत भरलेलें आहे. मी एकटी आहे तरी पुरेशी आहे—मुलीला मारलें, माझा देश बुडविला त्याचें रक्त प्राशन करण्यासाठीं—" ती अकलंकचरिताकडे वळली " नरपिशाचा ! चांडाळा ! तुझें रक्त प्राशन करीन तरच मी नावाची लक्ष्मी ! "

भिल्लमाच्या डोळ्यात भयंकर तेज आलें व त्याबरोबरच त्याच्या ठिकाणी बोलण्याची शक्तिपण आली " देवी ! आता तर चला. "

" हो. चला तर स्यून देशाला. या पापभूमींत आता पळभर देखिल राहावयाचे नाहीं. " सत्तेनें लक्ष्मीदेवी म्हणाली

" भिल्लम ! " जरा पुढे येऊन तैलप म्हणाला. " इला येथून घेऊन जाता कीं नाहीं ? "

भिल्लम हळूच पुढें सरला आणि लक्ष्मीदेवी व तैलप याच्यामध्यें उभा राहिला. त्याचें प्रचंड शरीर स्वस्थ आणि शांत होतें—त्याचा आवाज घोगरा पण भयंकर होता. " खबरदार " तो म्हणाला " देवी खरें बोलत आहे. चला आपल्या देशाला " असें म्हणून त्यानें लक्ष्मीदेवीचा हात धरला आणि तिला ओढून घेऊन जाऊं लागला.

इतक्यात भुईवर पडलेल्या शंखावर त्याची दृष्टि पडली—त्यानें तो उचलला आणि आपल्या सैनिकाला बोलवण्यासाठीं त्यानें शंख फुंकला.

तैलप या शंखनादाचा अर्थ समजला, व रागानें पुढें आला.

" भिल्लम तू हें काय करतोस ? तू देखिल वेडा झालास ? "

भिल्लम तैलपापेक्षा एक हातभर उंच होता. त्यानें एक जोराची बुक्की तैलपाच्या मस्तकावर मारली.

" काय ? "

तैलपराज दोन पाऊले मागें सरला, व ओठ चावुन रागाने ह्मणाला —"मान्यखेट नाहीं सोडता येणार ! "

" पाहतो माझ्याकडे कोण येते ते ? " असें ह्मणून भिल्लमाचा शंखनाद ऐकून धावत आलेल्या सैनिकाकडे तो वळला. " घोडा आणा. आपणाला स्यून देशाला जावयाचें आहे " असें ह्मणून लक्ष्मीदेवीला घेऊन तो निघून गेला. त्याच्यामध्यें पडण्याची कोणाची ताकद नव्हती; कारण भिल्लमाचे प्रचंड बाहुबल प्रख्यात होतें. थोडा वेळ सर्वजण चित्रासारखे तटस्थ उभे होते.

" अकलंक ! राजगडाचे व नगराचे दरवाजे बंद करीव. " तैलप ह्मणाला

त्याचें प्रत्युत्तर ह्मणून स्यूनराजाचा शखनाद दूर ऐकु येऊं लागला. व महालयामध्ये योध्याची दौडादौड झाली.

पाहता पाहता स्यूनराजाचे योद्धे सज्ज झाले लक्ष्मीदेवीची भयकर मुखमुद्रा व विलासन्या मस्तकाच्या विजयध्वजानें प्रत्येकाच्या रोमरोमांत भयंकर अशा त्वेषानें ठाणें दिलें. पाहता पाहता ते घोड्यावर चढले, व शंखनादाचा विजयी घोष करीत ते पुढें गेले अकलकाने शक्य तितक्या योध्याना तयार करून भिल्लमाच्या योध्याना अडविण्यासाठीं पाठविलें.

स्यूनराजा आणि त्याचे योद्धे त्वेष आणि क्रोध याच्या भरात पुढें गेले, मान्यखेटाच्या दरवाजा समोर त्यांचें युद्ध झालें.

भिल्लमराजा आणि लक्ष्मीदेवी यानी कहर गुजरविला त्यांच्या सैनिकांनी शौर्याची सीमा करून शोणिताच्या सरिता वाहविल्या. त्या सरिता ओलाडून सैन्य मान्यखेट सोडून पुढे गेलें; व गोदावीर उतरीत असताना भोजाच्या नजरेला पडलें.



# प्रकरण ३१ वें.



## भिक्षा.

अत्यंत क्षुद्रावस्थेंतील अधमता व मानहानी या वेळी मृणालवती अनुभवित होती. तिनें केलेल्या कारस्थानाचा शेवट तिच्या मनाप्रमाणें तर झाला नाही, पण उलट मुज कायमचा तिच्या हातून गेला—कदाचित त्याचा प्राणांतहि झाला असेल. शिवाय, सर्व जगभर तिची फजिती झाली ती निराळीच इतकेंच नव्हें तर वैराग्याच्या अवडंबरानें जो मान, जी सत्ता आणि जी शांति तिनें मिळविली होती त्या सर्वांवर पाणी पडलें—आणि शेवटी केवळ एकाच वाक्यानें लक्ष्मीदेवीने इतक्या दिवसाचें वैर उगवून घेतलें—इतकेंच नाही पण लक्ष्मीदेवीच्या एका वाक्याने तैलंगणातील कुत्रेंसुद्धा मृणालवतीकडे ढुंकून पाहणार नाही एवढ्या अधोगतीला ती पोहोचली. सुख, प्रणय, वैराग्य मान, सत्ता सर्व कांही नाहींसे झालें. अशी स्थिति येऊनसुद्धा वसुधरेने तिला आपल्या पोटात थारा दिला नाही व यमराजानें तिचे प्राणहरण केले नाहीं

ती आपल्या खोलींत गेली आणि शून्य होऊन स्वस्थ बसली, पण ती स्वस्थ राहू शकली नाही, रडू शकली नाही किंवा या बिकट आणि कष्टमय स्थितींतून मार्ग शोधू शकली नाहीं. विलासाची लालसा, सत्तेची हौस व वैराग्याचा मोह या तीन्ही जणू वैतरणी तरून जाऊन दुसऱ्या काठाला गेलेल्या स्वजनाप्रमाणे तिला दुरून शेवटचा प्रणाम करीत होत्या, सजल नयनाने ती पडून राहिली, कारण ती त्याना परत बोलावू देखिल शकली नाहीं किंवा त्यांच्या मागोमाग वैतरणी ओलांडू पण शकली नाहीं.

मरण्याचे तिच्या मनात येई—पण यमराजाचें स्वागत करण्याचें तिला धैर्य नव्हतें, असें होते तरी यमराज आणि तैलप या दोहोत यमराजाला शरण जाणें तिला कमी अरुचिकर वाटत होतें.

पण कदाचित विषाचा प्याला अर्धाच राहिला असेल म्हणून तैलपाच्या पायाची चाहूल तिला ऐकूं आली. तैलप तिच्याकडेसच येत होता मनाला

स्वास्थ्य आणण्याची तिला शक्ती नव्हती--तैलपाच्या समोर राहून त्याला प्रत्युत्तर देण्याइतका स्वाभिमान नव्हता. जणू एकाद्या घरावर वीज पडून तें घर जसें जमीनदोस्त व्हावें तद्वत् निराधार होऊन ती जशी होती तशी तेथेंच बसली होती

तैलप आला त्यानें आतापर्यंतच्या अवधींत मृणालविषयीं बरीच माहिती मिळविली होती वेळीं अवेळीं मुंजाबरोबर तिचें मीलन, अकलकाला तिने दिलेली बातमी, लक्ष्मीदेवीने मृणालला मारलेला टोमणा- या सर्वांवरून त्याची खात्री होती कीं विषयलालसेने प्रेरित होऊन मृणालनेंच मुंजाला पळविण्याचें-- मुंजाची कारागृहातून सुटका करण्याचें—कारस्थान रचिलें होतें, व यामुळे त्याच्या कुचंबण्याला सीमा नव्हती मृणाल वैराग्याचा त्याग करून विषयी बनेल, मुंजाला पळून जाण्याच्या कटात सामील होईल, कारस्थानी पळून जातील, जाताजाता अकलंकाचा पराजय करून जातील, भिल्लमासारखा शूरवीर योद्धा माझा पक्ष सोडून स्वातंत्र्याचें निशाण फडकावील—या एका मागून एक येणाऱ्या संकटानी—या आलेल्या प्रसंगाच्या जखमानी तो कळमळत होता त्याची बुद्धि त्याच्या काबूंत नव्हती तो भांबावून गेला होता एका पळात मृणालच्या बुद्धिमत्तेचें आणि भिल्लमाच्या बाहुबलाचें साहाय्य नाहींसें झालें. आणि भिल्लम व भोज यासारखे महाप्रतापी वीर त्याचे शत्रू ह्मणून त्याच्या समोर उभे राहिले--हा घोटाळा फारच भयंकर होता. यामुळें त्याची फारच त्रेधा उडाली व शिवाय जणू दुःखावर डागण्याच कीं काय ह्मणून मृणालच्या पतनाचा कलंक पण लागला. विजयाच्या शिखरावरून एकदम अशा तऱ्हेच्या अंधकारमय खाड्यात खालीं पडणें त्या बिचाऱ्याला दुःसह वाटावें यात आश्चर्य करण्यासारखें कांहीं देखिल नव्हते

परंतु या पेंचातून मार्ग काढण्याची किंवा विस्खळित झालेली घडी पुन घालण्याची त्याला सवड नव्हती, किंवा त्याच्या ठिकाणीं शक्ति नव्हती. या वेळीं तो केवळ क्रोध आणि द्वेष या दोहोंचाच दास बनला होता--व या दोघाचें केंद्रस्थान मुंज आणि मृणाल.

तो आला आणि थोडा वेळ निःशब्द तिरस्कारानें मृणालकडे पाहत राहिला तिच्या लहान नेत्रात अनिर्वाच्य द्वेष भरलेला होता, त्याच्या ओठावर भयंकर

तिरस्कार दिसत होता, व त्याचें मन या द्वेषाग्नीनें आणि तिरस्कारानें कोणाला तरी भस्म करण्याला अत्यंत आतुर झालेलें होतें.

"तैलंगणाच्या राजमाते! ठीक आहे ना?" त्यानें क्रूर आणि शांत स्वरात विचारलें "अवन्ती किती दूर आहे?"

मृणाल शिकाऱ्याने घेरलेल्या एखाद्या हरिणीप्रमाणें निराशेनें भरलेल्या नेत्रानें पाहात राहिली. काय बोलावें किंवा उत्तर द्यावें हे तिला सुचलें नाहीं. तैलपाने आपले बोलणे पुढें चालविलें

"कुलटे! यापेक्षा जननीच्या उदरातून शिळा पडली असती तरी बरें झालें असतें निष्कलंक तपस्विनी!!!" असें म्हणून तैलप खदखदा हसला "काय तुझें वैराग्य आणि कमली तुझी ही नीति, तुझ्यासारखी कृति करण्याला तैलंगणच्या वारांगना देखिल लाजतिल. त्यांना देखिल अशानें मेल्यामारखें होईल!"

मृणालनें त्या स्थितींतच किंचित् वर पाहिलें. तिच्या पांढऱ्या—फटफटीत डोळ्यात निराशा होती. ती तैलपाच्या शब्दाचा अर्थ समजण्याचा प्रयत्न करीत होती.

तिरस्कारानें हंसून तैला म्हणाला.—"तुला साऱ्या तैलंगणात दुसरा कोणी मिळाला नाहीं इतकी तू मुंजावर मोहित झालीस?" प्रत्येक शब्द एखाद्या खंजिराप्रमाणें, हळहळ कसायाच्या क्रूरतेनें, आपल्या बहिणीच्या हृदयात तो खुपसीत होता

मृत्युपथाला लागलेला प्राणी देखिल ज्याप्रमाणें, निरर्थक केलेल्या जखमेच्या क्रूरतेमुळें आपला राग आवरू शकत नाहीं, त्याप्रमाणें निराधार पापानें मूढ बनलेल्या मृणालला देखिल क्रोधाचे अंकुर फुटले. तिनें आपलें सर्वस्व गमाविलें होतें—परंतु मुंजाविषयींचा तिचा मोह अजून जसाच्या तसाच कायम होता स्वतःला संबोधिलेल्या अपशब्दाची तिला दिक्कत वाटली नाहीं. तिच्या हृदयात रममाण होऊन राहिलेल्या एकच मूर्तीचा—मुंजाचा थोडासा देखिल अपमान ती सहन करू शकली नाहीं. तिला तो अपमान असह्य झाला. ती तैलपासमोर पाहू लागली व थोड्या वेळानें म्हणाली —

"तैलंगणातच काय पण अखिल भूतलावर याला जोडी तर दाखिव?"

तैलपाच्या नेत्रांत भयंकर तेज पसरलें; त्याचे ओंठ कापूं लागले त्याचा क्रोध व द्वेष यावर असलेलें तिरस्काराचें आवरण निघालें. त्यानें डोळे वटा-

हून विचारिलें ." बेशरम ! प्रत्यक्ष माझ्या तोंडावर असें म्हणण्याला तुला लाज वाटत नाही ? "

" मी कशासाठी लाजू ? " मृणाल खिन्नतेनें म्हणाली तिचा प्रभावशाली स्वभाव हळुहळु तिचे साम्राज्य प्रस्थापित करीत होता "तूं माझें वैराग्य समजला नव्हतास—व तुला माझा मोह देखिल कळत नाही. मजाची तू थट्टा करितोस काय ? मूर्खा ! तुझ्यासारखे दहा हजार तैलप एकदम झाले तरी देखिल त्याची बरोबरी होणार नाही. तो सर्वांना पुरून उरेल असा आहे. " असें म्हणून ती तैलपाच्या समोर उभी राहिली

" तपस्विनी ! शाबास. तैलंगणच्या राजमाते शाबास ! धन्य आहे तुझी ! तुझ्या तोंडात असलेंच भाषण शोभतें नाहीं ? '

" असें बोलणें मला शोभते कीं नाही याची मला मुळींच परवा नाहीं माझे हात या वेळीं विगलित झाले आहेत माझी कर्तबगारी सध्या नष्ट झाली आहे माझ्या जीवनावर माझ्या हातानेंच म्या अग्नि ठेविला आहे त्याला मीच भस्मीभूत केलें आहे. तें छिन्नविच्छिन्न झालें आहे मी मेल्यावर माझ्यासाठी चार अश्रू सुद्धा कोणी ढाळणार नाहीं, किंवा चार दुःखाचे निश्वाससुद्धां कोणी टाकणार नाही मी उग्र तपस्विनी होत्ये-तैलंगणची राज्यविधात्री होत्ये—आतां मला कुलटा म्हणून सर्वजण माझ्या नावाचा उच्चार होतांच माझी निर्भत्सना करतील माझ्या नावावर थुंकतील " मृणाल श्वास घेण्यासाठी थोडी थांबली. तैलप थोडा हसला.

" तरी पण तपस्विनी होऊन जो गर्व माझ्या ठिकाणीं होता, तुझ्या भगिनीला तुझ्या राज्याची राज्यविधात्री म्हणून जो गर्व होता, तितकाच गर्व किंबहुना, त्याहून जास्ती गर्व, पृथ्वीवल्लभाची वल्लभा होण्यात आहे असें मी मानते. "

" हा—हा—हा—" तैलप खदखद हंसला. " मग आता तू देखिल पाहा ! मी तुला आता पावेतो मातेप्रमाणें—इतकेंच नाहीं तर प्रत्यक्ष देवाप्रमाणें मानलें. आतां तुला देखिल माझ्या प्रतापाचा संपूर्ण स्वाद चाखावयाला लावतों. "

" तू काय स्वाद चाखावयास लावणार ? माझे ग्रह पालटल्यानें, माझें कर्म फुटल्यानें मला स्वाद चाखावयाला विधीच भाग पाडीत आहे. " ती दुःख भरित स्वरांत म्हणाली

" प्रथमत. तर तुझ्या त्या पृथ्वीवल्लभाला माझ्या कठोरतेचा स्वाद दाखवीन, व मग तुला "

" तो तर सदोदित सुखाचाच स्वाद घेत आहे त्याला तू काय करणार ? तुझ्याने त्याचे काडी इतकें देखिल वाकडे होणार नाहीं "

" तुला अजून माझ्या प्रतापाची माहिती नाही "

आता तिरस्कारानें हसण्याचा मृणालला प्रसंग आला ती हसली !

तैलप गुरगुरला व न बोलताच तेथून जाऊन तो खिडकी उघडून ह्मणाला – " पाहा—"

एक पाऊल मृणालनें पुढें टाकलें व पाहिलें बाहेर गल्लीत एका घराच्या दरवाजासमोर मुंज उभा होता त्याच्या हातांत व पायांत बेड्या होत्या त्याच्या हातात भिक्षापात्र होतें मागें दोन खड्गधारी सैनिक चालत होते

" तुझा पृथ्वीवल्लभ सात दिवसपर्यंत दारोदार तुकडे मागून खाईल व नंतर—, "

" नंतर —" श्वास घेऊन मृणालनें विचारले

" नंतर--ज्या ठिकाणीं तू मिळणार नाहींस तेथें—यमसदनात—"

" तें तुला कसें कळलें ? "

या वेळीं अशा करुणामय—दयाजनक—अधमतेच्या स्थितीत देखिल मुंज जसाच्या तसाच होता त्याच्या मुखमंडळावर शांति आणि आनंद विलसत होता त्याचे नेत्र घटकेंत सैनिकाकडे तर घटकेत रस्त्यानें चालणाऱ्याबरोबर गोष्टी करतांना खाली वर होत होते. त्याच्या गौरवांत अथवा त्याच्या स्वास्थ्यात थोडा देखिल भंग झाला नव्हता. त्याच्या हातात भिक्षापात्र व बेडी राजचिन्हाप्रमाणें शोभत होती

ज्या घरासमोर मुंज उभा होता त्या घरातून एक युवती बाहेर आली, व मुंज आणि सैनिक यांना पाहून घाबरून परत वळली

" सुंदरी ! तूं काय ह्मणून घाबरतेस ? " स्नेहादरयुक्त नेत्रानें त्या स्त्रीकडे पाहून हसत मुंज ह्मणाला.

" महाराज--" ती स्त्री सभयाने ह्मणाली.

"याहून दुसरे उत्तम तें काय ? असें झालें नसतें तर मान्यखेटाच्या तैलपराजाच्या छावणीत राहून पकवान्नें खाल्ली असतीं, पण येथें येऊन मिक्षा मागीत हिंडत असतां तुला पाहण्याचा योग कसा आला असता ? तुझ्याशिवाय दुसरें जास्त अवघड स्थळीं भोजन मिळणें शक्य नव्हतें. अहाहा ! फारच सुखकर गोष्ट ! बरें पण त्या झगड्यांना त्या वेळीं दूर रिकाना पृथ्वीवल्लभाची ओळख कशी झाली असती ? घरांत काहीं आहे काय ? असेल तर वाढ."

" महाराज ! या वेळीं—"

" जें काहीं असेल तें, तेलपाच्या राज्यभवनातील पक्वान्नापेक्षा खचित जास्त चागलेंच असेल. पाहूं तर खरें की पाकशास्त्र कोणाचें उत्तम—अवन्तीचें की मान्यखेटचें ? " ती स्त्री दौडत दौडत घरांत गेली आणि कांहीं खाण्याचा पदार्थ घेऊन येऊन तिनें मुंजाच्या भिक्षापात्रांत टाकला

मुज हास्यभरित नेत्रानें म्हणाला —" सुंदरी ! इतके ध्यानांत असू दे " असें म्हणून त्यानें एक संस्कृत श्लोक म्हटला

त्या स्त्रीला काहीच न समजल्यामुळें ती पाहत उभी राहिली मुंज हसून म्हणाला. " हो, मी चुकलों हो अवन्ती नाहीं. हे पहा ! चन्द्रलेखे ! या तुझ्या पुष्पमालेसारख्या हाताच्या सुकुमार पाशांतून प्रणयी निसटून जाण्याचा यत्न करील तर त्याला मूढ समजून त्याचा तिरस्कार कर कारण पृथ्वीवल्लभ देखिल हा हात आहे की कमलिनीचा देठ आहे या भ्रमानें क्षणभर भिक्षापात्रांत काय टाकले तें पाहण्याला विसरला."

ती स्त्री लज्जित झाली व खाली पाहू लागली. तिचे मुखकमल खूप हंसू लागलें मुज देखिल आनंदानें हंसत होता

" हा तुझा पृथ्वीवल्लभ —पाहून घे." मुज दुसऱ्या शेरींत वळला तेव्हा तैलप मृणालला म्हणाला

" मी तर केव्हाच त्याला पाहून ठेविलें आहे. तूच पाहून घे. नाहीं तर पाहण्याचें राहून जाईल " मृणाल तिरस्कारानें म्हणाली. " आज तू प्राण खर्ची घातलेस तरी असा पृथ्वीवल्लभ व्हावयाचा नाहीं." असें म्हणून ती तेथून वळली.

ओठ चावून तैलपहि तेथून निघून गेला.



# प्रकरण ३३ वें.

## पृथ्वीवल्लभ कसा घुटमळला ?

सात दिवसपर्यंत मुंजानें भिक्षा मागितली व आपल्या दिग्विजयाची ध्वजा फडकाविली सर्व नगर त्याच्यासाठी वेडें झालें. प्रत्येक नरनारी तैलपाला शाप देऊं लागली, तसेंच मुंज वाचावा म्हणून प्रत्येक जण नवस करूं लागले

परंतु या वेळीं तैलप फसून जाईल असें नव्हते मृणालवर, मुंजावर, मुंजाबरोबर उभे कोणी भाषण करील त्याच्यावर त्यानें पाहारा ठेविला होता, व त्याची प्रत्येक हालचालच काय प्रत्यक्ष शब्द तैलपाच्या कानावर जात असे तैलपाला हळु हळुं मालव राजाच्या चमत्कारी व्यक्तित्वाचे आणि आपल्या बिघडलेल्या ब्रीदाचे भान येऊं लागलें, व जस जसें हें भान त्याला येत गेलें तसतसा मुंजाला मारून टाकण्याचा आपला संकल्प तो दृढ करीत गेला

दवंडी पिटवून त्यानें स्वराज्यात जाहीर केलें कीं सातवे दिवशीं सकाळीं पापाचारी मुंजाला मृणालवती जवळ शेवटची भिक्षा मागविल्या नंतर हत्तीच्या पायाखालीं देण्यात येईल, व या विजयोत्सवात भाग घेण्यासाठीं त्यानें देशातील सर्व जनतेला निमंत्रण केले.

सर्व देश दिग्मूढ झाला हजारो अंतःकरणांतून रोपाचें, तिरस्काराचे उद्गार बाहेर निघाले. हजारों नेत्रांतून अश्रू आले. हजारो निश्वास या अन्यायासमोर मूकवृत्तीनें ओरड करीत राहिले

पण तैलपाचा संकल्प निश्चल होता. सातवे दिवशी देशातील स्त्रीपुरुष राजभुवनाच्या पुढील मैदानांत गोळा झाले. चारी बाजूला खिडक्यांतून, सज्जांतून, अगाशीवरून तसेंच आजूबाजूच्या झाडावरून आणि छपरावरून लोकांची भयंकर गर्दी झालेली होती.

राजभुवनाच्या ओट्यावर मृणालवती उभी होती तिचे मुख म्लान पण गंभीर होतें. तिच्या विद्रुप मुखावर देखिल शोकानें सौंदर्याची छाया पसरली

होतीं रडून रडून तिचे डोळे लालबुंद झाले होते. घटकोघटकी तिच्या हृदयातून निश्वास निघत होते जिला पाहून लोक कापत असत, जिच्या रूबाबानें व करडेपणानें लोक त्रासले होते त्याच मृणालवतीकडे जनता आज दयार्द्र दृष्टीनें पाहत होती मनात देखिल तिच्या आचरणाची निंदा करण्याची कोणासहि बुद्धि झाली नाही

मृणालजवळ भिक्षा मागवून मुंजाला क्षुद्रतेचा कटुतम अनुभव आणवून द्यावा असा तैलपाचा विचार होता मृणाल हा हेतु समजली—व प्रथमतः तिनें तसें करण्याला अनुमति दिली नाही पण तैलपानें तिला पळभर देखिल मुंजाला भेटण्याची सवलत दिली नाही, इतकेंच नाही पण अजिबात मनाई केली होती व म्हणून हृदयभेदक शर्त कबूल केल्याशिवाय मुंजाला भेटण्याचा दुसरा कोणताहि प्रसंग येण्याची आशा नव्हती शेवटीं तिनें कबूल केलें. तिच्या वज्रासारख्या कठिण हृदयाला हा आघात असह्य झाला होता

मृणालच्या बाजूला राणी जक्कलादेवी व कित्येक सखीजन उभे होते राणीचें मुखकमल फिके आणि चिंतातुर होतें. समोर तैलप उभा होता तो आपला कट्टा दुष्मन व आपली मातृतुल्य भगिनीचे शेवटचें चित्तभेदक मीलन पाहण्याला— या दोघांच्या वेदना पाहून आनंद मानण्याला आतुर झाला होता.

मध्यंतरी खुल्या ठेवलेल्या जागेंत एक मदोन्मत्त गजराज डोलत होता त्याला निशा देऊन खूप माजवून ठेविलें होतें तो निशेत धुंद होता त्याच्यावर एक महा अनुभवी महात बसविला होता, त्या महाताला देखिल त्या मत्त हत्तीला ताब्यात ठेवणे जड जात होते हत्ती आपल्या आरक्त नेत्रांनीं नगरजनांना न्याहाळीत होता, व थोड्या थोड्या वेळानें आपली शुंडा लांबवून, आवाज करून आपला क्रोध प्रगट करीत होता. मुंज कारागृहांतून निघून तेथें आला लोकांत शांति पसरली, व सर्वजण एकसारखे टक लावून पाहात राहिले.

कोणत्या प्रकारची काकू न करिता, या अपमानाची कोणत्याहि प्रकारची दिक्कत न बाळगता, कोणत्याहि प्रकारचा मनात संकोच न आणतां, न डगमगतां, आपली शांति यत्किंचितहि ढळू न देता व कोणालाहि न विचारतां तो सरळ मृणाल उभी होती तेथ आला—व हसला या वेळचे त्याचें हास्य नेहमींप्रमाणेंच मोहक होतें.

" मृणालवती ठीक आहे ना ? " फार दिवसानी प्रियतमेला भेटण्याच्या वेळच्या आवाजासारखा त्याच्या आवाजांत ध्वनि होता याचे प्रत्युत्तर म्हणून प्रथमतःच मृणाल हंसू शकली नाहीं पण लागलीच मुंजाचें मोहक हास्य आणि मृदु आवाज यान्च्या जादूचा तिच्यावर परिणाम झाला. ती मधुर, हळूंच व म्लानवदनानें हसली तिचे नेत्र प्रेमाने आर्द्र झाले दोघाची दृष्टि आपल्या तेजोरूपी करानी एकमेकाना आलिंगन देत होती सर्वजण श्वासाचा अवरोध करून टक लावून पाहात होते.

" आता कोणते दान दणार ? " रसिक प्रणयी एकातवासात ज्या मृमधुरतेनें विचारतो त्याप्रमाणे पृथ्वीवल्लभानें विचारलें " आपणाजवळ जे होते ते तर कधीच दिलेलें आहे "

मृणालवती हे शब्द ऐकून वेडी झाली. तिच्या रोमरोमात प्रणयमारुत भयकर झोंबाट्यानें वाहत होता ती दु:ख, समय व स्थल विसरली आणि मोहांध नेत्रानें हृदयनाथाची मूर्ति निहाळीत राहिली.

" सुंदरी ! घाबरण्याचें किंवा भिण्याचें काहीच प्रयोजन नाहीं दुनिया वाईट आणि अज्ञान आहे— ती तशीच राहावयाची. तुम्ही मात्र आपलें जीवन उत्तम केलेलें आहे—दुनिया काहीहि म्हणो त्याची पर्वा नाहीं. "

तैलपाचें, नगर जनाचें, लोक लज्जेचें अथवा भिक्षा देण्याचें मृणाल भान विसरली—भिक्षापात्र तिनें हातातून फेंकून दिलें, व धावत जाऊन मुंजाच्या बेड्या घातलेल्या पायाला तिनें विळखा घातला

" महाराज ! क्षमा करा ! पृथ्वीवल्लभ ! तुम्हाला मीच जिवंत मारीत आहे. आपल्या मृत्यूला मीच कारण आहे ! " असें म्हणून मृणालनें मुंजाची चरण-धूलिका आपल्या मस्तकावर धारण केली

" आपण ! माझ्या मृत्यूला कारण ? मी जन्माला आलों तेव्हाच माझा मृत्यु नक्की झालेला होता. त्यात तुम्ही काय करूं शकणार होता ? उठा "

हें दृश्य पाहून तैलपानें ओट्यावरून उडी घेतली व मृणालचा हात धरून त्यानें तिला मुंजा पासून वेगळें केलें. लोक व सैनिक याच्या नेत्रातून खळ खळ अश्रू पडले.

" तैलप ! माझ्यावरचा राग आणि माझें वैर या बापडीवर उगविण्यात फायदा तरी काय ? "

" चाडाळा चूप राहा. "

" काय म्हणून चूप राहूं ? " हंसून मुंज म्हणाला. " गप राहण्याचा प्रसंग तुझ्यावर आलेला आहे. या क्षणीच माझा संपूर्ण दिग्विजय झालेला आहे

क्रोधाच्या सपाट्यात काय बोलावें हें न सुचल्यामुळे तैलप मुका राहिला मुंजाने आपले तेजस्वी मुखकमल चोहीं बाजूला फिरविलें. तो हंसला; व सर्वांना ऐकूं जाईल अशा तऱ्हेने म्हणाला—

"मूर्खा ! तुझ्या डोळ्याला दिसतें आहे कीं नाही ? तुला काहीं समजतें कीं नाहीं ? अवन्तीच्या सिंहासनावर सिंहासारखा माझा भोज गर्जना करीत आहे; स्यून देशात भिल्लम तुझा सूड उगविण्याला आतुर बनलेला आहे; तुझी भगिनी, तुझी प्रजा आतां तुझी राहिला नसून माझी झाली आहे हा विजय कोणाचा ? तुझा का माझा ? "

" आता माझा हत्ती तुझ्या विजयाचे दिग्दर्शन करील " असें म्हणून तैलपानें मृणालला ओट्यावर बसविलें व तो पुढें आला.

मुंज खदखदा हंसला

" यांत तुझा विजय झाला का माझा ? तू मला नमविण्याला मागत होतास पण मी नमल्याशिवाय माझें जीवन पूर्ण केलें आहे. तू नीतीचें अवडंबर माजविलें होतेस, पण या वेळीं त्याचा त्याग करून राजहत्येचें पाप आपल्या माथीं ओढून घेत आहेस. विजेता कोण तूं का मी ? "

मुंजाचा तिरस्काराने भरलेला आवाज त्या मेदिनींत गर्जत होता

तैलप मनाच्या अस्वस्थतेने भांबावून गेला. त्याने आपले ओठ चावले. त्याच्या नेत्रातून विषाचे फवारे बाहेर पडले.

" सैनिकांनो पकडा याला "

" इतकी तसदी कशाला. हा बघ मीच माझ्या खुशीनें चाललो. " असें म्हणून गौरवानें पाऊलें टाकीत तो गजराजाकडे गेला.

सर्वजण टवकारून बघत होते. सर्वांचे श्वास अवरोधले होते. शान्तीनें मुंज पुढें चालला. त्याच्या मागून तैलप व थोडे सैनिक चालले होते.

हत्तीजवळ येऊन मुंज उभा राहिला; तैलपाच्या हुकुमानें सैनिकांनीं त्याच्या बेड्या काढल्या.

गेडया निघतांच मुज सरळ आणि रुबाबान उभा राहिला. आपल्या कपाळावर पडलेले केश त्याने सावरले, व लोकाकडे आणि मृणालकडे आपले विशाळ भाल फिरविलें. त्याच्या नेत्रात धैर्यता होती, पृथ्वीवल्लभतासूचक तेज होतें, त्याच्या ओठावर गौरवयुक्त हास्य विलसत होते.

लोकाना भीतीने कापरें सुटलें. कित्येक तर रडावयास लागले. मृणाल एखाद्या वेडयागारखा पाहत होती सैनिक ओठावर ओठ ठेवून कर्तव्यपरायण झाले होते.

" तैलप !" शातीने मुज म्हणाला 'हे पाहा शेवटी पृथ्वीवल्लभला साजसा अशीच माझ्या मृत्यूची रचना करण्यात आली '

तैलप निश्चल, आणि क्रूरतेने युक्त असा उभा होता—त्याच्या हृदयात निराशा पसरली होती मरता मरता सुद्धा मुज आपलाच विजयध्वज फडकाविन होता असे त्याला वाटू लागले मुज थोडा तरी खिन्न होईल, त्याची वल्लभता थोडी तरी अदृष्ट होईल याची तो वाट पाहात होता

" चाल ! नाहीं तर मानिकाला बोलावू "

मुजाने तिरस्कारयुक्त नजर तैलपावर टाकली व दोन पाऊल पुढे जाऊन तो हत्तीच्या साडेजवळ आला

तेथे जाऊन तो घुटमळला व उभा राहिला

तैलपाला पाहिजे होता तो प्रसग मिळाला—" का घाबरतोस काय म्हणून ? "

" पृथ्वीवल्लभ घाबरला म्हणजे पृथ्वी रसातळाला जाते मघ्या मला एक विचार आला "

" कोणता ? "

" एवढाच " गर्वाने मुजाने आपले मस्तक उंच केले. त्याचे नेत्र सजल आर्द्र झाले " कीं बिचाऱ्या सरस्वतीचे कसें होईल ? "

" म्हणजे ? "

लक्ष्मी यास्यति गोविन्दे
वीरश्री वीरवेश्मनि ।
गते मुंजे यशःपुंजे
निरालम्बा सरस्वती ॥